ॐ

# अर्पण-पत्रिका.

## श्रावकाचार

## गृहस्थधर्म.

**श्रीयुत बाबगौंडा भुजगौंडा पाटील,**

बी. ए. एल्एल्. बी. वकील **सांगली.**

संपादक- प्रगति आणि जिनविजय, जैनवीर, दक्षिण-भारत जैन व जैनधर्म यांचा संक्षिप्त इतिहास, भगवान महावीरांचे महावीरत्व यांचे लेखक यांनीं अनेक जैन व जैनेतर पुस्तकांच्या आधारें लिहून द. म. जैन सभेस हा ग्रंथ आदरपूर्वक अर्पण केला आहे.

**अक्षयतृतीया—वीर संवत् २४६९.**

**इ. स. १९४३.**

# अनुक्रमणिका



## अध्याय १ ला.

## अध्याय २ रा.



## अध्याय ३ रा.

## अध्याय ६ वा.



## अध्याय ७ वा

# कांहीं महत्वाचीं चर्चा-प्रकरणें.



## अध्याय १ ला.

## अध्याय २ रा.



## अध्याय ३ रा.



## अध्याय ४ था.



## अध्याय ५ वा.

## अध्याय ६ वा.



## अध्याय ७ वा.



---

॥ ॐ ॥

# श्रीस्वामी समंतभद्राचार्य यांचे संक्षिप्त जीवन-चरित्र.

## जन्मकाल व जन्मभूमि इत्यादि.

म्हैसूर संस्थानांतून वाहत जाणाऱ्या कावेरी नदीच्या कांठीं वसलेल्या उरगपूर-हल्लीं त्रिचनापल्ली-शहरीं संवत ६० इ. स. १३८ सालीं आचार्यांचा जन्म झाला. चरित्रनायक हे कदंब क्षत्रिय राजपुत्र असून त्यांचे जन्मकालीन नांव शांतिवर्मा व दीक्षेनंतरचें नांव समंतभद्र असें आहे.

## शिक्षा व दीक्षाविधि.

आचार्यांचे बालपणचें शिक्षण, जन्मगांव त्रिचनापल्ली येथें झालें. कांची अगर कांचीच्या आसपास दीक्षा घेतली. बालपणापासून संसाराबद्दल विरक्ति वाटूं लागल्यानें गृहस्थाश्रमी न होतां ते आजन्म ब्रह्मचारी राहिले.

## भस्मक रोग व राजा शिवकोटी.

पूर्वजन्मसंचित असाता-कर्मोदयानें दीक्षाविधीनंतर चरित्रनायकांना भस्मक रोगाची व्यथा झाली. यामुळें मुनिव्रत पालन करणें अशक्य झालें. चरित्रनायक आपल्या गुरूकडे गेले व सर्व वृत्तांत सांगून गुरूकडे सल्लेखना-समाधिमरणाची-याचना केली. आचार्यपदास पोंचून भावी तीर्थंकर-धर्मप्रवर्तक होणार हें जाणून गुरूंनीं सल्लेखना व्रत देण्याचें नाकारिलें. ज्या कोणत्या उपायांनीं हा रोग बरा होईल तो उपाय करावा व रोगमुक्त झाल्यावर प्रायश्चितपूर्वक फिरून मुनिदीक्षा घ्यावी; अशी अनुज्ञा गुरूंनीं दिली. धन्य ते गुरु व धन्य ते शिष्य. त्यांवेळीं कांची शहरांत राजा शिवकोटी हा राज्य करीत होता. राजा शिवकोटि हा कट्टर शैवमतानुयायी होता. त्या शहरांत ' भीमलिंग ' या नांवाचे शिवालय होते व भीमलिंगास राजाकडून बराच मोठा नैवेद्य अर्पण केला जात असे. चरित्रनायकानीं राजाची भेट घेतली. राजास आशिर्वाद दिला व रोजचा नैवेद्य आपण शिवास खावयास लावितो, मात्र आपणांस शिवसन्निध राहण्यास परवानगी मिळावी, अशी विनंति केली. पूर्वजन्मसंचित कर्माला

क्षय लागण्याची वेळ आली व राजानें वरील विनंति मान्य करून शिवालयांत राहण्यास अनुज्ञा दिली.

नित्याप्रमाणें अर्पण केलेला नैवेद्य शिवलिंगाच्या ऐवजीं चरित्रनायक खाऊं लागले. शिवलिंगच नैवेद्य खात आहे, हें पाहून राजाला आनंद झाला व राजा निरनिराळे पक्वान्न अर्पण करूं लागला. भरपूर पक्वान्न पोटांत जाऊन चरित्रनायकाचा जठराग्नि जसजसा तृप्त होऊं लागला तसतसा भस्मक रोग हटूं लागला व नैवेद्यांतील अन्न शिलकी राहूं लागलें. राजाला संशय आला. चरित्रनायकांनीं राजाची संशयनिवृत्ति करण्याचा केलेला प्रयत्न व्यर्थ गेला व कैद होण्याची पाळी आली. शिवालयाला राजसैनिकांनीं गराडा दिला. आचार्यांची चित्तवृत्ति ढळली नाहीं. उपसर्गनिवृत्ति होईपर्यंत आचार्यांनीं समाधि धारण करून 'स्वयंभू, स्तोत्राची रचना करण्यास सुरवात केली. आठवे तीर्थंकर श्रीचंद्रप्रभ तीर्थंकरांची स्तुति पुरी होते न होते इतक्यांत शिवलिंगांतून मनोज्ञ व विशाल अशा चंद्रप्रभु तीर्थंकरांची मूर्ति तेथें प्रगट झाली. राजाला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप होऊन तो आचार्यांना शरण आला. आचार्यांचे पाय धरून त्यांची क्षमा मागितली. आपला मुलगा श्रीकंठ यांजवर राज्यकारभार सोपवून राजानें जैनधर्माचा स्वीकार करून जैन मुनिदीक्षा घेतली. रोगनिवृत्ति झाल्यानें पश्चातापपूर्वक चरित्र नायकांनीं फिरून मुनिदिक्षा घेतली व ते आचार्यपदास पोंचले.

**आचार्यांचें अनन्य सामान्यत्व.** उत्कृष्ट कवि, अप्रतिहत वक्ता, निर्भयवादी, धर्मशास्त्रज्ञ व धर्मशास्त्रमर्मज्ञ अशी आचार्यांची ख्याति आहे. आचार्य हे महान् योगी, तपस्वी व तर्कज्ञानी होऊन गेले. छंद, अलंकार, काव्य यांचा दांडगा अभ्यास होता. संस्कृत, प्राकृत, कन्नड व तामिळादि भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. आचार्यांच्या अनेक ग्रंथवाचनावरून असें निश्चित म्हटलें जात आहे कीं ते एक महात्मा, विश्वप्रेमी, हितमितभाषि व निष्पक्ष असे होते.

आचार्यांच्या काळीं नैरात्म्यवाद, शून्यवाद वा क्षणिकवादाचे प्राबल्य माजले होते. या वादांतून जनतेला मुक्त करून खऱ्या उद्धाराचा मार्ग आचार्यांनीं जनतेला दाखवून जनसेवा केली. अनेक ठिकाणीं वाद करून बौद्ध व वैदिकधर्मीय पंडितांचा वादविवादांत पराजय करून जैनधर्माचा विजयीध्वज फडकत ठेविला.

आचार्यांचें नामस्मरण व संकीर्तन. } श्रीस्वामी समंतभद्राचार्यानंतरचे श्रीजिनसेन, श्रीवादिराज, श्रीशुभचंद्र, अजितसेन व श्रीविद्यानंदि आदि दिगंबर आचार्योनीं व हेमचंद्रसूरि आदि श्वेतांबर आचार्यांनीं आचार्य समन्तभद्र यांची आपापल्या ग्रंथांत मुक्तकंठानें स्तुति करून आचार्यांचें नांव अमर केलें आहे. तीर्थंकराच्या पुण्य व पवित्र नामस्मरणाबरोबरच आचार्य समंतभद्र, कुंदकुंदाचार्य व अकलंकादि आचार्यांचें नामस्मरण जैनधर्मीय प्रतिदिनीं आज १८०० वर्षे करीत आले आहेत!

श्री. नरेंद्र ऊर्फ काशिनाथ कृष्ण रणदिवे-कीर्तनकार यांचा ता. २८-१०-४२ च्या प्रगति आणि जिनविजयांत 'समंतभद्रांचा साहित्य-विषयक गुणपरिचय' या मथळ्याखालील उद्बोधक लेख उद्धृत केल्यास आचार्यांची थोरवी कळून येईल अशी उमेद आहे.

## समन्तभद्रांचा साहित्यविषयक गुणपरिचय.

भगवत्समन्तभद्रांच्या विशाल साहित्यावरून असामान्य पांडित्य, तेजस्वी प्रतिभाशक्तित्व व बुद्धिचातुर्याच्या आत्यंतिक विकसित्वाचा चांगला पत्ता-थांग लागतो. ते अनेक भाषेचे अधिकारी ग्रंथकार व कवि होते. जैनसिद्धांताचे तर पूर्णगामी असून न्याय, व्याकरण, अलंकार आणि काव्यकोषादि साहित्याचे ते प्रखर मर्मज्ञ व सुयोग ज्ञाते होते. (See 'Swami Samntabhadra' by Jugal Kishor Mukhtyar p. 17.) त्यांना अनेक भाषा अवगत होत्या तथापि संस्कृत भाषेवरील त्यांचें प्रभुत्व त्या भाषेवरील उत्कट प्रेम व विशेष अनुरागाचें द्योतक आहे. आज जेवढें म्हणून त्यांचें उपलब्ध ग्रंथ आहेत ते सर्व संस्कृत रचनाकृति आहेत.

कन्नड भाषेच्या साहित्याचीही त्यांनीं एकनिष्ठ सेवा केल्याचें समजतें. कारण कीं कन्नड भाषेच्या उत्कृष्ट काव्यकृतीनें मुग्ध होऊन प्राचीन सर्व विद्वानांनीं त्यांची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. (See 'Studies in South Indian Jainism' by R. Ayangar; and Bombay Gazeter Vol. ii p. 406) त्यांची जन्मभूमी तामिलप्रांत व खास मातृभाषा तामील असल्यामुळें त्यांचे त्या भाषेवर विशेष प्रभुत्व होते. त्यामुळें तामीळ भाषेंतील काव्यकृतीला जन्म देणें स्वाभाविकच होते.

संस्कृत भाषेवरील प्रभुत्वानें तात्कालीन भारतीय साहित्यकार, कवि व तत्त्ववेत्त्यावर चिरस्मरणीय छाप टाकिली; आणि दक्षिण भारतांत संस्कृत भाषेला उच्च कोटींत बसविण्याचा प्रथम मान त्यांनीं मिळविला. त्यांच्या उच्च श्रेणींतील संस्कृत रचनाकृतीनें साहित्यक्षेत्रांत युगांतर घडवून आणिले. ( See 'History of Canarese literature ' and 'कर्णाटककविचरित्' ) या दृष्टीनें संस्कृत साहित्याच्या भारतीय इतिहासांत समंतभद्र स्वामींचें नांव अमर राहिलें. यासंबंधीं मान्यवर रामस्वामी आय्यंगार एम्. ए. आपल्या ' Studies in S. Indian Jainism ' यामधून प्रगट करितात कीं, "Samantbhadra's appearence in South India marks an epoch not only in the annals of Digambar Tradition but also in the history of Sanskrit literature. अर्थात दक्षिणभारतांत समन्तभद्राचा उदय दिगंबर संप्रदायाच्या इतिहासांतच फक्त नव्हे परंतु संस्कृत साहित्याच्या इतिहासांतही एक खास युगाला अंकित करीत आहे. या मान्यतेस पुष्टी देऊन मि. S. R. Sharma M. A. आपल्या "Jainism and Karnataka Culture" p. 72 मधून प्रगट करीत आहेत कीं, " The advent of this great writer in Karnataka is rightly considered to mark an epoch, not only in Digambar History, but in the whole range of Sanskrit Literature."

स्वामीजींचें प्रभावित वादित्व, अस्खलित वक्तव्य व तेजस्वी व्यक्तिमत्वाची तात्कालीन बुद्ध-बौद्ध-विद्वानावर इतकी अटल छाप बसली कीं, प्रस्तृत पावलेल्या नैरात्मवादी, क्षणिकवादी व शून्यवादी बुद्धधर्माच्या प्रसाराला एक मोठा आळाच बसला; आणि लोककल्याणार्थ आत्म्याचें अस्तित्व, ज्ञानदर्शनादि अनंत शक्तित्व प्रमाणित करणाऱ्या जिनशासित स्याद्वाद सिद्धांताची महति, सत्यत्व व उदारत्व पटवून देऊन जैनधर्माला विश्वव्यापक बनविण्याचें लोकोत्तर कार्य करण्यास त्यानीं आपले दीर्घायुष्य व थोर व्यक्तिमत्व पणाला लाविलें. म्हणूनच त्यांच्या थोर विभूतीमत्वाचें सूचक म्हणून त्यांचा ' भारतभूषण ' या उपयुक्त विशेषणानें आचार्यप्रवर शुभचंद्रांनीं सादर गौरव केला. ( समंतभद्रो भद्रार्थो भातु भारतभूषण । पांडवपुराण ) साहित्यक रचनाकृतीला लागणाऱ्या सर्व गुणांनीं ते विभूषित होते. त्यांचें गमकत्व,

कवित्व, वादित्व व वक्तृत्वादि गुण अपूर्व कोटींतील होते; त्यामुळें त्यांच्या-वेळचे महान वादी, कवी, साहित्यकारादि विद्वानांवर त्यांनीं आपल्या तेजस्वी प्रतिभेची अखंड छाप टाकिली होती. भारताचें भूषणावह स्वामी समंतभद्रांच्या या असामान्य गुणगौरवार्थ त्याकाळचें व नंतरचें महान् महान् साहित्यकार, उत्कृष्ट कवि व विद्वान आचार्यगण उद्दीपित होऊन त्यांनीं आपापल्या ग्रंथांतून त्यांचा योग्य परिचय दिल्याचें निम्नलिखित आधारावरून समजून येतें.

भगवज्जिनसेनाचार्यांनीं आपल्या आदि-पुराणांत समंतभद्रांना वंदन करतांना 'कविवेधा' अर्थात् कवींना जन्म देणारा महान् विधाता म्हणून खालील श्लोकात आदर व्यक्त केला आहे:—

**नमः समन्तभद्राय महते कविवेधसे ।**
**यद्वचोवज्रपातेन निर्भिन्नाः कुमताद्रयः ॥**

अजितसेनाचार्यांनीं आपल्या 'अलंकारचिंतामणि' ग्रंथांत समन्त-भद्रांना नमस्कार करून 'मुनिवंद्य' 'कविकुंजर' आणि 'जनानंद' म्हणून गौरव केला आहे.

**श्रीमत्समन्तभद्रादिकविकुंजरसंचयम् ।**
**मुनिवंद्यं जनानन्दं नमामि वचनं श्रिये ॥ ३ ॥**

ज्ञानार्णव ग्रंथाचे कर्ते योगिराज श्रीशुभचंद्राचार्यानें समंतभद्रांचें 'कवीन्द्र भास्वान्' म्हणून आदरानें स्मरण केलें आहे. स्वामींना सूर्याची उपमा देऊन त्यांच्याशीं आपली तुलना सोनकिड्याप्रमाणें करून स्वतःची लघुता प्रगट केली आहे.

**समन्तभद्रादिकवीन्द्रभास्वताम् । स्फुरन्ति यत्रामलसूक्तिरश्मयः ॥**
**व्रजन्ति खद्योतवदेव हास्यताम् । न तत्र किं ज्ञानलवोद्धता जनाः ॥१४॥**

आचार्य जिनसेनानीं स्वामीजींच्या वादित्व व कवित्वादि गुणांची कीर्ति-छाया चूडामणिप्रमाणें सर्व कविगणांवर पडली होती असा उल्लेख खालील श्लोकांत केलेला मिळतो.

**कवीनां गमकानां च वादिनां वाग्मिनामपि ।**
**यशः सामन्तभद्रीयं मूर्ध्नि चूडामणीयते ॥४४॥**

'यशोधरचरित्राचे' कर्ते महाकवि वादिराजसूरि वि. संवत अक-राव्या शतकाचे कवी असून ते समन्तभद्रांना 'उत्कृष्ट काव्यमाणिकाचा रोहण किंवा पर्वत' म्हणून प्रगट करीत आहेत.

श्रीमत्समन्तभद्राद्याः काव्यमाणिक्यरोहिणः ।
सन्तु नः संततोत्कृष्टाः सूक्तिरत्नोत्करप्रदाः ॥

परवादि-दंति पंचानन श्रीवर्धमानसूरींनीं आपल्या वरांगचरित्रामधून समंतभद्रांना ' महाकवीश्वर ' व सुतर्कशास्त्रामृतसारसागर ' ह्मणून प्रगट केलें आहे.

समन्तभद्रादिमहाकवीश्वराः । कुवादिविद्याजयलब्धकीर्तयः ॥
सुतर्कशास्त्रामृतसारसागरा । मयि प्रसीदन्तु कवित्वकांक्षिणि ॥७॥

ब्रह्म अजितनें आपल्या ' हनुमच्चरित्र ' यांमधून समंतभद्रांना उद्देशून ' भव्यरूपि कमळांना प्रफुल्लित करणारा चंद्रमा ' ह्मणून उद्घोषित केलें आहे.

जीयात्समन्तभद्रोऽसौ भव्यकैरवचंद्रमाः ।
कुवादिवादकंडूनां शमनैकमहौषधिः ॥१९॥

शक सं. १३२० चा श्रवणबेळगोळचा शिलालेख नं. १०५ नवीन नं. २५४ मध्यें उल्लेखिल्याप्रमाणें समंतभद्रांना ' वादीभवज्रांकुशसूक्तिजाल ' ह्मणून प्रगट केलें आहे.

समन्तभद्रःस चिराय जीयाद्वादीभवज्रांकुशसूक्तिजालः ।
यस्य प्रभावात्सकलावनीयं वंध्यास दुर्वादुकवार्तयोऽपि ? ॥

श्वेतांबर आचार्य श्रीहरिभद्रसूरींनीं आपल्या ' अनेकान्तजयपताका ' या ग्रंथांतून स्वामीजींचा 'वादिमुख्य' ह्मणून उल्लेख केला आहे. जसें स्वोपज्ञ टीकमध्यें " आह च वादिमुख्यः समन्तभद्रः"

महाकवी वादिभसिंहनीं आपल्या ' गद्यचिंतामणि ' मध्यें स्वामींना उद्देशून ' सरस्वतीची स्वच्छंद विहारभूमि ' अर्थात् समंतभद्राच्या हृदय-मंदिरांत सरस्वतीदेवी स्वच्छंदपणें विहार करीत होती असा उल्लेख करून पुनः मुनीचें ईश्वर अर्थात् संघपति ह्मणून गौरव केला आहे.

सरस्वतीस्वैरविहारभूतयः समन्तभद्रप्रमुखा मुनीश्वराः ।
जयन्ति वाग्वज्रनिपातपाटित-प्रतीपराद्धान्तमहीध्रकोटयः ॥

श्रवणबेळगोळ येथील श. सं. १३५५ चा शिलालेख नं. १०८ नवीन नं. २५८ मध्यें मंगराज कवीनें बलाकपिच्छाच्या नंतर समंतभद्र

जिनशासनाचे प्रणेते होऊन गेले असून ते भद्रमूर्ती असल्याचें प्रगट केलें आहे.

समन्तभद्रोऽजनि भद्रमूर्तिस्ततः प्रणेता जिनशासनस्य ।
यदीयवाग्वज्रकठोरपातश्चूर्णीचकार प्रतिवादिशैलान् ॥

अजितसेनाचार्यांच्या 'अलंकारचिंतामणि' व हस्तीमल्ल कवीच्या 'विक्रान्तकौरव' नाटकाच्या प्रशस्तीमध्यें खालील श्लोक समन्तभद्र स्वामींच्या प्रखर वादित्वाची प्रशंसा करीत आहे. समंतभद्राच्यापुढें चतुर, स्पष्ट व शीघ्र कवी व वक्ता धूर्जटीची जिव्हाही बंद पडत होती तर अन्य विद्वानांची काय कथा !

अवटतटमटति झटिति स्फुटपटुवाचाटधूर्जटेर्जिव्हा ।
वादिनि समन्तभद्रे स्थितवति सति का कथान्येषाम् ॥

तसेंच वरील श्लोकाच्या पुष्ट्यर्थ श्रवणबेळगोळचा मल्लिषेण प्रशस्तीचा शिलालेख नं. ५४ नवीन नं. ६७ मधील श्लोक पुढील प्रमाणें आहे:—

[१]अवटुतटमटति झटिति स्फुट-पटु-वाचाटधूर्जटेरपि जिव्हा ।
वादिनि समन्तभद्रे स्थितवति तव सदसि भूप कास्थान्येषां ॥

वरील एकाच अर्थाचें दोन्हीही पद्यावरून कळतें कीं, धूर्जटि त्या वेळेस एक महान् विद्वान व प्रभावी प्रतिवादी असून जनतेमध्यें त्याची विशेष प्रतिष्ठा होती. एके प्रसंगीं एका राजसभेंतील विवादामध्यें समतभद्राचार्यांकडून तो पूर्ण पराजित झाल्याचें दिसतें. धूर्जटिसारखा विद्वान सहज पराजित झाल्यामुळें तर स्वामींच्या विजयी वादित्वानें त्या काळच्या जैन विद्वानांत त्यांची प्रतिष्ठा व ख्याति अधिकच दुणावली; आणि तेव्हांपासून एक म्हण रूढ झाली आहे कीं, 'धुर्जटिसारखा विद्वानही समंतभद्रजींच्यापुढें विवादांत टिकूं शकला नाहीं तर अन्य विद्वानाची काय कथा !

सारांश योगीराज समंतभद्रजींच्या साहित्यक गुणपरिचयासंबंधीं उध्दृत केलेल्या महान् महान् आचार्यांच्या ग्रंथांतील श्लोक, प्रशस्ती, शिलालेख व

---

१ दावणगिरी तालुक्याचा शिलालेख नं. ९० मध्येंही हा श्लोक दिलेला आहे. हा लेख चालुक्य विक्रमाच्या ५३ व्या वर्षी कीलकनाम संवत्सर अर्थात इ. स. ११२८ चा आहे. See E. C. V. XI.

अन्य साधनावरून समंतभद्र एक ग्रंथकार, प्रतिभासंपन्न कवी, स्याद्वादसिद्धांत-पति, महान तत्ववेत्ता, अस्खलित वक्ता व विजेतावादी म्हणून त्यांची प्रतिष्ठा, ख्याति व महति तात्कालीन सर्वोत्कृष्ट विद्वानांत व राजराजेश्वरांत किती होती याची पुरेशी कल्पना येते. इतकेंच नव्हे परंतु जिनसेनाचार्योनीं आपल्या 'हरिवंशपुराण' यामधून समंतभद्र स्वामींची भारति अर्थात् वाणि (वक्तव्य) अंतिम तीर्थंकर भ. महावीरांच्या दिव्यध्वनीसमान असल्याचें प्रगट केले आहे. असे—**जीवसिद्धि..............शासनं**

**वचः समन्तभद्रस्य वीरस्येव विजृंभते ॥ ३० ॥**

## धर्मवाद-दिग्विजय.

श्रवणबेळगोळ येथील एका शिलालेखांत चरित्रनायकांच्या भारतीय धर्मवाद-दिग्विजयाचे हृदयस्पर्शी वर्णन आढळ होत आहे:—

पूर्वं पाटलिपुत्रमध्यनगरे भेरी मया ताडिता ।
पश्चान्मालवसिंधुठक्कविषये कांचीपुरे वैदिशे ॥
प्राप्तोऽहं करहाटकं बहुभटं विद्योत्कटं संकटम् ।
वादार्थी विचराम्यहं नरपते शार्दूलविक्रीडितम् ॥ १॥

यावरून आचार्यकालीन भारतांतील निरनिराळ्या विद्यापीठाच्या व धर्म-तीर्थांच्या ख्यात शहरांत व देशांत आचार्यांनी धर्मवादांत विजय मिळविला.

## ग्रंथनिर्मिति.

आप्तमीमांसा, युक्त्यनुशासन, जिनस्तुतिशतक, स्वयंभूस्तोत्र, रत्नकरंड, तत्वानुशासन, प्राकृत व्याकरण, प्रमाणपदार्थ, कर्मप्राभृतटीका, व गंधहस्ति-महाभाष्य इत्यादी ग्रंथांची रचना आचार्यांनी केली आहे.

## भावी तीर्थंकर.

घोर तपश्चर्या केल्यानें तीर्थंकरपद प्राप्तीचा पुण्यसंचय झाला आहे व भविष्यकालीन तीर्थंकरनामावलींत आचार्यांच्या नांवाचा समावेश झाला आहे.

**मंगलं भगवान् वीरो । मंगलं गौतमो गणी ।**
**मंगलं कुंदकुंदाद्यो । जैनधर्मोस्तु मंगलम् ॥**

---

# प्रस्तावना.

श्रावक-श्राविकांच्या आचारासंबंधीं निरनिराळ्या आचार्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांत श्रीसमंतभद्राचार्यांच्या **रत्नकरंड श्रावकाचाराचें** वैशिष्ट्य और आहे. मंगल व अंतिम प्रार्थनेसह केवळ १५० श्लोकांत श्रावकांच्या आचारांचा संग्रह करून जैनधर्मीयांना आचार्यांनीं चिरकाल ऋणि करून ठेविलें आहे. आज सुमारें १८०० वर्षे या चिमुकल्या पण देदिप्यमान रत्नत्रयाच्या करंडाला जैनसमाजानें शिरोधार्य केलें असून प्रामाण्य ग्रंथ म्हणून अजरामर होऊन राहिला आहे. कवि कांचन यांच्या 'काव्यरत्नांतील' काव्यमय भाषेंत या ग्रंथाचें थोडक्यांत वर्णन करावयाचें झाल्यास असें सार्थ म्हणतां येईल कीं 'असूनहि रत्नकरंडकांत प्रकाश त्याचा नसतांच जात.' (काव्यरत्न-सर्ग चौथा-श्लो. सं. १२)

शुद्ध व सुलभ भाषासरणी, तर्कशुद्ध मांडणी व थोडक्यांत आपलें विचार मांडण्याचे अजब पांडित्य आणि कला यांचा या ग्रंथांत सुंदर मिलाफ झाला आहे. सूत्रमय सुश्लोकाचा हा सुगंधित हार आहे.

जैन व इतर धर्मीयांना जैनधर्मी श्रावक-श्राविकाचें आचार व विचार कसें असावेत, याबद्दल ज्ञान करून देण्याचे हेतूनें हा यथामति प्रयत्न केला आहे. या ग्रंथातील श्लोकांचा अन्वयार्थ व भावार्थ देणारी हिंदी भाषेंत लहान मोठी बरींच पुस्तकें आहेत. आमच्या माहितीप्रमाणें मराठी भाषेंत फक्त दोन-तीनच अशी पुस्तकें आहेत. यापैकीं स्व. वा. भाऊराव बाबाजी लट्ठे यांनीं प्रसिद्ध केलेलें पुस्तक आज दुर्मिळ झालें आहे. श्री. विष्णुकुमार डोणगांवकर यांनीं लिहिलेलें पुस्तक आज उपलब्ध आहे. स्व. वा. शेट हिराचंद नेमचंद दोशी यांनीं प्रसिद्ध केलेलें पुस्तक फारच मोठें असून तेंहि हल्लीं दुर्मिळ आहे. अशा स्थितींत श्रावकांच्या आचाराचें ज्ञान सामान्य वाचकांनाहि व्हावें, या हेतूनें या पुस्तकांत श्लोकांचा अर्थ थोड्याशा अधिक खुलाशानें दिला आहे. केवळ अन्वयार्थ दिल्यानें अर्थबोध होणार नाहीं व मर्म समजणार

नाहीं अशी साधार भीति वाटल्यानें खुलासेवार अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थ देतांना पारिभाषक शब्दांचा उपयोग न करितां सामान्य वाचकांनाहि गुरूच्या मदतीशिवाय हा ग्रंथ समजून घेतां यावा ह्मणून त्या पारिभाषिक शब्दांच्या अर्थाचा हेतू देण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळें हें पुस्तक स्वतःच वाचून विद्यार्थ्यांना व इतरांना श्रावकाचार समजून घेतां येईल अशी आशा आहे. माझा हा प्रयत्न सिद्धीस गेला आहे कीं नाहीं, हें या विषयावरील इतर पुस्तकें वाचून तुलनेनें ठरविण्याचें काम वाचकांवरच सोपविणें युक्त आहे. वैदिक धर्मातील तत्वाचेंहि वाचकांना अल्प तरी ज्ञान व्हावें ह्मणून प्रसंगानुसार त्या धर्मातील धर्मवचनेंहि दिलीं आहेत. शिवाय निरनिराळी परिशिष्टें व इतर आचार्यांचीं मतें देऊन हें प्रस्तुत पुस्तक उद्बोधक करण्याचा यथामति व यथाशक्ति प्रयत्न केला आहे.

## धर्म.

या पुस्तकांत श्रावकांचा आचार-धर्म-सांगितला आहे. क्रियाकांडाचे यांत वर्णन नाहीं. फक्त तत्वें सांगितलीं आहेत. आचार असाच कां असावा, याचा हेतूहि सांगितला आहे. अर्थात **धर्म** ह्मणजे काय चीज आहे व कोणती प्रचंड शक्ति आहे, याची थोडीशी कल्पना देणें अनाठायीं होणार नाहीं. धर्मसंस्था अस्तित्वांत कां आली ? आज पृथ्वीच्या पाठीवर अनेक धर्म कां दिसत आहेत ? इत्यादिबद्दल थोडीशी कां होईना कल्पना असणें जरूर आहे. धृ-धरणें या धातुपासून धर्म शब्द बनला आहे. धरतीति स-धर्मः किंवा धारयतीति स धर्म ह्मणजे तारण, संरक्षण व उद्धार करण्यास समर्थ अशी जी शक्ति तो धर्म होय. संसारांतून तारून नेण्याचें व ससारापासून संरक्षण करण्याचें सामर्थ्य ज्यांत आहे-संसार दुःखतस्सत्वान यो धरति त्याला धर्म ह्मणावें. श्लोक संख्या दोन व तीनमध्यें आचार्यांनीं धर्माचें लक्षण-स्वरूप वर्णिलें आहे. सूक्ष्म विचार करणाऱ्यांना धर्म एकच आहे, असें दिसून आलें आहे. शाश्वत सुख हें धर्माचें अंतिम ध्येय आहे. ज्या सुखाचा मार्ग धर्म दाखवितो, तें

इंद्रियजन्य सुख नव्हे. संसारिक सुख इंद्रियजन्य असते. पंचेंद्रियापासून मिळणारें जें सुख तें इंद्रियजन्य सुख होय. तथापि अशा सुखापासून अलिप्त राहण्यास धर्म सांगत नाहीं. त्यांत आसक्ति ठेवूं नका, असें तो सांगतो. धनदौलत, शरीरसंपत्ति, पुत्रपौत्र, चक्रवर्तिपद व अहमिंद्रपद अशी संसारिक सुखें हीं खरी-शाश्वत सुखें नव्हत. जन्मजरा मरणादिकांच्या फेऱ्यांतून सुटका झाल्यामुळें आत्म्याला जें अविनाशी व चिरंतन सुख मिळतें, तेंच खरें व शाश्वत सुख आहे व असें शाश्वत सुख मिळविण्याचें मार्ग अगर उपाय सांगणारा तो धर्म होय. नऊ कोटी नारायण होणें अगर चक्रवर्ति सम्राट-पद मिळणें हें इहलोकांतील मोठें-पण आहे. अहमिंद्र पदप्राप्ती मिळणें म्हणजे स्वर्गांतील मोठेपण, पण हीं नश्वर आहेत. आत्म्याला परमसुखाची-परमेष्टीपदाची--प्राप्ती झाली कीं तें सुख व तें पद शाश्वत असतें. त्या पदप्राप्तीनंतर फिरून जन्म नाहीं, म्हातारपण नाहीं व मरणहि नाहीं; असें ऐश्वर्य मिळविण्याचा जो मार्ग-तो शाश्वत सुखमार्ग कल्याणकारी मार्ग-श्रेयोमार्ग होय, असें सुख मिळविणें हें सर्वच धर्मांचें एक-मेव अंतिम ध्येय आहे; जन्म, जरा व मृत्यू यांच्या-त्रिविध-तापांतून मुक्तता हें धर्मांचें ध्येय. हें ध्येय गांठणाऱ्यांना आत्मज्ञानी, ब्रह्मज्ञानी आणि परमेष्टि इत्यादि नांवानें ओळखलें जातें.

द्रव्यक्षेत्रकालभावाला अनुसरून या धर्मांचीं निरनिराळीं बाह्य स्वरूपें दिसतात. शरीरसंरक्षणासाठीं कपड्याची जरूरी आहे. परंतु देश, काल व परिस्थितीच्या मानानें त्या कपड्याला निरनिराळा आकार देऊन शरीराचें संरक्षण केलें जातें. कोट, जाकीट, शर्ट, धोतर, विजार इत्यादि इत्यादि. इतर धर्मांची गोष्ट दूरच. खुद्द जैनधर्मांतहि असें स्थित्यंतर घडलें आहे. असा एक काल होता कीं, ज्यावेळीं ही भूमि भोगभूमी होती, त्यावेळीं कोणताहि धर्म अस्तित्वांतच नव्हता. त्यावेळीं हें माझें व तें परक्याचें असा भेदभावच नव्हता. साम्यवादाचें-समतावादाचें-एकछत्री राज्य नांदत होतें. राजा म्हणून कोणी अधिकारी नव्हता. सेव्यसेवक नातें नव्हतें. गरीबश्रीमंत हा भेद नव्हता.

अत्याचार-अनाचार नव्हतें. अकालमृत्यु नव्हता—अर्थातच रोगराई नव्हती. सुखाचा, शांतीचा व स्वातंत्र्याचा तो काल होता. या कालाची जैनधर्मशास्त्र्यांनीं उत्कृष्ट कालांत गणना केली आहे. अशावेळीं व स्थळीं धर्मशांचे कारण नव्हतें. शांत व शीतल वायूचा भरपूर पुरवठा निसर्ग करीत असतो; त्यावेळीं कृत्रिम पंख्याच्या वाऱ्याची ती जरूर कोठून असणार ?

हा काल बदलला. समाजात विषमता उत्पन्न झाली. आपपरभाव उत्पन्न झाला. हें माझें, तें तुझें नव्हे; अशी स्वार्थी भावना उत्पन्न झाली. जीवनकलहाचा प्रश्न उभा राहिला. सर्वत्र कष्ट व दुःखमय वातावरण निर्माण झालें. अशावेळीं समाजस्वास्थ्यासाठीं, चित्त व वित्त आणि दुर्बलांच्या संरक्षणासाठीं कांहीं नियम व निर्बंध घालणें क्रमप्राप्त झालें व त्यालाच धर्म हें नामाभिधान प्राप्त झालें. भोगभूमि नष्ट झाली व धर्म अस्तित्वांत आला असें म्हटल्यानें धर्म अनादि नाहीं अशी शंका येईल परंतु धर्मतत्वें अनादि व सनातन आहेत यामुळें धर्म अनादि व सनातनच आहे. आचार्यवचनांत मतभिन्नतेची जी उदाहरणें आढळ होतात, त्यांचेहि मूळ बदललेल्या देश, काल व परिस्थितीत असावें अशीहि शंका येते.

## धर्माची हिंदुधर्मीय व्याख्या.

महाभारत शांतिपर्वांत व्यास मुनींनीं धर्माची जी व्याख्या केली आहे, तिची ओळख करून देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

> धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः ।
> यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥

**सारांशः**—ऐहिक व पारलौकिक कल्याणाकरितां धर्म आहे. ऐहिक कल्याणांत केवळ स्वहिताचाच समावेश केलेला नाहीं. सत्प्रवृत्तीमुळें वैयक्तिक आत्मकल्याण व परहित हीं एकाचवेळीं साधतात. स्त्री व पुरुष हीं संसाराचीं जशीं दोन चाकें आहेत तद्वतच सत्प्रवृत्तीमुळें वैयक्तिक हित व आत्मकल्याण आणि परहित असा दुहेरी लाभ होतो. ज्यामुळें केवळ मानवमात्राचें नव्हे

नर अखिल प्राणिमात्रांचें कल्याण होते व उद्धार होतो त्याला धर्म ह्मणतात. वरील श्लोकांतील **धारण** शब्द हा अत्यंत महत्वाचा व व्यापक अर्थाचा शब्द आहे. मानवजातीचा व अखिल प्राणिमात्रांचा इह व परलोकीं उद्धार व उत्कर्ष करण्यास जी जी सत्प्रवृत्ती कारणीभूत होते, त्या त्या सत्प्रवृत्तीला धर्म असें मानिलें जातें; कारण ती स्व व परहितकारक असते. अशा उद्धाराची प्रचंड शक्ति ह्मणजे धर्म.

शास्त्यांनीं जीं बंधनें व जे नियम घातले आहेत, त्यांत उच्च हेतू आहे; व विशिष्ट उद्देश डोळ्यांपुढें ठेवून तीं घातली आहेत. व्यास ह्मणतात कीं,

**लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियमः कृतः ।**

तसेंच **प्रभवार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम् ।**

**सारांश:**—लोकयात्रेकरितां-समाजासाठीं-नियम व बंधनें घातली आहेत. तसेंच हे नियम व हीं बंधनें ईश्वर नावची कोणा अदृष्ट व अव्यक्त व्यक्तीनें घातलेलीं नाहींत. समाजांतील थोर, विद्वान व दूरदृष्टी व्यक्तींनीं निष्कामबुद्धीनें हितोपदेश केला आहे. यासाठीं जैनधर्म अशांनां केवलज्ञानी व हितोपदेशी इत्यादि अर्थपूर्ण नांवानें संबोधितो. केवलज्ञानी व हितोपदेशी यांनींच हे निर्बंध व नियम प्रथमच व नव्यानें सांगितलें कीं काय? अशी शंका येणें साहजिकच आहे. जैनधर्म अनादि आहे व तो सनातन आहे. निरनिराळ्या अनेक कारणामुळें समाजाला या नियमाचा व निर्बंधाचा विसर पडतो, विकृत स्वरूपांत तें आचरिलें जातात. निर्बंध व नियम यांत भेसळ होते. अधर्माला धर्म मानिलें जातें. हेतूबद्दल व ध्येयाबद्दल गैरसमज पसरला जातो. अशावेळीं केवली व हितोपदेशी त्याचें सत्यस्वरूप समाजाला दाखवून देऊन समाजाची दृष्टी साफ करितात. सोन्यावर चढलेलें किटन तें सोनें धुवून पुसून अथवा तापविल्यानें नाहींसें होतें; व तें मूळ स्वरूपांत दिसूं लागतें. तद्वतच धर्मावर चढलेले किटन केवलज्ञानी व हितोपदेशी धुवून व पुसून काढून तो सत्यरूपांत जगाला दाखवितात. तें नवें सोनें नव्हे व हितोपदेशी यांनीं

सांगितलेला धर्महि नवा नसतो, म्हणूनच धर्म अनादि व सनातन आहे. हिंदु-धर्मांतील अवताराची कल्पनाहि हेंच सांगत आहे.

महाभारतांत 'न हर्तव्यं परधनं एष धर्मः सनातनः,' तसेंच 'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात्, प्रियं न नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः,' आणि परस्पर उपकार इत्यादिकांना सनातन धर्म असें म्हटलें आहे. धर्म हा सनातन आहे असें म्हणतांना अहिंसादि धर्मतत्वें सनातन आहेत असेंच समजावयाचें आहे.

जैनधर्मांतच काय पण कोणत्याहि धर्मांत हिंसादि पांच पातकापासून दूर राहण्याचाच उपदेश सांगितला आहे. मांसाहारी म्हणून प्रसिद्ध असलेल्या ख्रिश्चन व महंमदीय धर्मसंस्थापकांनीं हिंसा करूं नका असाच उपदेश केला आहे. जैनधर्मीय अहिंसा तत्वांत व इतर धर्मीयांच्या या महान तत्वांत फरक नाही असें नाहीं. मात्र तो फरक अंशाचा आहे. या अहिंसा तत्वाचा जैनधर्मांत जितका सखोल व सूक्ष्म विचार झालेला आहे, तितका विचार इतर धर्मियांनीं केलेला नाहीं, हें खरें आहे; परंतु त्याला तशींच कांहीं बलवत्तर कारणेंहि आहेत. महंमद पैगंबराच्या पूर्वी पैगंबरांच्या जन्मभूमींत नरमांस भक्षण केलें जात होते. महंमद पैगंबराला या राक्षसी व अमानुष कृत्यापासून जनतेला परावृत्त करावयाचें होतें. कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नका, असा उपदेश लोकांच्या गळीं उतरविणें महंमद पैगंबरासारख्यालाहि शक्य झालें नसतें; अशावेळीं नरमांसभक्षणापुरतीच त्यानें आपल्या कार्याची व्याप्ति ठेविली व त्यांत यश मिळविलें. काल, देश व परिस्थितीच्या प्रभावापुढें त्याला अंशतः नमावें लागलें. पैगंबरांच्या अनुयायांनीं नंतर अहिंसाधर्माची व्याप्ति वाढविली असें त्या धर्माच्या ग्रथावरून दिसून येतें.

वैदिक धर्मांतहि नरमेध, अश्वमेध इत्यादि यज्ञ होत. मात्र गोवध त्याज्य मानिला गेला होता. हल्लींप्रमाणेंच भारत त्यावेळींहि कृषिप्रधान देश होता. गाईच्या लेकरावर शेती अवलंबून असल्यानें गोवध त्याज्यच मानून समाधान न मानितां गोसंरक्षणाचें महत्व सांगितलें आहे. द्रव्य-क्षेत्र-काळ इत्यादिकांचा हा परिणाम आहे.

खऱ्या ब्राह्मणांचा सत्कार कोंवळ्या लुसलुसित बकऱ्याचें मांसान्न देऊन केलें जात असें. तथापि या विचारांत क्रांति घडली व पुढें पुढें हे यज्ञ त्याज्य मानून त्याच्या ऐवजीं पिठाच्या कणकेचा प्राणी करून यज्ञ उरकण्यांत येऊं लागले. येशू खिस्ताचीहि हिंसादि पातकें न करण्याबद्दल आज्ञा आहे. सांगण्याचा मतलब हा कीं मुख्य तत्वामध्ये फरक नाहीं. कालमानदेशपरिस्थिती विचारांत घेऊन त्याला निरनिराळें स्वरूप दिलें गेलें; व कित्येकांनीं एखाद्या तत्वालाच अधिक महत्व दिल्यानें त्या अंशालाच धर्म असें मानण्यांत येऊं लागलें. कित्येक वेळां आंब्याच्या झाडाच्या एखाद्या फांदीलाच मोहोर येतो व त्याला आंबफळ येतें. अशावेळीं त्या फांदीला तेवढेंच आंब्याचें झाड मानावें व मुख्य बुंधा आम्रवृक्ष नव्हे असें समजावें, अशी स्थिती झाली व सांप्रदायाचें बंड माजलें.

खिश्चन धर्मातील रोमन क्याथॉलिक व प्रॉटेस्टंट या पंथामधील सांप्रदायिक वादांत हजारो नव्हें लाखों लोकांचे प्राण-नाहक बळी पडले. तीच परिस्थिती शैव व वैष्ण अगर शिया व सुनी या सांप्रदायिक भेदामुळें झाल्याचें इतिहास सांगत आहे. फार दूर कशाला, समतावादी जैनधर्मालाही या दुहीच्या पिशाचानें पछाडल्याशिवाय सोडिलें नाहीं. पंथ व सांप्रदाय भेद उत्पन्न झालें व त्याची कटु फळें जैनसमाजास भोगावीं लागत आहेत. धर्माचें अस्तित्व केवळ पारलौकिक हितासाठींच आहे, अशी कित्येकांची भ्रामक समजूत आहे. इहलौकिक सुखासाठीहि धर्माची जरूरी आहे. हिंसादि पांच पातकांचाच विचार केला व स्थूलमानानें त्या पातकांपासून जग जरी अलिप्त राहिलें तरी काय बहार होईल? यांची कल्पनाही करवत नाहीं. हिंसा नाहीं, चोरी नाहीं, खोटे बोलणें नाहीं, परस्त्रीचा अभिलाष नाहीं व संपत्तीची भलती हाव नाहीं, असें जग निर्माण झालें तर पृथ्वीतरच स्वर्ग अवतरला इतकें तरी खास मानावें लागेल. पांच पातकांमुळें होणारी आपत्ति टाळण्यासाठीं शास्त्यांनीं प्रयत्न केला व या प्रयत्नाच्या पोटीं धर्माचा उदय झाला.

पुढें पुढें या धर्माच्या बंधनाला झुगारून देणाऱ्यांचें काय करावें? त्यांना शासन कसें द्यावें? हा प्रश्न साहजिकच उत्पन्न झाला. राज्यसंस्था व धर्मसंस्था ही जोंपर्यंत एकत्र वास करीत होत्या तोंपर्यंत हीं पातकें करणाऱ्याला राज्यसंस्था दंड व शिक्षा करी; परंतु पुढें या दोन संस्थांची फारकत झाली. सत्ता विभागली गेली. त्याचा परिणाम असा झाला कीं धर्माधिकाऱ्यांची सत्ता लुळी पडली. धर्मविरुद्ध आचरण करणाऱ्यांच्या हातीं प्रायश्चित्ताची व बहिष्काराची बोथट हत्यारें राहिली. पुढें पुढें तर धर्माधिकाऱ्यांची सत्ता जवळ जवळ नष्ट झाली. हीं बोथट हत्यारेंहि त्यांच्या हातची गळली व राज्यसंस्थेनें पाप्यांना प्रायश्चित देण्याचें काम आपल्याकडे घेतलें. अलीकडील कायद्यांचा जन्म या परिस्थितींत झाला.

हिंसादि पांच पातकांपैकीं पहिल्या चार पातकांचा गुन्हा या सदराखालीं पिनलकोडांत समावेश केला गेला आहे; फार काय अहिंसादि अणुव्रतांचे जे अतिचार ह्मणून सांगितलें आहेत, त्यांचाहि गुन्हा या सदराखालीं समावेश झाला आहे. उदाहरणार्थ श्लोक संख्या ५४ मध्यें अहिंसाणुव्रताचें छेदन, बंधन, ताडण, अतिभारारोपणादि असें पांच अतिचार सांगितलें आहेत; तसेंच श्लोक संख्या ५८ मध्यें अचौर्याणुव्रताचें चौरप्रयोग, चौरार्थदान, विलोप इत्यादि पांच अतिचार सांगितलें आहेत. या अतिचारामुळें व्रतभंग होत नाहीं असें धर्मशास्त्रकार मानीत आले परंतु हल्लींच्या कायदे करणाऱ्यांनीं या सर्व अतिचारानांहि गुन्ह्याचें स्वरूप देऊन गुन्हा या सदराखालीं त्यांचा समावेश केला आहे.

## धर्माचें ध्येय.

धर्मशास्त्रकारांनीं या निर्बंधाचा इहलौकिकदृष्ट्याच मात्र विचार केलला नाहीं. त्यांनीं आपल्यापुढें फारच उच्च ध्येय ठेविलें. धर्मबंधनें पाळून स्वर्ग मिळाला तरी त्यांचें समाधान झालेलें नाहीं; मुक्ति हें ध्येय त्यांनीं जनतेसमोर ठेविलें. विद्यमान कायदे स्वर्गसुखाची व मुक्तीची आशा दाखवीत

नाहींत. कायद्यांची व्याप्ति इहलौकिक सुखापुरतीच आहे. समाजांत शांति, स्वास्थ्य व स्वातंत्र्य नांदावें एवढेंच ध्येय कायदेपंडितांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेविलें आहे. व्यावहारिक उदाहरण ह्मणून आजच्या चळवळीचें घेतां येईल. म. गांधींनीं संपूर्ण स्वराज्य हें राजकीय ध्येय ठेविलें आहे. हें ध्येय गांठण्याची ज्यांची कुवत नाहीं तें वसाहतीचें स्वराज्य हें आपलें ध्येय ठरवितात व त्यांच्याहि मागें असणाऱ्यांचें ध्येय सुराज्यापुरतेंच आहे. तीर्थंकरांनीं मुक्ति हें ध्येय ठेविलें. कायदेपंडितांनीं सामाजिक स्वास्थ्य इतक्यापुरतीच आपल्या ध्येयाची व्याप्ति ठरविली. तीर्थंकरांच्या अगर धर्मज्ञांच्या या उच्च ध्येयाची मजल मारणारे फारच थोडे; मात्र या धर्माज्ञेमुळें व पापाच्या भीतीनें सामाजिक स्वास्थ्याला मदत करणाऱ्यांची संख्या बरीच मोठी आहे. अनेकांचें हित ज्यांत अधिकांत अधिक आहे ते श्रेयस्कर व कल्याणकारक या दृष्टीनें धर्माज्ञेकडे पाहतां धर्माचें ध्येय इहलौकिक सुख हेंच ठरेल. पारलौकिक सुख हेंच धर्माचें एकमेव ध्येय, असें मानणाऱ्याचें मत चुकीचेंच आहे, असें ह्मणण्याचा इरादा नाहीं.

## हिंदुधर्मांतील कांहीं आधार.

वैदिक धर्मांतील खालील धर्मवचनावरून धर्म परिवर्तनशील व परिवर्तनक्षम आहे, असें मानिल्याचें दिसतें. असें मानतांना लोककल्याण या नांवाखालीं धर्मांत ज्या अनेक बाबींचा समावेश केला जातो, त्या बाबी विचारांत घेऊन वा धर्म हा सापेक्ष आहे, असें समजून हीं वचनें घातली गेली असावीत असें मानण्याला जागा आहे.

**कारणाद्धर्ममन्विच्छेत् न लोकचरितं चरेत् ।**

तसेंच **न धर्मः परिपाठेन शक्यो भारत वेदितुम् ।**

या उक्तीवरून स्पष्ट होईलच. तथापि पुढील व्यासवचन महत्वाचें आहे.

**भवत्यधर्मो धर्मो हि धर्माधर्मावुभावपि ।**
**कारणाद्देशकालस्य देशः कालः स तादृशः ॥**

**सारांशः**—देश, काल व परिस्थितीप्रमाणें धर्म बदलतो. देशकालपरिस्थितीसापेक्ष धर्म असतो. देश, काल व परिस्थिती ही विचारांत घेऊन

बुद्धीनें व विवेकानें धर्म कोणता व अधर्म कोणता, हें ठरविणें कांहीं वेळां क्रमप्राप्त आहे. अशा प्रसंगाला उद्देशून नारद स्मृतीमध्यें ह्मटलें आहे कीं,—

**धर्मशास्त्रविरोधे तु युक्तियुक्तो विधिः स्मृतः ।**

**भावार्थः**—निरनिराळ्या धर्मशास्त्रांत विरोध व मतभिन्नता दिसल्यास त्या मतापैकीं युक्त कोणतें व अयुक्त कोणतें, हें विवेकाची कसोटी लावून ठरवावें. विवेकाच्या कसोटीला दिलेला हा अधिकार अर्थातच अत्यंत काळजी-पूर्वक वापरला पाहिजे. याच प्रसंगीं धर्मशास्त्रकारामध्यें मतभेद कां व्हावेत ? हा प्रश्न अत्यंत गंभीरतेनें विचार करण्यासारखा नाहीं ? परिस्थिती हेंच एक या मतभेदाचें कारण आहे. विवेकाची कसोटी लावल्यानंतर त्याचा निष्कर्ष असा निघाला कीं—' निष्प्रयोजनं सप्रयोजनेन बाध्यते.' जें बंधन अप्रयोजक दिसेल त्याची जरूरी नाहीं. तें बंधन मुदतींतून गेलें असें समजून ज्याचें प्रयोजन आहे व ज्याची जरूरी आहे, त्याचा अमल करावा.

धर्माची व्याख्या विचारात घेतां प्राणिमात्राचा उद्धार करणाऱ्या शक्तीला धर्म असें ह्मटलें आहे, असें दिसून येईल. व्यक्तीचा, समाजाचा, देशाचा, राष्ट्राचा फार काय अखिल जगताच्या उद्धाराची व अभ्युदयाची जबाबदारी घेणारी शक्ति ह्मणजेच धर्म.

या उद्धारांत अनेकांच्या अनेक प्रकारच्या उत्कर्षाचा समावेश होतो. जगांतील अज्ञान, दारिद्र्य, रोगराई आणि अनेक प्रकारची दुःखें नष्ट होवून व जगांत शांतीचें, सौख्याचें व समतावादाचें एकछत्री साम्राज्य नांदावें. या इहलौकिक अभ्युदयाबरोबरच पारलौकिक सुखाचाहि या अभ्युदयात समावेश होतो. अंतिम ध्येय मुक्ति, असें मानण्यांत आलें असलें तरी त्या ध्येयाला पोंचणारा फारच विरळा. अनेकांचें अनेक प्रकारचें हित इहलौकिक अभ्युदयांतच समाविष्ट झालें असल्यानें अनेकांची दृष्टी या सुखाच्या प्राप्तीकडेच राहिल्यास नवल नाहीं.

आचार्य समंतभद्रांच्या या छोट्याशा कृतीची रचना विचारांत घेतांहि वरील विचारसरणीचें प्रतिबिंब त्यांत दिसून येईल. अणुव्रतें, गुणव्रतें व

शिक्षाव्रतें, तसेंच महाव्रतें आणि मुनिधर्म इत्यादिकांची परंपरा व मतिश्रुत-केवलज्ञानादिकांची चढती श्रेणि विचारांत घेतां अनेकांच्या ऐहिक सुखाची प्रथम काळजी वाहण्यांत आली आहे, असेंच दिसून येईल.

धर्म एकच आहे, तो इह व पारलौकिक सुखमार्ग दाखविणारा व तो परिवर्तनशील आहे. तसेंच द्रव्य-क्षेत्र-काल यामुळें धर्माचें स्वरूप भिन्न दिसतें इत्यादि विचार यापूर्वी मांडिले आहेत. ही विचारसरणी अनेकांना पटणारहि नाहीं. अंतिम ध्येयाकडे नेणारे मार्ग भिन्न भिन्न असले तरी अंतिम ध्येय एकच आहे, हें मानिलें तरी धर्म एकच आहे, असेंच मानावें लागेल. धर्माचें अंतिम ध्येय मुक्ति. मुक्ति मिळविण्याचे मार्ग भिन्न. दिल्लीला जावयाचे आहे तर निरनिराळ्या मार्गानें पोंचता येतें; तद्वतच धर्ममार्गाचें आहे. वैदिक-धर्म ईश्वराचें अस्तित्व मानतो-आम्ही जैनधर्मीय मानीत नाहीं. वैदिक व जैनधर्म परलोक मानितात. इतर धर्मीय परलोक मानीतच नाहींत असें नाहीं मात्र परलोकाची व मुक्तीची त्यांची कल्पना थोडीशी भिन्न आहे. ईश्वर सर्व कांहीं करतो असें वैदिकधर्मीय मानितात. जैनधर्मीय पाप अगर पुण्यामुळें सर्व कांहीं घडतें असें मानितात. ईश्वराच्या जागीं पापपुण्य अगर पापपुण्याचें ठिकाणीं ईश्वर असें वाचल्यास स्थूलमानानें या धर्मांतील ठळक मतभेद मिटतील. अशा दृष्टीनें विचार केल्यास धर्म एकच आहे, असें दिसून येईल.

अखिल प्राणिमात्राचा कल्याणकारी **मित्र** धर्म आहे. जगाच्या कल्याणांत व हितांत आपलें कल्याण व हित आहे. हिंसादि पांच पातकें करूं नयेत, त्यापासून दूर रहावें, अशी सर्वच धर्मांची आज्ञा आहे; व त्यापासून राहण्यांतच सर्वांचें हित व कल्याण आहे. नाक, कान इत्यादि अवयवांच्या पंचेंद्रियसमुच्चयाचें शरीर होतें; अगर या समुच्चयांना शरीर-देह म्हटलें जातें. प्रत्येक अवयवांची क्रिया निराळी असत व शरीरधारणाला त्यांची जरूरी आहे. अहिंसादि व्रतांच्या समुच्चयाला धर्म म्हणतात. गुणव्रत व शिक्षाव्रत हें अहिंसादि पांच व्रताचें सहाय्यक असल्यानें त्यांची शीलव्रतात गणना केली आहे. शील-व्रतांच्या पालनामुळें पंचाणुव्रतांचें पालन दृढ व दृढतर होत जतें.

अहिंसादि पांच व्रतांच्या समुच्चयाला धर्म असें कां मानिलें आहे? याचा थोडासा विचार कर्तव्य आहे. अहिंसादि पांच व्रतांचें अगर धर्माच्या पंचेंद्रियांचें पालन करावयाचें झाल्यास आठ प्रकारचे गर्व-मद-सोडावे लागतात. सप्तव्यसनांचा त्याग करावा लागतो. या पांच व्रतांचा, गर्वांचा व सप्तव्यसनांचा अन्योन्य संबंध काय? राग-द्वेषादिकांच्या कषायामुळेंच हिंसादि पांच पातकें घडतात. रागद्वेषादिकांचा त्याग केल्यानें पातकें घडत नाहींत असें ह्मटलें आहे. याचा अर्थ असा कीं, इतराबद्दल आपल्या मनांत समता-समभावना-उत्पन्न होते. समता उत्पन्न झाली, आपपर भाव नष्ट झाला, सर्व जगांतील प्राणिमात्र आपले मित्र आहेत व आपण त्यांचा सखा आहों अशी भावना व कृती होऊं लागल्यास दुःखाचें व पापांचें कारणच उरत नाहीं. पापाचें कारण राहिलें नाहीं ह्मणजे इहलोकींचें व परलोकींचें सुख मिळण्यास अवधि तो कोणता? धर्माचें खरें स्वरूप तें हेंच व याच स्वरूपाचें वर्णन या ग्रंथांत आचार्यांनीं वर्णिलें आहे. आचार्यांनीं सुरवातीस ‘ संसारदुःखतःसत्वान यो धरत्युत्तमे सुखे ’ अशी धर्माची व्याख्या केली आहे. संसाराच्या फेऱ्यांतून सोडवणूक करून उत्तम-चिरंतन-सुखाची प्राप्ति करून देण्यास धर्मच समर्थ आहे. असें चिरंतन सुख मिळविण्यासाठीं गृहस्थी लोकांनीं काय काय करावयास पाहिजे याबद्दल या ग्रंथांत सांगितलें आहे. मागील उपाय पुढील उपायास उपकारक व मदत करणारा ठरतो. इमारत बळकट होण्यासाठीं चांगल्या पायाची जरूरी असतें, हें खरें आहे. मात्र पाया चांगला घातला व इतर बांधकाम व्यवस्थित झालें नाहीं तर केवळ पाया बळकट आहे ह्मणून सर्वच इमारत मजबूत राहणार नाहीं. तद्वतच गुणव्रत-अहिंसादि व्रतांना वाढविणारीं-व्रतें व शिक्षाव्रतें-दान, सल्लेखना व समाधिमरण यांचें महत्व आहे. सामायिक-व्रतपालनामुळें कांहीं विवक्षित कालपर्यंत मुनी अवस्थेला श्रावक पोंचतो तर सल्लेखना या समाधिमरणामुळें अधिक काळ व अखेर मुनीपदाची प्राप्ति श्रावकास होते. आचाराचा असा विकास करण्यांत आला आहे. आचाराची ही प्रगति आहे.

सारांश, हें पुस्तक वाचतांना सम्यग्दर्शनादिकांना रत्नत्रय कां म्हटलें आहे, हिंसादि पांच पातकांपासून दूर रहावें असें कां सांगितलें आहे, असें सांगण्याचा हेतू काय आहे, त्याचा परिणाम काय होतो, इत्यादिकांबद्दल विचार करावा. केवळ भाषांतर समजल्यानें हेतू समजणार नाहीं, खऱ्या धर्माची ओळख होणार नाहीं; हेतू न समजून घेतां, केलेलें वाचन पालथ्या घागरीवरील पाण्याप्रमाणें फुकट जाणार आहे.

## जैनधर्माची संग्राहकता व उदारता.

जैनधर्म संग्राहक आहे व तो उदार आहे. पतित, पातकी, दुःखी व अबला या सर्वांचा सारखाच उद्धारक आहे. मात्र जैनधर्माला शरण गेलें पाहिजे. शरण जाणें याचा अर्थ जैनधर्मानें सांगितल्याप्रमाणें आपला आचार व विचार ठेवणें. श्रद्धा, ज्ञान व आचार या रत्नत्रयांत तो साठविलेला आहे.

सम्यग्दर्शन म्हणजे श्रद्धा. खरा देव, गुरू व शास्त्र यावर नितांत श्रद्धा ठेवण्याचा पहिला धडा दिला आहे. सम्यक्चारित्रांत आचार व विचार यांचा समावेश झालेला आहे. विचार व आचार आणि क्रियाकांड हें थोडेंच भिन्न आहेत. विचार व आचार यांच्या पूर्णतेसाठीं क्रियाकांडाची जरूरी नाहीं असें नाहीं; परंतु धर्मतत्वें व क्रियाकांडाचें रहस्य न समजल्यानें क्रियाकांडालाच धर्म असें समजलें जात आहे. नारळ म्हटला म्हणजे कवच, खोबरें व त्यांतील पाणी इत्यादिकांचा बोध समजून न घेतां केवळ कवचाला नारळ समजावें, अशी स्थिती धर्मतत्वें, आचार, विचार आणि क्रियाकांड याबाबतींत झालेलें प्रत्यहीं अनुभवास येत आहे.

येथवर धर्माचें जें विवेचन केलें आहे तो धर्म हवा आहे. त्या धर्माची वृद्धि व्हावी, एवढेंच नव्हें तर तो सगळ्या जगताचा-सार्वधर्म-धर्म व्हावा. शांति, सौख्य, सुबत्ता, निरोभिता, ज्ञान इत्यादिक इष्ट गोष्टींचें साम्राज्य व्हावें. शांति, सौख्यादिकांचें साम्राज्य होण्यास समता, विश्वबंधुत्व, इत्यादि सद्‌गुणांची वृद्धि व ईर्षा, असुया, मद, मोह इत्यादि दुर्गुणांचा लोप निदानक्षय तरी होणें

जरूर आहे. श्रावकाचारांत पद्धतशीर रीतीनें हा उपक्रम केला आहे. मानवी प्राण्याच्या मनाची ठेवण विचारांत घेऊन ही ग्रंथरचना आहे.

आजच्या व्यवहारांत व आचारांत अनेक गोष्टींचा धर्म या सदराखाली समावेश करण्यांत आल्यानें जनता सामान्यतः खऱ्या धर्मापासून दूरच राहि- ल्याचें दिसतें. बालव्रत, आदितवारव्रत, भोपळाव्रत, हजामत, सुतक, श्राद्ध, उत्तरक्रिया, बारसे, चातुर्मासांतील व्रत उद्यापन, विधवावपन, विवाह इत्यादि इत्यादि अनेक घडामोडीबद्दल बंधनें घालून त्या बंधनाला धर्म हें नांव दिलें जात आहे. जातिधर्म, कुटुंबधर्म, मनुष्यधर्म, पिता-पुत्रधर्म, गुरु-शिष्यधर्म, पति-पत्निधर्म, राजधर्म, सेवकधर्म, इत्यादिकांना धर्म असेंच संबोधिलें जातें. विद्यमान अनेक कायदे पाळणें यालाहि धर्मच ह्मणतात. फार काय भिक्षेकरीहि धर्म वाढा ह्मणून याचना करितो व मूठभर धान्य कपाळाला आठ्या घालून चारचौघांना दिलें तरी धर्म केला असेंच व्यवहारांत समजलें जातें.

मानवजातीच्या इह व पारलौकिक सुखाकरितां व समाजाच्या स्वास्थ्या- साठीं व धारणेसाठीं निर्माण झालेल्या खऱ्या बंधनाकडे दुर्लक्ष होवुन खाणें- पिणें, निजणें-बसणे, स्पृश्यास्पृश्यता, अन्नशुद्धि, शरीरशुद्धि, केशवपन कीं, केशकर्तन इत्यादिक बाबतींत निर्माण केलेल्या निर्बंधांत गुरफटून जात आहों. समता, शांतता व विश्वबंधुत्व जगांत निर्माण करण्याची शक्ति जैनधर्मांत आहे, असें मानत असतां स्पृश्यास्पृश्यता, उच्चनीचता, गरीब-श्रीमत, ज्ञानी-अज्ञानी, इत्यादि इत्यादि भेदभावाला आश्रय देणाऱ्यालाच नव्हे तर त्यांचा गर्व उत्पन्न होईल, अशा निर्बंधाला धर्म कसें ह्मणावें ?

## स्पृश्यास्पृश्यता.

स्पृश्यास्पृश्यता ही मानवीप्राण्यापुरतीच राहिली नाहीं. पशु, पक्षी व अचेतन पदार्थ फार काय तीन लोकांपैकीं नरक, यांतहि स्पृश्यास्पृश्यता गेली. पशुयोनींतील कांहीं पशु शुभ, कांहीं स्पृश्य, कांहीं अशुभ तर कांहीं अस्पृश्य, असें मानिलें जातात. पशुप्रमाणेंच पक्षांतहि वर्गीकरण झालें. अचेतन पदार्थांत कांदा, लसूण, मुळा, गाजरा, कलिंगडे, पडवळ इत्यादि अनेक अशुभ-त्याज्य-

अस्पृश्य मानिले गेलें. वांग्यांत तर पोटजाति करून पांढरें वांगें वर्ज्य व काळें स्वीकारार्ह असें ठरविलें. नरकाला अस्पृश्य मानिलें. कुत्रा, मांजर इत्यादिकांची, कांदा व पांढरें वांगें यांची, कावळा, गिधाड यांची व नरकाची तरफदारी करणारे कोणी भेटले नसावेत असें दिसतें. दांतावरून जनावरांचे भेद पाडेले. दांतांची तीच कसोटी मानवीप्राण्याला कां लावूं नये ?

## प्राचीनकालीन जाती.

जाति गुणाधिष्ठित असोत वा जन्मावर अवलंबिलेल्या असोत, प्राचीनकालीं (१) देशभेदामुळें (२) धंद्यामुळें (३) दुर्गुणामुळें (४) प्रतिपक्षी म्हणून द्वेषामुळें व (५) जन्मामुळें मानवजातींत स्पृश्यास्पृश्यता मानिली जात असे. जैन, बौद्ध, वैष्णव, शैव, कापालिक, पाशुपाल व पुजारी इत्यादिक अस्पृश्य समजले जात. आज त्यांची अस्पृश्यता नष्ट झाली. हिंदुधर्मशास्त्रांत ज्या अनेक जातींचीं नांवें दिलीं आहेत त्यांपैकीं अनेक नांवें आज ज्ञातहि नाहींत. त्या जातींचा नष्टांश झाला असें नसून त्या जाति आजच्या विद्यमान जातींत विलीन झाल्या आहेत.

देशभेदामुळें ज्या जाति अस्पृश्य मानिल्या गेल्या होत्या, त्या भेदाची तीव्रताच नव्हे तर ती पूर्वीची कल्पनाहि आज अनेक कारणामुळें नष्ट झाली आहे. धंद्यामुळें मानिलेल्या जातींतील आजच्या लोकांचा पूर्वीचा धंदा राहिला नाहीं. महार डॉ. आंबेडकर हे नव्या धंद्यांत पडले आहेत. पूर्वीचे बुरूड, सोनार, लोहारादि अस्पृश्य मानिलेल्या जाति आज स्पृश्य झाल्या आहेत व त्यांपैकीं कित्येक उच्च समजले जाणारे धंदे करीत आहेत. सारांश या जाति ज्यावेळीं *अस्पृश्य मानिल्या गेल्या त्या वेळच्या व आजच्या स्थितींत महदंतर पडले* असून त्याकाळीं स्पृश्य मानलेल्यांचें वंशज आज अस्पृश्य धंदा करीत आहेत.

जातिसंस्था व वर्णसंस्था ही जुळी भावंडे असोत वा वर्णसंस्थेनंतर अगर अगोदर जातिसंस्था अस्तित्वांत आलेली असो, जातिसंस्थेमुळें जन्माला अवास्तव महत्व दिल्याचें व त्याचे अनिष्ट परिणाम झाल्याचें दृष्टोपत्तीस

आल्याबरोबर जातिसंस्थेवर त्या काळच्या सर्वच विचारवंतांनीं झोड उठविल्याचें इतिहास सांगत आहे. जन्मजात जाति ह्या समाज धारणेला युक्त नाहींत. गुणावरून जाति ओळखाव्यात असें प्रतिपादन झालें.

यापुढें या संबंधीं थोड्या अधिक विस्तारानें चर्चा केली आहे. धर्मशास्त्रकारामध्यें याबद्दल एकवाक्यता नाहीं. प्रत्येक पक्षाला आपापल्या मतसमर्थनार्थ धर्माधार खास मिळतात. धर्मशास्त्र लिहिणाऱ्यांचा हेतू कोणताहि असो त्यांच्या लिखाणांची ओढाताण होत आहे. अशा स्थितींत काय करावें ! कोणतें मत खरें व युक्त मानावें ! इत्यादि प्रश्न विचारी लोकांच्या डोळयासमोर सदैव उभे आहेत.

अशा बिकट प्रसंगीं विद्वान व विचारवंतांनीं आपल्या बुद्धीचा उपयोग करून या मतभिन्नतेच्या अडचणींतून मार्ग काढावा. यासाठीं बृहस्पतीनें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं:—

केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः ।
युक्तिहीने विचारे तु धर्महानिः प्रजायते ॥

विद्वान आहे परंतु स्वतंत्र विचार करून इष्टानिष्ट ठरविण्याची ज्याला संवय अगर धमक नाहीं, त्याला खरा शास्त्रार्थच समजला नाहीं. धर्मशास्त्रांतील शब्द व वाक्यें पढून धर्मशास्त्र समजलें असें मानणें चुकीचें आहे व अशाचा निर्णयहि चुकीचाच ठरणार आहे. युक्ति, तर्क, काल, भेद व परिस्थिती यांचा विचार करून धर्मनिर्णय न दिल्यास धर्मकार्य न होतां धर्महानि होते; परंतु शास्त्रज्ञांना या वचनाचे भान राहिलें असतें तर धर्म राहिला असतां व शास्त्रज्ञ ह्मणून समजल्या जाणाऱ्यांचा वर्ग मात्र नष्ट झाला असतां.

## दया, समता व विश्वबंधुत्व.

केवळ मानवीप्राण्यामध्येंच नव्हे तर पशुयोनि व वनस्पति यांच्याबद्दल दया, समता व विश्वबंधुत्व उत्पन्न करण्यास समर्थ असा हा धर्म आहे. हें सामर्थ्य येण्यास संसाराचा त्याग करून मुनिदीक्षाच घेणें जरूर आहे असें नाहीं. गृहस्थाश्रमांत राहूनहि हें सामर्थ्य मिळविण्याचा पद्धतशीर व शास्त्रीय

मार्ग जैनधर्मानें आंखून दिला आहे. केवळ अध्यात्मिक उन्नतीचाच पाठपुरवठा करून भौतिक अभ्युदयाकडे दुर्लक्ष करणारा जैनधर्म नाहीं. भौतिक उन्नतींत प्रायः प्रथमस्थान स्थावर-जंगम मिळकत-धनदौलत-यांना दिलें जातें. जैनधर्म संपत्ति मिळविण्याच्या आड येत नाहीं. तर ती सन्मार्गानें मिळवा, ती मिळविण्याचा भलता हव्यास लागूं नये ह्मणून परिग्रहपरिमाण करा व सन्मार्गानें मिळविलेल्या संपत्तीचा व्यय सत्कार्यांत करा, असें सांगतो. मोटारगाडी मोकाट सुटूं नये ह्मणून तिला आवरण्यासाठीं ब्रेकची योजना केलेली असते. तद्वतच संपत्तीची आशा बेफाम होऊन त्या मोहांत मोकाट सुटूं नये ह्मणून वर सांगितलेल्या ब्रेकची उपाययोजना केली आहे. कामभोगापासून सर्वस्वी परावृत्त करणें शक्य नाहीं, हें जाणून स्वदारसंतोषव्रताची उपाययोजना केली आहे. एवढेंच करून तो थांबला नाहीं तर वरील व्रत घेऊनहि कामवासना सुटलीच नाहीं तर गृहस्थाश्रमांत स्त्रियाबद्दल मुळींच अभिलाष धरूं नये अशीहि आज्ञा दिली आहे. वेश्यादिगमन त्याज्य असले तरी त्यामुळें वरील व्रत भंग पावत नाहीं. मात्र त्यामुळें अतिचाराचा दोष लागतो, असा अपवाद घातला आहे. स्वस्त्री, परस्त्री व वेश्या असें तीन भेद पाडून उचित, त्याज्य व अनुचित कोणतें हें सांगितलें आहे. यावरून जैनधर्म हा भौतिक सुखाच्या आड येत नाहीं. समाजस्वास्थ्य नादावें, समता व शांतता यांच्या वातावरणानें हें विश्व दरवळून रहावें व विश्वबंधुत्वाची वाढ व्हावी, या उच्चतम हेतूनें प्रेरित झालेला हा जैनधर्म आहे.

भौतिक उन्नति करून घेत असतां आध्यात्मिक उन्नति हेंच ध्येय आहे, असें पदोपदीं सांगण्यास तो चुकत नाहीं.

### बौद्धिक गुलाम बनवीत नाहीं.

तत्वार्थावर श्रद्धा ठेवा. सम्यग्दर्शनी प्रथम व्हा, असें आग्रहानें तो सांगतो. परंतु श्रद्धा ठेवा असें ह्मणत असतां तो निरखून व पारखून पहा व भलत्यावर श्रद्धा व विश्वास ठेवूं नका असेंहि तो तितक्याच आग्रहानें

सांगतो. सामान्य मनुष्याच्या शब्दावर व वचनावर विश्वास न ठेवतां केवली भगवान, सर्वज्ञ व अखिल प्राणिमात्रांच्या कल्याणाचा व हिताचा निष्काम उपदेश देणाऱ्यांच्या वचनावर विश्वास ठेवा असेंच तो सांगतो. कोणी म्हण-तील कीं यांतच गुलामगिरी आहे. पण ही विचारसरणी भ्रामक आहे. गार-गोटी व पोलाद यांच्या संघर्षणामुळें अग्नि उत्पन्न होतो हा सिद्धांत आहे. प्रत्येकानें प्रथम प्रयोग करूनच या सिद्धांतावर श्रद्धा वा विश्वास ठेवावा व तसें न होईल तर या सिद्धांतावर विश्वास ठेवण्यांत बौद्धिक गुलामगिरीच आहे, असें म्हणणें चुकीचेच होईल. तद्वतच केवलज्ञान्यांनीं केलेल्या हितो-पदेशावर श्रद्धा ठेवा म्हणण्यांत बौद्धिक गुलामगिरीच पतकरिली, असें होत नाहीं.

जैनधर्म हा विचारी, कर्तृत्ववान व ज्ञानवान यांच्या बुद्धीला न पटणारं असें कांहींच सांगत नाहीं. हिंसा होते म्हणून शेती अगर इतर उपजीविकेचा धंदा करूं नका असें सांगितलें असतें तर ते बुद्धिवानांना पटलें नसतें. शेती करा परंतु त्यांत नाहक व हिंसा करण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन हिंसा करूं नका असें तो सांगतो. कार्य व परिणाम एकच परंतु कार्य व हेतु निराळा यामुळें हिंसा घडत नाहीं; असें तो सांगतो. कोणा विचारी, बुद्धिमान व ज्ञानवान यांना ही विचारसरणी पटणार नाहीं !

प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालणारा व त्यांचा सुवर्ण-समन्वय करणारा हा धर्म आहे. सम्यग्चारित्र, गुणव्रतें व शिक्षाव्रतें यांचा क्रम पाहि-ल्यास सत्प्रवृत्तीचा उत्तरोत्तर विकास होण्यास भरपूर अवधि या धर्मानें दिला आहे. मुनिदीक्षा न घेतांहि घरच्या सावलींत समाधिमरण साधणाऱ्यांना मुनि-दीक्षेचें पुण्य मिळवून देण्याची सोय केली आहे.

जाति, कुल, संपत्ति व ज्ञानादिकाबद्दल गर्व, अभिमान व दंभ न धर-ण्याबद्दल कंठरवानें सांगणारा जैनधर्म समता, शांतता व समाजस्वास्थ्य यांचीच अपेक्षा धरीत नाहीं !

चार पुरुषार्थांपैकीं अर्थ व काम याना मोकाट न सोडतां त्यांना धर्माचें बंधन घातलें आहे. हीं बंधनें निरतिचार व सापवाद पाळल्यास मोक्षप्राप्ति

होईल असें हा धर्म सांगतो. मोक्ष असें एखादे स्थळ नाहीं. कारण ती अनुभवाची बाब नाहीं. वादासाठीं ही एक आशा आहे, असें क्षणभर मानिलें तरी त्या स्थळाकडे नेणारे जें मार्ग आहेत असें सांगितलें आहेत, ते आचरल्यानें सर्वांच्याच ऐहिक सुखांत भर पडत आहे. तुझ्यासारखेंच इतरांना जगावें असें वाटतें. याकरितां तू दुसऱ्यांची हिंसा करूं नकोस अगर दुसऱ्याला त्रास देऊं नकोस, या उपदेशांत स्वार्थ व परमार्थ ओतप्रत भरलेला नाहीं? तुझा ऐवज दुसऱ्यानें चोरला अगर हरण केला तर तुला जसें दुःख होते तद्वतच तूं दुसऱ्याचा ऐवज चोरलास तर त्याला दुःख होणारच ह्मणून चोरी करूं नकोस असें सांगितलें काय? व त्याहिपुढें जाऊन सांगितलें कीं चोरी न करणाऱ्याला स्वर्ग अगर मोक्षसुख मिळेल, तर त्यांत हानि ती काय?

एका हिंदुधर्मग्रंथांत ह्मटलें आहे कीं,—

सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः।
सुखं तु न विना धर्मात् तस्माद्धर्मपरो भवेत्॥

**सारांश:**—सुखाकरितां सर्व प्राणिमात्रांची अहोरात्र धडपड आहे. धर्माच्या सहाय्यानेंच तें सुख मिळणारें आहे, एरव्हीं नाहीं. दुसरें वचन असें कीं,—

यदा वै सुखं लभतेऽथ करोति, नासुखं लब्ध्वा करोति, सुखमेव लब्ध्वा करोति.

**सारांश:**—मनुष्य धर्माचरणास प्रवृत्त केव्हां होतो? अमूक कृत्य करण्यांत सुख आहे, अमूक केल्यानें सुख मिळेल व तें मिळणारच. मिळाल्याशिवाय राहणार नाहीं, असें ज्या वेळेला वाटतें त्याचवेळीं तो सत्प्रवृत्त होतो. ह्मणून धर्म, मोक्ष व स्वर्ग हें डोळ्याला न दिसणाऱ्या असल्या तरी मनश्चक्षुला त्या दिसतात व ह्मणूनच धर्माचरणास तो प्रवृत्त होतो.

यापुढें जैनधर्म उदार कसा आहे, तो अखिल प्राणिमात्रांचा उद्धारक कसा आहे व तो सार्वधर्म होण्यास पात्र कां आहे, इत्यादिबद्दल त्रोटक विवेचन केलें आहे, त्याचा विचार करावा अशी विनंती आहे.

## धर्म परिवर्तनशील आहे कीं नाहीं ? असल्यास कोणता ?

या गंभीर प्रश्नाचा तितक्याच काळजीनें विचार करणें जरूर आहे. धर्माचे (१) यमधर्म व (२) नियमधर्म असे दोन भेद केले जातात. या भेदालाच (१) लोकाचार व (२) धर्माचार अशीहि नांवें दिलीं जातात. यमधर्म हा शाश्वत असतो. तो बदलण्यास पात्र नाहीं. अहिंसादि धर्म हे शाश्वत-यमस्वरूपी आहेत. स्नानसंध्या, उपवास, तप हे नियम आहेत. ते अशाश्वत आहेत, त्यांना लोकाचार ह्मणतात. ते बाह्यधर्म होत. ह्मणून ते परिवर्तनशील आहेत.

कोणत्या स्थळीं, कोणत्याहि वेळीं व कसल्याहि प्रसंगीं अहिंसादि धर्माचें पालन करणें जरूर आहे. कारण हा धर्म शाश्वत आहे, सनातन आहे, ह्मणूनच अनादि आहे. या शाश्वत धर्माला आदि-आरंभ-सुरवात अशी नाहीं व त्याला अंत-शेवटहि कधींच नाहीं. तो सदैव व सर्वत्र असावयाचाच. नियमधर्माचें तसें नाहीं. त्यांत बदल होऊं शकतो.

हा मुद्दा उदाहरणानें अधिक स्पष्ट करावयाचा झाल्यास आपण असें समजूं कीं लिबियाच्या अगर सहारा वाळवंटांत आपण आहों, तिथें पाणी पिण्यापुरतें जेमतेम मिळतें. अशा ठिकाणीं स्नान झालें नाहीं; तर नियम धर्माचें पालन होणार नाहीं. तेथील परिस्थितीप्रमाणें वागणें भाग आहे. या उलट इंग्लंडमध्यें गेलों व तेथें शाकाहारावर राहतां येत असतां मांसाहार केला तर यमधर्माचें पालन केलें नाहीं, असें होईल व अशा कृत्याला धर्म क्षमा करणार नाहीं.

यावरून असें मात्र समजूं नये कीं नियमधर्म यांच्या अस्तित्वाचीच जरूरी नाहीं. नियमधर्म हा यमधर्माचा पोषक आहे. या भेदांचा अन्योन्य संबंध आहे. तथापि एकाचें दुसऱ्याच्या अभावीं पालन होणें अशक्य नाहीं.

या दोन भेदामधील रहस्य न कळल्यानें वा नियमधर्मालाच प्राधान्य दिल्यानें या भेदामधील संघर्षाला सुरवात होते. नियमधर्माला प्राधान्य देण्यांत चूक होते. असें प्रतिपादन करणारे धर्मलंड ठरतात !!

## जाति या शब्दाचा अर्थ.

जाति-कुलादिकांचा गर्व धरूं नका अशी धर्माज्ञा आहे. या धर्माज्ञेची आठवण जात्यंधांना करून दिली की ते म्हणतात कीं आम्हीं त्याचा अभिमान कोठें धरितों! निरनिराळ्या जाती आहेत, कुल व गोत्र आहेत व त्या उच्च व नीच आहेत, एवढेंच आम्हीं म्हणतो. वरकरणीं हा युक्तिवाद साळसूदपणाचा दिसतो परंतु जैन ही जात नव्हे. जिनेश्वरांनीं सांगितलेल्या धर्माप्रमाणें वागणाऱ्या लोकांचा एक समुदाय व संघ आहे. अनेक जैनाचार्यांनीं प्रचलित जातिभेदाविरुद्ध कोरडे ओढून जातीभेद मानणाऱ्यांचे कंबरडे मोडिलें आहे.

संयमो नियमः शीलं तपो दानं दमोदया ।
विद्यन्ते तात्विका यस्यां सा जातिर्महती मता ॥

सारांश हा कीं, संयम, नियम, शील, तप व दान इत्यादिक सद्‌गुण ज्यांचे अंगीं आहेत, त्या लोकांच्या समुच्चयाला **जाति** असें म्हटलें आहे. हा माझा स्वधर्मी आहे असें जेव्हां आपण म्हणतो तेव्हां त्याचा व आपला धर्म एकच आहे, असें समजून त्यास स्वधर्मी म्हणतो. आद्य तीर्थंकर वृषभदेवांच्यावेळीं ब्राह्मण हा वर्ग नव्हता. वृषभदेवांचे चिरंजीव राजा भरतेश्वर यांना ब्राह्मण वर्गाची जरूरी वाटली. ज्ञानार्जन, अध्ययन व अध्यापन यांचा धंदा करणारा वर्ग तो ब्राह्मण वर्ग. वृषभदेवांच्यावेळीं विद्यार्जन करून धर्मोपदेश करणारा असा स्वतंत्र समाज नव्हता. त्या समाजाची जरूरी त्यांना भासली म्हणून त्यांनीं राजवाड्यावर नागरिकांना बोलाविलें. आमंत्रितांत फक्त पुरुषच होते. लुसलुसित कोंवळें गवत तुडवीत राजदरबारीं कांहीं लोक आले व तें गवत तुडविणें इष्ट न वाटणारे कांहीं लोक दूर राहिले. दूर राहिलेले लोक विचारी आहेत असें चक्रवर्तीनीं ठरविलें. या मार्गे राहणाऱ्यांत क्षत्रिय, वैश्य व शूद्रहि होते. यज्ञोपवीत देऊन त्यांना ब्राह्मण केलें. आदिपुराणांत ही कथा दिली आहे. यावरून (१) वृषभदेवांच्यावेळीं ब्राह्मण जात नव्हती (२) भरतेश्वरांनीं ती निर्माण केली (३) निर्माण करितांना त्यांच्या

गुणाकडे पाहिलं व (४) त्या काळच्या क्षत्रीय, वैश्य व शूद्रामधून त्यांची निवड झाली.

राजदरबारी स्त्रियांना बोलाविलें नव्हते. यज्ञोपवीत घालून परत घरीं जाणाऱ्यांची बायको ब्राह्मणी झाली.

त्यांवेळची विवाहसंस्था विचारांत घेतां विजातीय विवाह होत नव्ह-तेच असें नाहीं. आचार्यांना **संग्राहक** असें दुसरें एक सार्थ नांव आहे. त्याचा अभिप्राय असा कीं, परधर्मीयाना आपल्या उपदेशानें जैनधर्मानुयायी बनवीत व अशांची संख्या किती झाली होती व आजचे जैन म्हणविणारे कोणाचे वंशज आहेत कोण जाणें ? जाति, कुलादिकांचा गर्व धरूं नये असें सांगतांनाहि आचार्यांनीं सांगितलें आहे कीं पूर्वभवांत आपण कोणकोणत्या योनींत जन्म घेतला होता कोण जाणें व यापुढें कोणत्या योनींत जन्म घ्यावा लागणार, हें तरी कसें समजणार ? साराश जन्म कर्माधीन आहे. शरीर स्वभा-वत:-मूळचेंच-अपवित्र आहे.

यावरून जैनधर्म हा गुणाकडे पाहणारा आहे. धर्माच्या कसोटीला उत-रेल तो धार्मिक. जिनेश्वरांनीं सांगितलेला धर्म तो जैनधर्म व त्या जिनेश्वराचे व त्यांच्या धर्माचे अनुयायी ते जैन.

डॉक्टर अगर वकील होण्यास अमूक अमूक परीक्षा द्यावी लागते. तो अभ्यासक्रम पूर्ण झाला कीं त्यास डॉक्टर अगर वकील असें म्हणतात. तद्वतच जैन म्हणवून घेण्यापूर्वी कांहीं अटी पाळाव्या लागतात व परीक्षेला उतरावें लागतें. त्या अटी पुऱ्या झाल्या व ती परीक्षा उत्तीर्ण झाली कीं तो जैन होतो. जैन आईबापांच्या पोटीं जन्मून जैनधर्माप्रमाणें न वागणारे कांहीं आढळ-तात. तद्वतच इतरांच्या पोटीं जन्मूनहि जैनधर्माप्रमाणें आचरण असणारेहि आढळतात. यामुळेंच जैनधर्म हा आचारावर, विचारावर व गुणावर अवलंबून राहणारा आहे; तो जन्मावर अवलंबून नाहीं.

सोवळे ओवळे इत्यादिकांचा शुचिर्भूततेच्या दृष्टीनें जरूर विचार करावा. स्नान संध्यादिक वर्ज्य आहेत असें नाहीं; परंतु धर्माची मर्यादा तेथेंच

थांबवूं नये. कपाळीं टिळा व पोटीं क्रोधाचा उमाळा, अशी अवस्था जेथें असते तेथें टिळा व स्नान ही व्यर्थ आहेत.

जैनधर्म अखिल प्राणिमात्रांचा उद्धारक आहे. तो सार्वधर्म होण्यास पात्र आहे, तो उदार आहे, शरण आलेल्यांना तो तारणारा आहे व तो सार्व-सर्वांचा-आहे, हें जैन ह्मणवून घेणाऱ्यानीं कृतीनें दाखवावयास पाहिजे. जैन व्हा असें तोंडानें सांगावयाचें व जिनमंदिरांत येण्यास व जिनपूजा करण्यास त्यास मज्जाव करावयाचा !! पवित्र जिनमंदिर व पवित्र व तारक देव पापी लोकांच्या स्पर्शानें अपवित्र होतात, ही कल्पनाच असह्य आहे. इतरांना पावन करण्याची व पवित्र करण्याची शक्ति अशावेळीं नष्ट होत असल्यास तो धर्म व ती धर्ममूर्ति उद्धारक कशी ? तीर्थंकर-पद-दर्शनानें पातकें नष्ट होतात; दर्शनच घडूं दिलें नाहीं तर ती नष्ट कशी होणार !! फूल मातींत पडलें तर मातीला फुलाचा वास येतो, फुलाचा गुण मातीच्या स्पर्शामुळें नष्ट होत नाहीं. तद्वतच पतित व पातकी यांनी पूजा केली तर मूर्ति भ्रष्ट होणार नाहीं; मात्र पूजा करणारा पावन होईल.

मुनीनीं कोणाच्या हातचा आहार घ्यावा, हा प्रश्न त्यांच्या इच्छेचा आहे. परंतु अमूक पुनर्विवाहित आहेत व तमक्यानें इंजक्शन घेतलं आहे, त्यामुळें त्यांना आहार देण्याचा अधिकारच नाहीं, असें ह्मणणें धर्मसंमत नाहीं; विशुद्ध मुनीनीं व्याभिचारि स्त्री-पुरुषांच्या हातचा आहार घेतल्याचें दाखले पुराणांतरी मिळतात. व्यभिचारांत जन्म झालेल्यांना मुनि होतां येत. वस्तुस्थिति अशी असतां अशांना आहार देण्याचा हक्कच नाहीं हें ह्मणणें धर्म-संमत नाहीं. नवधाभक्ति व विधिपूर्वक आहारदान करून पुण्यसंचय करण्याचा सर्वांत सोपा मार्ग आहे. हा मार्ग बंद करणारे धर्मसंरक्षक ते कसे ? व जैन-धर्म तरी त्याचा उद्धारक कसा ?

मुनिआहार वर्ज्य, देवपूजेस बंदी व शास्त्रवाचनास मनाई मग उद्धार तो कसा करून घ्यावयाचा ? यासंबंधीं प्रस्तुत पुस्तकांत निरनिराळ्या

ठिकाणीं प्रसंगोचित विवेचन केलें आहे. आज ना उद्यां खऱ्या तत्वाचा विजय होणारच. सत्यमेव जयते या तत्वावर अढळ श्रद्धा ठेवून हा प्रयत्न केला आहे.

भगवान महावीर हे एक अनन्य सामान्य धर्मप्रवर्तक म्हणून अजरामर राहिले आहेत. त्यांच्या चरित्राचे स्थूल मानानेंहि अभ्यास केल्यास जैनधर्म उदार आहे, तो अखिल प्राणिमात्रांचा उद्धारक आहे, तो मानवधर्म आहे, तो व्यवहार्य व तो आचरणक्षम आहे, हें जसें दिसून येते, तद्वतच तो शास्त्रीय (Scientific) आहे, हेंहि सिद्ध होतें. भगवान महावीर यांच्या जयन्ति-दिनादिवशीं वाचण्यास उपयुक्त असें छोटेसें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा इरादा आहे; त्यांत क्रांतिकारक भगवानानीं केलेल्या क्रांतीचे वर्णन भगवानांच्या शिष्यांना वाचावयास मिळेल.

या प्रयत्नांत कोणासहि दुखविण्याचा अगर हिनविण्याचा अश्लाध्य हेतू नाहीं. समाजस्वास्थ्यासाठीं व धर्मसंवर्धनासाठीं जे योग्य वाटले ते विचार विचारी वाचकापुढें ठविलें आहेत. हंसक्षीर न्यायानें त्याचा वाचकांनीं स्वीकार करावा. याहि उप्पर या कृतींत जे दोष दिसतील त्याबद्दल दयार्द्र भावानें क्षमा करावी.

**अवगुणग्रहणेन मदीयेन यदि जीवानां संतोषः ।**
**ततः तेषां सुखस्य हेतुरहं इतिमत्वा त्यज रोषम् ॥३१७॥**

**परमात्म** प्रकाशातील ही छाया आहे.

**सारांश**:—माझ्या अवगुणामुळेंच जर कोणास सुख व आनंद होत असेल तर मी त्यांच्या सुखाच्या आड कां यावें ? माझ्या अवगुणामुळें त्यांना सुख व्हावें, यासारखी आनंदाची दुसरी गोष्ट ती कोणती ? माझ्या अंगीं अनेक दोष आहेत. मला दोष देणारे सत्यवचनी आहेत, तेव्हां मी तरी त्यांचा द्वेष कां करावा ?

**करकृतमपराधं क्षंतुमर्हन्ति सन्तः**

**समाप्त.**

# विचारांत घेतलेल्या पुस्तकांची यादी.

(१) श्री. समंतभद्राचार्यकृत—रत्नकरंडश्रावकाचार.
श्री. विष्णुकुमार डोणगांवकर
श्री. मोहनलाल काव्यतीर्थ—विजयाटीका सहीत.
पं. सदासुखजी
स्व. वा. हिराचंद नेमचंद—नेमिग्रंथमाला.
जैनग्रंथ रत्नाकर कार्यालय मुंबई.
The Householder's Dharma by Champatraijai
(२) श्रावकाचार—अमितगति आचार्य.
(३) श्रावकाचार—पं. आशाधर.
(४) ,, —आचार्य पद्मनंदी.
(५) नवा हिंदुधर्म—श्री. दिवेकर शास्त्री.
(६) भारतीय संस्कृति—श्री. साने गुरुजी.
(७) गांधी-विचार-दोहन—श्री. किशोरलाल मश्रूवाला.
(८) मराठी वाङ्मयाचा इतिहास—श्री. ल. रा. पांगारकर.
(९) जैनधर्मकी उदारता—पं. परमेष्टीदास न्यायतीर्थ.
(१०) जैनधर्म मीमांसा—भाग १ व २ पं. दरबारीलाल.
(११) सत्यामृत—( आचारकांड ) — ,,
(१२) हिंदुधर्माचीं मूलतत्वें—अनुवादक श्री. बाळूभाई मेहता.
(१३) योगसार टीका—ब्र. सीतलप्रसादजी.
(१४) मोक्षशास्त्र—पं. पन्नालाल जैनसाहित्याचार्य.
(१५) धर्म का आदि प्रवर्तक—स्वामी कर्मानंद.
(१६) समयसार व नियमसार–The Sacred Books of the Jains.
(१७) परमात्मप्रकाश—पं. कालचंद्र.
(१८) समाधिशतक—ब. श्री. शहा वकील सोलापूर.

याबद्दल वरील ग्रंथकारांचा प्रस्तुत लेखक अत्यंत ऋणी आहे. या शिवाय आणखी विचारात घेतलेल्या कांहीं पुस्तकांचा नामनिर्देश केलेला नाहीं.

आ. भ. बं.
बा. भु. पाटील

## कृतज्ञता.

या पुस्तकाच्या प्रकाशनास ज्या महाभागांनीं स्वयंस्फूर्तीनें व माझ्या विनंतीस मान देऊन आर्थिक मदत केली त्यांच्या नांवाचा कृतज्ञता पूर्वक उल्लेख करणें, हें माझें आद्य कर्तव्य आहे.

७५ रु. शेट माणिकचंद हरीचंद शहा हिवरेकर रा. सोलापूर.
२५ रु. श्री. गुंडो राजाराम नागांवकर रा. निपाणी.
१० रु. ,, रायापाण्णा दादाप्पा पत्रावळी रा. धारवाड.
१०० रु. वैद्य श्रीपाल नेमिनाथ सोलापूर.
७५ रु. श्री. शेट नेमचंद हिराचंद शहा सराफ रा. दौंड.
१० रु. ,, जिनदास तातोबा जवडे बी. ए. एलएल. बी. सब्जज्ज यावल.
१०१ रु. ,, आण्णासाहेब उर्फ पायगौंडा सुरगौंडा पाटील रा. समडोळी.
१०१ रु. ,, अनंतप्पा भाऊराव औरवाडे रा. सांगली.
१०१ रु. ,, श्रीमत आपासाहेब देसाई हनगंडीकर.
१०१ रु. ,, ना. बाळगौंडा थवगौंडा पाटील पाचोरे रा. नांद्रे.

कागदाची दुर्मिळता असतांहि पुस्तकासाठीं हर प्रयत्न करून कागद मिळवून देऊन व आपुलकीच्या भावनेनें हें पुस्तक प्रसिद्ध करण्यास श्रीमहावीर प्रेस बेळगांव यांजकडून जें सहाय्य मिळालें त्याबद्दल कृतज्ञतापूर्वक आभार मानितो. बेळगांव येथील लिंगराज कॉलेज मधील प्रो. बी. ए. चौगुले **M. A.** यांनीं केलेल्या सहाय्याबद्दलहि मी त्यांचा ऋणी आहे.

**शेवटीं:**—जैन व जैनेतर यांना जैनधर्माची स्थूलमानानें कल्पना येण्यास अल्पांशानें कां होईना मदत झाली असें आढळून आल्यास माझ्या श्रमाचें सार्थक झाले, असें मी समजेन.

धर्मबंधु,

**बा. भु. पाटील.**

---

॥ ॐ ॥

श्रीस्वामी समंतभद्राचार्य-विरचित

# रत्नकरंड-श्रावकाचार

## अध्याय पहिला.

### मङ्गलाचरण.

**नमः श्रीवर्द्धमानाय निर्धूतकलिलात्मने ॥**
**सालोकानां त्रिलोकानां यद्विद्या दर्पणायते ॥ १ ॥**

**अन्वयार्थः**—( यद्विद्या ) ज्यांचे ज्ञान ( केवलज्ञान ) (सालोकानां) अलोकाकाशासहित ( त्रिलोकानां ) त्रिभुवनांत 'ज्ञान देण्यासाठीं' (दर्पणायते) आरशाप्रमाणें काम देतें ('तस्मै') अशा व (निर्धूतकलिलात्मने) ज्ञानावरणादि कर्में धुवून टाकलेलीं आहेत ज्यांनीं अशा (श्रीवर्धमानाय) अन्तरंग आणि बहिरंग लक्ष्मीनें युक्त श्रीवर्धमानस्वामींना (नमः) नमस्कार असो.

**अर्थः**—ग्रंथाच्या सुरवातीस श्रीआचार्य समंतभद्र यांनीं मंगलाचरण गाइलें आहे. मंगलाचरण करण्याचा उद्देश थोर आहे. हातीं घेतलेलें कार्य निर्विघ्नपणें तडीस जावें म्हणून इष्ट देवांचें स्मरण करून अंगीकृत कार्य सफल व्हावें अशी प्रार्थना करण्याचा शिरस्ता आहे. त्याप्रमाणें आचार्य समंतभद्र यांनीं या ग्रंथाच्या पहिल्या श्लोकांत अंतिम तीर्थंकर भगवान् वर्धमान अथवा सर्वहीं तीर्थंकरांचें नामस्मरण केलें आहे.

मंगल या शब्दाचा धात्वर्थ मं=पाप व गालयति म्हणजे नाश करणें असा आहे. पापनाशक—विघ्ननाशक व पुण्यदायक मंगल-

चरण गाथिल्यानें मनाचें परिणाम शुद्ध व कोमल होतात; व त्यामुळें शांति व सुखाचा लाभ होऊन इच्छित कार्य करण्यास उमेद येते.

आरशासमोर ठेविलेल्या वस्तूंचें प्रतिबिंब आरशांत विकृत न होतां असेच्या तसेंच दिसतें. तद्वतच केवलज्ञान्यांना अलोकाकाशसहित तीनही लोकांतील सर्व पदार्थांचें ज्ञान होतें—सर्व पदार्थांचें प्रतिबिंब केवलज्ञान्यांना असेंच्या तसें—अविकृत स्वरूपांत दिसतें.

त्रिभुवनांतील नव्हे तर अलोकाकाशांतील सर्व वस्तूंचें त्यांच्या पर्याया-सह केवलज्ञानी यांना—केवलज्ञानामुळें—ज्ञान होतें. लोक म्हणजे जग Universe—विश्व व अलोक म्हणजे या विश्वाखेरीजची इतर पवित्र जागा ( Space ). केवलज्ञान्यांना सर्व वस्तूंचें त्यांच्या पर्यायासहित जें ज्ञान होतें तें केवळ वर्तमानकालापुरतेंच मर्यादित नसतें. भूत व भविष्य काळाबद्दलही त्यांना ज्ञान होत असतें. तीर्थंकर प्रभूंनीं ज्ञानावरणादि आठ कर्मांचा संपूर्ण नाश केलेला असतो. त्यांना अनन्तचतुष्टयांची प्राप्ति झालेली असते. अशा श्रीमहावीर-वर्धमान म्हणजे २४ वें तीर्थंकर यांना माझा ( ग्रंथकर्त्यांचा ) नमस्कार असो. अनन्तचतुष्टयप्राप्ति म्हणजे अंतरंग लक्ष्मीची प्राप्ति व समव-सरणादि वैभवप्राप्ति म्हणजे बहिरंग लक्ष्मीची प्राप्ति. तीर्थंकर प्रभूंना या दोन्ही वैभवाची प्राप्ति झालेली असते.

या श्लोकांतील ' नमः श्रीवर्धमानाय ' या वाक्याचें दोन अर्थ संभव-तात. (१) वर्धमान-महावीर स्वामींना नमस्कार करितो अथवा (२) १ ते २४ असेर वृद्धि-संख्येनें वृद्धि पावत जाणाऱ्या-सर्वही चोवीस तीर्थंकरांना नमस्कार करितो; असे ते दोन अर्थ होत. संख्येनें वृद्धि पावणाऱ्या तीर्थं-करांना नमस्कार असो असा अर्थ करावयाचा म्हटल्यास त्यांत वर्तमान, भूत व भविष्य कालीन तीर्थंकरांचा समावेश होतो, असें मानणें अधिक सयुक्तिक होईल. तसेंच व्यक्तिशः एखाद्या तीर्थंकरांना नमस्कार न करितां तीर्थंकर

पदास पोहोंचण्यास लागणाऱ्या गुणसमुच्चयांचें स्मरण करून त्या गुणसमुच्चयालाच नमस्कार करणेंही अधिक इष्ट आहे असें मानण्यासही कांहीं हरकत नाहीं.

सर्वच केवलज्ञान्यांना अंतरंग व बहिरंग वैभवाची प्राप्ति होत नसते. तीर्थंकर प्रभूंनाच या दोन्ही वैभवांची प्राप्ति होते. म्हणूनच आचार्य श्रीसमंतभद्र यांनीं ग्रंथारंभीं आपल्या इष्ट देवांचें स्मरण करून ग्रंथलेखनास सुरवात केली आहे.

नमस्काराचे दोन भेद आहेत. (१) भाव व (२) द्रव्य-नमस्कार. ज्याला नमस्कार करावयाचा त्याच्या गुणाबद्दल आदराची भावना धरून नमस्कार करणें, याला भाव नमस्कार म्हणतात. द्रव्य नमस्काराला व्यावहारिक नमस्कार म्हणतात.

## श्रावक कोणास म्हणावें ?

आचार्यांच्या या कृतींत **श्रावक** या शब्दाची व्याख्या केलेली नाहीं. गृहस्थी या शब्दाच्या समानार्थी कांहीं ठिकाणीं 'गृहीणाम्' वगैरे शब्दप्रयोग केलेले आढळतात. श्रावक, जैन, गृहस्थधर्मीय म्हणजे कोण यांची स्पष्ट व्याख्या केलेली नसल्यानें इतरत्र तरी या शब्दांचें स्पष्टार्थ मिळतात काय हें पाहणें जरूर आहे.

पंडित आशाधरकृत सागार धर्मामृतांतील अध्याय पहिला श्लोक संख्या १५ यावरील टीकेंत 'कोऽसौ श्रावकः श्रृणोति गुर्वादिभ्यो धर्ममिति श्रावकः देशसंयतः' अशी टीका आढळ झाली. स्व. बा. पं. निटवे यांनीं याचे भाषांतर पुढीलप्रमाणें केले आहे. "जो गुरुपासुन मिळालेला उपदेश श्रवण करितो तो श्रावक होय." (पहा पान ३९)

सागारधर्मामृत अध्याय पहिला श्लोक संख्या १७ चा पं. निटवे यानीं खालीलप्रमाणें अर्थ दिला आहे.:— सम्यग्दर्शनासह आठ मूलगुण

पाळणारा जो श्रावक तो दार्शनिक होय. दर्शनिक श्रावक जेव्हां अणुव्रतें पाळतो तेव्हां तो व्रतिक होतो. व्रतिकच जेव्हां त्रिकाल सामायिक करितो तेव्हां तो सामायिक या नांवाच्या तिसऱ्या प्रतिमेचा अधिकारी होतो. या प्रमाणेंच पूर्वपूर्व प्रतिमेंतील गुणांसह वरच्या वरच्या प्रतिमेचा स्वीकार करणारे जे श्रावक त्यांचे ११ भेद आहेत. ते हे:—(१) दर्शनिक (२) व्रतिक (३) सामायिक (४) प्रोषधोपवासी (५) सचित्तत्यागी (६) दिवामैथुनत्यागी (७) ब्रह्मचारी (८) आरंभत्यागी (९) परिग्रहत्यागी (१०) अनुमतित्यागी (११) उद्दिष्टत्यागी. आचारामध्यें क्रमाक्रमानें वाढ-प्रगति-होण्याकरितां हे ११ भेद मानण्यांत आले आहेत.

या ११ प्रकारच्या श्रावकांच्या भेदाचें (१) जघन्य (२) मध्यम व (३) उत्तम असें आणखी तीन पोटभेद मानिले आहेत. एक ते सहा अखेर प्रतिमाधारी श्रावक ते 'जघन्य' होत. सात ते नऊ अखेर प्रतिमाधारी श्रावक ते 'मध्यम' होत व शेवटच्या दोन प्रतिमाधारी श्रावक ते 'उत्तम' होत. (समंतभद्र श्रावकाचार अध्याय सातवा यांत श्रावकांच्या ११ प्रतिमेबद्दल विवेचन केलें आहे, ते पहाण्यांत यावें). जैन कोणास ह्मणावें ? जिन अगर जिनेश्वर हे ज्यांचे उपास्य दैवत आहे, ते जैन होत. ह्मणजे जिनांचे जे भक्त अगर अनुयायी असतात ते जैन होत.

### धर्मोपदेश करण्याची प्रतिज्ञा

**देशयामि समीचीनं धर्मं कर्मनिबर्हणम् ॥**
**संसारदुःखतः सत्वान् यो धरत्युत्तमे सुखे ॥२॥**

**अन्वयार्थः**—(यः) जो (सत्वान्) जीवांना (संसारदुःखतः) संसार-दुःखापासून सोडवून (उत्तमे) उत्तम (सुखे) सुखामध्यें (धरति) ठेवतो (तम्) त्या (कर्मनिबर्हणम्) कर्मांचा नाश करणाऱ्या व (समीचीनं) खऱ्या यथार्थ (धर्मं) धर्माचा (देशयामि) मी उपदेश करतो.

**अर्थः**—श्रीसमंतभद्राचार्य ह्मणतात कीं, मी अशा धर्माचा या ग्रंथामध्यें उपदेश केला आहे कीं, जो धर्म पंचपरिवर्तनरूप संसार, देव, मनुष्य, तिर्यंच व नारक या चार गतिरूप संसाराचा नाश करणारा आहे. जो धर्म स्वर्ग अगर मोक्ष प्राप्त करून देणारा आहे, जो धर्म—समीचीनं—प्रत्यक्ष व अनुमान यांमध्यें गैरमेळ न आणणारा आहे, जो धर्म अबाधित आहे, जो धर्म कर्मबंधनें नष्ट करणारा आहे-नरक-तिर्यंचादि-गतींच्या परिभ्रमाणांतून-फेऱ्यांतून-आत्म्याला मुक्त करून त्यास अविनाशी व अतींद्रिय मोक्षसुखाची प्राप्ती करून देणारा आहे, असा धर्मच खरा धर्म होय.

व्यवहारांत आपण नेहमीं 'धर्म' हा शब्द उपयोगांत आणतो व या शब्दाचा दुसऱ्यानीं केलेला उपयोग ऐकतों, भिक्षेकरी 'धर्म वाढा' ह्मणून करूण व आर्त स्वरानें हांक मारतो. त्याला मूठभर धान्य दिलें कीं 'धर्म केला' असें आपण ह्मणतो. या व अशा अर्थी वापरलेला शब्द हा खरा धर्मवाचक व धर्मदर्शक शब्द नव्हे.

मनुष्य, देव, तिर्यंच व नारकी या चार गतीमध्यें हा जीव सारखा भ्रमण करीत असतो. यामुळें त्यास अखंड, अविनाशी व शाश्वत सुख मिळत नसतें. स्वर्गात-देवलोकीं-देवयोनींत-देवगतींत जन्म घेतला तरी तेथील सुख शाश्वत नाहीं, तें सुख अनंत सुख नसतें. कारण त्या सुखाचा कांहीं काळानें अंत-शेवट-व्हावयाचा असतो. मनुष्य देहांतील योनीतील-सुखाला तर आळवाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाची उपमा दिली जाते; कारण तें पान किंचितही वाऱ्यानें हाललें व पानाला नकळत जरी थोडासा धक्का बसला तरी पानावरील तो पाण्याचा बिंदू पडून जाऊन, पानाची व त्याची ताटातूट होते. तद्वतच संसारांत मिळणारें सुख क्षणिक, क्षणभंगुर व विनाशी असतें. सुखाचा नाश होणें याचा अर्थच असा कीं त्याच्या पाठोपाठ दुःखाचा प्रवेश होणें. यामुळें हा संसार सुख व दुःखमिश्रित आहे. आज पुत्रजन्माचा आनंद

व्हावा व चार दिवसांतच त्याच्या मृत्युमुळें दुःखाचा डोंगर कोसळावा, असा हा सुखदुःखमिश्रित संसार आहे.

## संसार या शब्दाचा अर्थ.

ज्या कारणामुळें प्राणी-जीव-नारकी, तिर्यंच, मनुष्य अगर देवयोनींत जन्म घेतो त्यास ' भव ' अर्थात् संसार ह्मणतात. यावरून संसार ह्मणजे नवरा बायकोचें अगर अशाच लोकांचें एकत्र राहाणें व खाणेंपिणें हें नव्हे तर ' भव ' संसार ह्मणजे नारकी आदि चार योनींत जन्म घ्यावयास लागणार कारण अगर कारणें. या कारणांतून सुटका करणारा ह्मणजे मुक्ति देणारा, तो धर्म हा ' भव ' अनादि व अनंत असल्यानें ' संसार अपार ' आहे असें ह्मटलें जातें. या ' भवाला ' समुद्ररूप मानिलें असल्यानें ' भवसागर ' असें त्यास ह्मणतात. समुद्राच्या पोटांत अनेक चिजा आहेत व या ' भवाच्या ' पोटांत जन्म, जरा व मृत्यु असल्यानें ' भवा ' ला समुद्ररूपी मानिलें आहे.

शिवाय संसारांत जें सुख मिळतें तें क्षणिक, क्षणभंगुर व विनाशी तर असतेंच परंतु तें इंद्रियजन्य असतें ह्मणजे त्या सुखाचें ज्ञान नाक डोळे व कान इत्यादि अवयवांच्या साहाय्यानें होतें. धर्मामुळें मिळणार सुख अनंत, अविनाशी व चिरंतन तर असतेंच परंतु तें इंद्रियजन्यहि नसतें.

मनुष्य, देव, तिर्यंच व नारक या चार गतींत भ्रमण करणाऱ्या जीवांना या फेरीच्या-परिभ्रमणाच्या दुःखांतून काढून त्या जीवाला अनंत व अविनाशी सुख देण्यास समर्थ अशी जी चीज त्याला **धर्म** ह्मणतात. धर्मामुळें या चार गतींतील परिभ्रमणाचा शेवट होतो. जीव-आत्मा फिरून जन्म घेत नाहीं ह्मणजे तो जन्मजरामृत्युआदींच्या तडाक्यांतून सुटतो.

धर्म ही चीज अशी नाहीं कीं जी वाटेल ती किंमत देऊन बाजारांत विकत मिळते. धर्म ही चीज दुसऱ्याला देतां येत नाहीं किंवा ती दुसऱ्यांकडून उसनवार ह्मणून आणतांही येत नाहीं. धर्म ही चीज देवळांत नाहीं, तीर्थांचें

ठिकाणीं नाहीं, ती अग्नींत नाहीं, अगर पाण्यांतही नाहीं. वरील ठिकाणीं जावें व खिश्यांतून अथवा पेटींतून भरून आणावी अशी ही चीज नव्हे. सूक्ष्मबुद्धीनें व सूक्ष्मदृष्टीनें धर्म समजून घेणें जरूर आहे. सूक्ष्मबुद्धीवानच धर्म साध्य करितो. डोळे झांकून व अंधश्रद्धेनें वागणाऱ्याकडून धर्महानी होते.

उपवासव्रतादिकामुळें, कायाक्लेशामुळें, तीर्थंकरपूजेमुळें, घरादाराचा त्याग करून वनाचा आश्रय केल्यामुळें व तीर्थंकर सहस्त्रनामाच्या जपामुळें धर्मप्राप्ति होत नसते.

धर्म विकत मिळत नाहीं, तो मागून आणता येत नाहीं, तो देवळांत नाहीं, तीर्थाचे ठिकाणीं नाहीं, उपवासादिक व्रतामुळें व घरादाराचा त्याग केल्यानेंही तो मिळत नाहीं, तर मिळतो तरी कोठें ? असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो.

आत्म्याचा स्वभाव धर्म आहे. इतर सर्व वस्तुबद्दल आपलेपणाची भावना सोडून निर्ममत्व होणें व आत्म्याच्या स्वरूपाचें वास्तविक-खरें-ज्ञान होणें हा आत्म्याचा स्वभाव धर्म आहे व त्या स्वभावाला तो कशानें पोहोंचणार ? उत्तमक्षमादि दशलक्षणधर्म व रत्नत्रयधर्म यांचें सम्यग्ज्ञान झालें व रागादिक कषायांतून जीव मुक्त झाला व वीतरागरूपाला पोंचला, म्हणजे मग मंदीर, प्रतिमा, तीर्थ, दान, जप, तप वगैरे वगैरे सर्वही धर्मरूप होतात. शुभराग झाल्यास पुण्यबंध व अशुभराग झाल्यास पापबंध होतो; या दोन्ही अवस्था जीवनमरणाच्या फेऱ्यांतून मुक्त करण्यास समर्थ नाहींत. पाप व पुण्य या दोहोंचाही बंध न होणें, म्हणजे वीतरागपदप्राप्ति-म्हणजेच धर्म व म्हणजेच मोक्ष होय.

## धर्माच्या इतर व्याख्या-

महाभारत-शांतिपर्वः—

धारणाद्धर्ममित्याहु धर्मेणा विधृता प्रजाः ।
यः स्यात्प्रभवसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥
प्रभवार्थं हि भूतानां धर्मः सृष्टः स्वयंभुवा ।

महाभारतांतील या धर्माच्या दोन व्याख्या व आचार्यांनीं केलेली व्याख्या–' संसारदुःखतः सत्वान् यो धरत्युत्तम सुखे '––यातील धृ–धरणें हा शब्द अत्यंत महत्त्वाचा आहे. आत्मकल्याणाकरितां धर्म आचरणांत आणणेचा आहे. प्रत्येकानें आत्म-कल्याणासाठीं धडपड केली म्हणजे त्यांत जगाचें कल्याण समाविष्टच होतें.

## धर्माचे भेद.

धर्माचार व लोकाचार धर्म असे धर्माचे दोन भेद मानिले आहेत. हिंदुधर्मात यमरूपधर्म व नियमरूपधर्म असे धर्माचे दोन भेद कल्पिले आहेत. यमरूपभाग हा शाश्वत-न बदलणारा धर्म आहे. यालाच धर्माचार धर्म म्हटल्यास वावगें होणार नाहीं. नियमरूप धर्म हा देश, काल व परिस्थितीवर अवलंबून असतो व तो बदलणारा-परिवर्तनक्षम आहे. **यम** म्हणजे धर्मातील त्रिकालाबाधित सत्यभाग. उदाहरणार्थ अहिंसादि पांच धर्म, संयम, दानादिव्रतें, नियमरूप धर्म म्हणजे स्नान, संध्या, देवपूजा, खाणें-पिणें गंध लावणें, हजामत करणें व जानवें घालणें इत्यादि इत्यादि. या श्रावकाचारांत नियमधर्माचे वर्णन फारसें नाहीं. सागारधर्मामृतासारख्या पुस्तकांत नियमरूप धर्माचें बरेंच वर्णन आहे; हें या दोन्ही ग्रंथाचें स्थूल निरीक्षण केल्यासहि दिसून येईल. शाश्वत व अशाश्वत असे दोन भेद जगांतील सर्व धर्मांत दिसून येतात. यमधर्माकडे दुर्लक्ष होऊन जेव्हां नियमधर्माचा बाह्यविधींचा-कर्मकांडाचा-बडेजाव माजविला जातो व बाह्यविधीनाच धर्म असें समजलें जातें, त्यावेळीं समाजाचा ऱ्हास होतो. समाजाच्या ऱ्हासामुळे धर्मग्लानि होते.

## धर्म बुडण्याची ओरड ??

शेंडीच्या ऐवजीं टाळु ठेवण्यानें, कल्लेदार मिशा न ठेवतां त्या काढून टाकल्यानें, आडव्या गंधाच्या ऐवजीं उभा गंध लावण्यानें, जोड्याच्या ऐवजीं बूट घातल्यानें, धोतराऐवजीं विजार घातल्यानें व अशाच अनेक बाह्य व दृश्य गोष्टींकडे पाहून धर्म बुडाला अशी हाकाटी नेहमींच होते. धर्म पोशाखांत नाहीं, धर्म खाण्यापिण्यांत नाहीं. धर्म स्नानावर व हजामतीवर अवलंबून नाहीं. धर्म पोशाखांत अगर खाण्यापिण्यांत नाहीं, या विधानाबद्दल सनातनी गहजब उडवतील व ह्मणतील कीं पुरुषांनीं धोतर सोडून लुगडें नेसावें अगर वाटेल तें खावें, असें आह्मी ह्मणतों. अहिंसादि सत्य, चिरंतन व यमरूप धर्माचे पालक वाटेल ते खाणार नाहींत, हें आह्मीं सांगावयासच पाहिजे असें नाहीं.

## विवाहादि बाबी यमरूप कीं कसें ?

अगदींच प्राचीनकाळीं आजकालचे विवाहाचे निर्बंध नव्हते. बहिण व भाऊ यांचीं लग्नें होत. पुढें हा प्रचार थांबला. सगोत्र विवाहहि बंद पडले. मुसलमान धर्मांत एका पुरुषानें एकाच वेळीं चारपेक्षां अधिक स्त्रियांशीं लग्न करणें निषिद्ध ठरविलें. ख्रिश्चन धर्मानें एकावेळीं एकच बायको असावी असें ठरविलें. हिंदु व जैनधर्मानें जरूर तर एकापेक्षां अधिक स्त्रियांशीं लग्न लावण्यास परवानगी दिली. जैनधर्मांतील मान्य पुराणांत अनेक जातीच्या अनेक स्त्रियांशीं सम्राटांचीं लग्नें झाल्याचे दाखले मिळतात. अनुलोम पद्धत नष्ट झाली. अशीं अनेक स्थित्यंतरें झालीं आहेत. हिंदुधर्मांत पराशरस्मृति कलीकाळांत मान्य झाली व पुनर्विवाहाला मर्यादित मान्यता मिळाली. मौंजिबंधनांतही असाच बदल झाला आहे. पूर्वी मुलींचेंही मौंजिबंधन होत असे; हल्लीं होत नाहीं. श्राद्ध, पक्ष याही बाबतींत मतभेद उत्पन्न झाले आहेत. सारांश हे बाह्यधर्म-लोकाचार-नियमरूप धर्म आहेत. ते बदलले आहेत व बदलतही राहतील. या परिवर्तनाला धर्म बुडाला असें मानणें ह्मणजे धर्माचा **आत्मा** काय आहे याचें सम्यग्ज्ञान न झाल्याचें हें दृश्य आहे.

जेथें उदारता आहे, जेथें प्रेम आहे, जेथें समभाव आहे, जेथें अहिं-सादि धर्माचें पालन आहे, जेथें संयम आहे, तेथें धर्म आहे. सर्व प्राणिमात्रांचा उद्धार करण्याचें सामर्थ्य ज्यांत आहे, त्याला धर्म ह्मणावें. पापी जनांचा उद्धार करणाऱ्या शक्तीला धर्म ह्मणावें. पापांना विरोध करणाऱ्या शक्तीला धर्म ह्मणावें. ज्याच्या राज्यांत उच्चनीच, काळागोरा, गरीब-श्रीमंत इत्यादि इत्यादि भेदभावांना जागा नाहीं, त्याला धर्म ह्मणावें. जन्म देहावर, कपड्या-वर, जन्मादिकावर अवलंबून नाहीं; तो आत्मिक आहे. तो मानसिक आहे. कोणताहि मानवप्राणी जन्मतः पवित्र नाहीं, श्रीमंत आईबापांच्या पोटीं जन्म घेणारे व बालपणांतील सर्व धर्मसंस्कार झालेले अनेक पापमार्गी झालेले व या उलट गरीबांच्या व दुष्टांच्या पोटीं जन्मास येऊन सन्मार्गानें वागणारे नेहमींच पाहतो. ज्याचा आत्मा शुद्ध तो धार्मिक. स्नान करणारा शुद्धच आहे, असें नाहीं. जैनधर्म सर्वांचा उद्धारक आहे. पतितांचा तो उद्धार करितो. पतित म्हणून त्याच्या उद्धाराच्या आड येत नाहीं. अनाथ, दरिद्री, व बांधव-हीन व सम्राट या सर्वांकडे जैनधर्म सारख्याच सदय नजरेनें पाहतो; म्हणूनच जैनधर्म **सार्वधर्म-सर्वांचा धर्म-तारक** आहे, असें म्हटलें जातें.

## धर्माचें उगमस्थान कुठें आहे ?

अमूक कृत्यें हींच सत्कृत्यें व बाकीचीं दुष्कृत्यें, असेंच कां मानाव-याचें ? धर्माचें उगमस्थान कुठें आहे ? धर्म ही बाजारांत मिळणारी चीज नव्हे अगर पृथ्वीच्या पोटांत समुद्रावर अगर आकाशांत त्याचें वास्तव्य आहे ? त्याचें वास्तव्य तरी कोठें आहे ? त्याचा आकार कसा आहे ? त्याचा वर्ण काय ? इत्यादि शंका येणें स्वाभाविक आहे. ईश्वराचें अस्तित्व मानणारा धार्मिक व न मानणारा नास्तिक, असें कांहीं ह्मणतात. परलोक आहे असें मानणारे कांहीं व ते न मानणारे कांहीं आहेत. अशीं मतमतांतरें आहेत. मग धर्म कशाला ह्मणावें ? व तो असतो तरी कोठें ? चोरी करणारा खरा चोर कीं जगांतील संपत्तीचा बहुभाग आपल्या येथें ठेवून दुसऱ्याची उपासमार करणारा खरा चोर ??

## कोऽयं धर्मः कुतो धर्मः

धर्म हा कोण आहे ? कसला आहे ? व तो कुठून आला ? असा प्रश्न भीष्माचार्यांना विचारला गेला होता, असें महाभारतांत लिहिलें आहे. भीष्माचार्यांनीं या अवघड प्रश्नाचें फारच थोडक्यांत पटणारें उत्तर दिलें आहे. 'मतिभिरुध्दतम्'. विचारी लोक विचार करितात व चिंतन करून अमूक चांगलें व अमूक अनिष्ट असें ठरवितात. यालाच धर्म व अधर्म असें मानिलें जातें, असें भीष्माचार्यांनीं उत्तर दिलें आहे. अर्थात् धर्म हा बुद्धिवंताच्या व ज्ञानवंताच्या विचारांत आहे. तो बुद्धिप्रधान आहे. मतमतांतराचा जो गलबला पहावयास मिळतो, त्याचें मूळही या बुद्धिवादांतच आहे. काळ, वेळ व परिस्थितीच्या प्रभावाचा परिणाम त्यांच्या विचारसरणीवर झालेला असतो, व त्यामुळें मतभेदास अवसर मिळतो. मूळचा वैदिकधर्म म्हणजे यज्ञप्रधान हिंसाधर्म. नंतरच्या ऋषीमुनींना व विचारवंतांना अहिंसाधर्मच श्रेष्ठ वाटला व वैदिक धर्माचें स्वरूप पार बदलून टाकण्यांत आलें. निरनिराळ्या विचारवंतांनीं स्वतंत्रपणें विचार करावा व ते विचार विचारवंत मंडळापुढें मांडावेत व मंडळ जे मान्य करील त्याला धर्म असें मानावें, अशी प्रथा पडून गेली. या वचनाला प्रामाण्य देण्यांत आलें व **वचन-प्रामाण्य-धर्म** अस्तित्वांत आला. 'दृष्टिपूतं न्यसेत्पादम् वस्त्रपूतं पिबेज्जलम्.' निरखून व पारखून पुढें पाऊल टाका. प्रत्येक पाऊल टाकतांना डोळे उघडे ठेवा. भलतेंच करूं नका. पाणी हें शुद्ध आहे, तें आरोग्यदायक व जीवनपोषक आहे; तथापि तें पितांनाही वस्त्रगाळ करून प्या. नदीला अगर तळ्याला तोंड लावूं नका. शुद्ध, आरोग्यदायक व जीवनपोषक असें पाणी जरी आहे तरी तें पितांना विचार करा. विचार करणें ह्मणजे वस्त्रगाळ करणें, वस्त्रगाळ करण्याचा विचार मनांत आला कीं ते दोषी आहे कीं निर्दोषी आहे ? किती प्यावें ? आतां प्यावें कीं मग प्यावें ? थंड प्यावें कीं गरम करून प्यावें ? इत्यादी इत्यादी विचारांची मालिका लागणें अशक्य नाहीं. पाणी पितांना विचार

करा असें सांगितलें परंतु आम्ही गतानुगतिक इतरांच्या बुद्धीचे गुलाम बनलों आहोंत व स्वतंत्र विचार करण्याची बुद्धी सोडून दिली आहे. वस्त्रपूतम् पिबेज्जलम् या वचनावर अंधश्रद्धा ठेवून चाललों आहोंत. आजन्म जीं जीं कृत्यें करावीं लागतील तीं विचारपूर्वक करणें, पाऊल टाकतांना डोळे उघडे ठेवून टाकणें, यालाच धर्म ह्मणतात. स्नान करणें, देवपूजा करणें इत्यादी कृत्यांतच धर्म नाहीं. चोवीस तास व आजन्म विचारानें वागणें ह्मणजेच धर्माचरण; तें आचरण अंमलांत आणणाराच खरा धार्मिक. केवलज्ञान्यांनीं श्रुतकेवलींनीं व आचार्यांनीं विचार करून जें इष्ट व ग्राह्य ह्मणून सांगितलें आहे तें नवीन विचाराच्या वाऱ्याबरोबर उडून जाण्यासारखें नाहीं. तें उडून जाणारें असेल तर तें उडून जाऊं नये ह्मणून घेतलेले श्रम व्यर्थ आहेत. वाऱ्यासरशीं उडून जाण्यासारखे ते विचार असले, उडून जाणें हाच त्या विचारांचा धर्म असल्यास त्यांचें जतन तरी कां करावें ? तें तसें नाहींत ह्मणूनच त्यांना अनादी व सत्य ह्मणतो.

## खरा विचारी कोण ?

विचार करून पाऊल टाकावें अगर खरा विचारी विचार करून पाऊल टाकतो, असें म्हटल्यावर खरा विचारी कोण ? हा प्रश्न साहजिकच उद्‌भवतो. पूर्वार्जित विचारसंपत्तीतील दोष काढून टाकून ती शुद्ध करण्याचा व ती वाढीस लावण्याचा प्रयत्न करणाराच खरा विचारी होय. पूर्वीच्या विचारवंताच्या विचाराकडे खरा विचारी कलुषित नजरेनें व दूषित ग्रहानें पाहात नाहीं, कारण त्याला जपून विचार करूनच पुढें पाऊल टाकावयाचें असतें. पाणी शुद्ध असतें व जीवनोपयोगी आहे, असें जरी असलें तरी तें तो गाळूनच पितो. पूर्वार्जित विचार शुद्ध असले तरी ते शुद्ध आहेत कीं नाहीं, हें पाहण्यासाठीं तो आपल्या बुद्धीचें व विचाराचें वस्त्र त्याला लावून पारखतो. पूर्व विचारांच्या हेटाळण्यासाठीं तो हेटाळणी करीत नाहीं. वचनप्रामाण्य व बुद्धीला पटलेले, अशा दोन कारणांमुळें श्रद्धा दृढ होते. विचारपूर्वक ठेवलेली

श्रद्धाच खरी श्रद्धा. अंधभक्तिमुळें ठेवलेली श्रद्धा खरी श्रद्धा नव्हे. सारांश सदाचारसंपन्न जीवन ह्मणजेच शाश्वत धर्माचें पालन होय. शाश्वत धर्मच ह्मणजे सनातनी धर्म; व धर्म अनादी आहे, असें मानणें ह्मणजेच धर्म शाश्वत आहे, असें मानणें होय. या सदाचाराला कोणी अनादी, कोणी शाश्वत व कोणी सनातनी ह्मणोत.

## जैन व हिंदु विचारसरणींतील साम्य.

हिंदुधर्मांतील भक्तियोग, ज्ञानयोग व कर्मयोग अथवा श्रद्धा, ज्ञान व कर्म ह्मणजेच जैनधर्मांतील सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्र हीं होत. चारित्राला -कर्माला-श्रद्धा व ज्ञान यांची जोड पाहिजे. श्रद्धाहीन व ज्ञानहीन चारित्र-कर्म हें चरित्र नव्हे. मुनींना आहारदान विधि व श्रद्धापूर्वक द्यावें असें ह्मटलें आहे· विधि ह्मणजे ज्ञान. व्रत, यम व नियम यांच्या व्याख्या, स्वरूप वा लक्षणें पाहतां त्यांत श्रद्धा व ज्ञान यांना महत्वाचें स्थान देण्यांत आलें आहे. विशिष्ट हेतूनें व श्रद्धेनें व्रत घेतलें जातें व त्याचें पालन-कर्म-चारित्र-सांभाळलें जातें· देवाला नमस्कार घालावयाचा आहे, ही भावना धरून केलेला नमस्कारच खरा नमस्कार आहे. देवळासमोर जावें व ठेंच लागून पडावें व ह्मणावें कीं मी देवाला नमस्कार घातला. या दंडवतांत श्रद्धा नाहीं व ज्ञानही नाहीं ह्मणून ठेंच लागून पडण्याचें दंडवत खरें दंडवत नव्हें; ह्मणूनच श्रद्धा, ज्ञान व कर्म या तिन्हींचा गोड संयम व मिलाफ झाला पाहिजे· या तिन्हींच्या संयोगामुळेंच मोक्षमार्ग दिसणारा आहे.

सारांश धर्म या शब्दाचा अर्थ अगर व्याख्या सकृद्दर्शनीं भिन्न दिसत असल्या तरी भावार्थ व परिणाम एकच आहे. धर्म ह्मणजे सदाचार अशी सुटसुटींत व्याख्या केल्यास ती चुकीचीच होईल असें नाहीं· सदाचारांत कोणकोणत्या बाबी येतात व सदाचाराचा विकास कसकसा करीत जावा याबद्दल गुणव्रतांत व शिक्षाव्रतांत विस्तारानें सांगितलें आहे· सल्लेखना अगर समाधी ही गृहस्थ धर्मांतील सदाचाराचा कळस आहे. मुनिधर्म हा गृहस्थ-

धर्माची पुढची पायरी आहे. मानवी जीवाचा विकास करण्यासाठीं हिंदुधर्मांत ब्रह्मचर्यादि चार आश्रमाची व्यवस्था केली आहे. अणुव्रतें, गुणव्रतें, शिक्षाव्रतें व श्रावकांच्या अकरा प्रतिमा, यांचाही हेतु मानवी मनाचा विकास करीत करीत त्यास मोक्षमार्ग प्रवृत्त करण्याचाच आहे, हें विचारांतीं कळून येणार आहे.

धृ—धारण करणें—या धातूपासून धर्म शब्द झाला आहे. व्यक्ति व व्यक्तींचा समुदाय जो समाज, त्यांना स्थैर्य देणारी व त्यांचा अभ्युदय आणि उत्कर्ष करण्यास समर्थ अशी चीज धर्म आहे. समाजांत अधार्मिक वृत्ति माजली तर कोणालाच आपल्या चित्त, वित्त व जीवितावद्दल शाश्वति राहणार नाहीं. चित्त, वित्त व जीवित यांना शाश्वति देणें म्हणजे समाजांत स्थैर्य उत्पन्न करणें. स्थैर्य व शाश्वति उत्पन्न करण्यास हिंसादि पांच पातकें वर्ज्य करणें, संयम, दान व समताभावादिकांची वाढ होणें जरूर आहे.

अहिंसादि पांच पुण्यें, संयमादि वर्तन, यांना शाश्वत-सनातन व अनादी धर्म असें म्हणतात. बाह्याचार हा शाश्वत धर्म नव्हे. तो परिवर्तनशील आहे.

दुसऱ्या एका लेखकानें धर्माची व्याख्या केली आहे ती अशी:—
' धारणात् धर्मः ' सर्व समाजाची ज्यानें धारणा होते, तो धर्म. धारण कोणाचें? मानवप्राणी हा सर्व प्राण्यांत थोर आहे. थोरवी बरोबर जबाबदारी येते. यामुळें मानवी प्राण्यानें सर्वांची सुव्यवस्था लावावयाची आहे. मानवानें मानवाशीं, पशुपक्षाशीं व इतर सर्व चराचर वस्तूशीं कसें वागावयाचें हें ठरविणें जरूर आहे. मानवी प्राणी श्रेष्ठ म्हणून त्यावर ही जबाबदारी आहे.

अखिल प्राणिमात्रांची बरोबर व्यवस्था लावावयाची म्हल्यास काय काय केल्यानें व काय काय न केल्यानें ही व्यवस्था बरोबर होईल, सर्वांचा उत्कर्ष होईल, सर्वांचा अभ्युदय होऊन सर्व सुखी राहतील; याचा विचार कर्तव्य आहे. या विचारसमुच्चयालाच धर्म असें म्हटलें जातें. या विचार-

समुच्चयाचा सार म्हणजे सदाचार. हिंसा करूं नका, चोरी करूं नका, खोटें बोलूं नका, परस्त्रीचा अभिलाष धरूं नका व मलता परिग्रह वाढवूं नका, म्हणजे सर्व सुखी होतील. हा स्थूल धर्म आहे. या धर्माचा विकास कसा होईल, मानवी प्राण्याची या धर्मावर श्रद्धा कशी बसेल व या पांच पातकांचें मूल कशांत आहे, इत्यादी कार्यकारणभावांचाही विचार झाला. रागद्वेषादी षड्रिपु हे पांच पातकांच्या मुळाशीं आहेत, असें आढळून आल्यानें हे षड्रिपु सोडून देण्याचा उपदेश झाला. आपण जें अन्न खातो व ज्यांच्या सहवासांत वागतो, त्याचा व षडरिपूंचा कांहीं संबंध आहे? याचा विचार करितां, अन्नांत कांहीं अन्न सात्विक व कांहीं राजस व कांहीं तामस आहे असें अनुभवास आल्यानें अमूक पदार्थ वर्ज्य व अमूक ग्राह्य असें सांगण्यांत आलें. संगतीच्या परिणामाची कल्पना आल्यानें सत्संगति धरा, असा उपदेश झाला. मालकीची कल्पना रूढ झाल्यानें परक्याचें घेऊं नका असें सांगणें, समाज व्यवस्थेच्या दृष्टीनें जरूरच झालें. विवाह संस्था अस्तित्वांत आली व विवाहाचें पावित्र्य राखण्यासाठीं परस्त्रीचा अभिलाष अधर्म आहे, असें सांगण्यात आलें. एकानें खूप संपत्तिमान होणें म्हणजे पर्यायानें दुसऱ्याला दारिद्र्यांत ठेवणें अगर त्याच्या संपत्तीचा अपहार करणें असें होतें; म्हणून परिग्रह-परिमाण करण्यास सांगितलें. ' अती तेथें माती ' अगर ' अति सर्वत्र वर्जयेत् ' अशी म्हण व्यवहारात आली.

स्थूल हिंसा, चोरी, खोटें बोलणें, परस्त्रीत्याग व परिग्रहपरिमाण यावरच धर्मात्मे संतुष्ट राहिले नाहींत. स्थूल धर्माचा विकास गृहस्थाश्रमांत राहूनही करतां यावा म्हणून गुणव्रत व शिक्षाव्रतांची योजना झाली. संन्यासाश्रमांत शिक्षाव्रतापेक्षांही कडक निर्बंध घातले गेले. गृहस्थधर्म व मुनिधर्म असे दोन भेद पाडिले. विवक्षित मर्यादेंतील परिग्रह कमी करण्यासाठीं दानाची योजना केली व दान व्यर्थ जाऊं नये म्हणून सत्पात्र कोण हें ठरविलें. या सर्व विचारांत स्वतःच्या व मानव प्राण्याच्या हिताची काळजी वाहण्यांत आली

आहे; व या व्यवस्थेलाच धर्म हें नांव दिलें आहे. सत्कर्म–सदाचार–सत्य–आचार सम्यक्चारित्र हें, श्रद्धा–सम्यग्दर्शन व ज्ञान–सम्यग्ज्ञान यांवर अधिष्ठित असलें पाहिजे. यासाठींच आचार्यांनीं सद्दृष्टिज्ञानवृत्त–श्रद्धा, ज्ञान व आचार-कर्म-या तिन्हींच्या संयोगाला **धर्म** असें म्हटलें आहे.

धर्म, अर्थ, काम व मोक्ष हें प्रत्येक जीवाचे चार पुरुषार्थ आहेत. या पुरुषार्थांत धर्माला अग्रस्थान दिलें आहे. अर्थ म्हणजे द्रव्यसंपादन. काम या शब्दांत कलाविषयक व सांस्कृतिक जीवन याचाही समावेश होतो. मोक्ष म्हणजे आध्यात्मिक स्वातंत्र्य.

सदाचारी व सन्मार्गानें वागून धन मिळवावें, धर्मविहित काम सेवन करावें व शेवटीं अध्यात्मिक स्वातंत्र्य मिळवावें.

कर्मवादाचा विचार करितां धर्म प्राण्यांना सांगतो कीं तुमच्या आत्मोद्धाराची वेळ अद्याप गेलेली नाहीं. पातकें करण्याचें सोडा व सदाचारी व्हा म्हणजे धर्म तुम्हांला जवळ करील व आत्मोद्धाराचा मार्ग तुम्हांला दिसेल. यामुळेंच धर्म हा प्राण्याचा विरोधी नाहीं, तो पातकांचा-पापाचा विरोधी आहे, असें म्हटलें जातें व तें सत्य आहे.

पापी मनुष्याला धर्माचें ध्येय जी मुक्ती तिच्या पायरीवर जाण्यास सदाचारसंपन्नापेक्षां अधिक काळ व अधिक श्रम लागतील. पापी लोकांचा जगांत अभावच होईल तर सृष्टीच्या योजनेंत एक मोठीच उणीव भासेल. आपणांस आज झालेला जन्म हा स्वयंपूर्ण कालखंड नाहीं. भूतकालीन केलेल्या कर्मांचीं फळें भोगीत असतां त्यांत नव्या चांगल्या व वाईट कर्मांची भर पडणार. भोगामुळें कांहीं वजा जाणार व कांहींची नवीन भर पडत जाणार. यामुळें अंतिम ध्येय साध्य होईपर्यंत ते साध्य करण्याची अनेकवार संधि मिळत राहणार. अशा प्रकारें सर्व प्राणिमात्रांना आपला उद्धार करण्याची संधि धर्म सतत देत असतो. एकवार पातकी यामुळें तो जगाच्या अंतापर्यंत पातकीच राहील, असें धर्म म्हणत नाहीं. पातक्यांच्या वंशजाला तो पातकीच कसा ठरवील !

**धर्माचें लक्षण.**

**सद्दृष्टिज्ञानवृत्तानि धर्मं धर्मेश्वरा विदुः ।**
**यदीयप्रत्यनीकानि भवन्ति भवपद्धतिः ॥ ३ ॥**

**अन्वयार्थः**—( धर्मेश्वराः ) धर्माचे ईश्वर—अर्हन्त भगवान ( सद्दृष्टिज्ञानवृत्तानि ) सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्राला ( धर्मं ) धर्म असें ( विदुः ) ह्मणतात. ( यदीयप्रत्यनीकानि ) त्याच्या उलट असलेलें मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान, मिथ्याचारित्र्य हें ( भवपद्धति ) संसाराची वाढ करणारे ( भवन्ति ) होतात.

**अर्थः**—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र यांना परमदेव तीर्थंकरांनीं धर्म असें ह्मटलें आहे, कारण या रत्नत्रयांच्या पालनानें मोक्ष-प्राप्ति होते. यांच्या उलट मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान व मिथ्याचारित्र हे आहेत; व त्यांच्या आचरणामुळें आत्मा चार गतींच्या पंचपरिवर्तनरूप संसाराच्या फेऱ्यांत सांपडून भ्रमण करीत असतो; तो कर्म-बंधनांतून मुक्त होत नाहीं.

आचार्य पद्मनंदि यांनीं आपल्या पंचविंशतिका या ग्रंथांतील **उपासक संस्कार**—श्रावकाचार—या प्रकरणांत धर्माचें स्वरूप-लक्षण-पुढीलप्रमाणें दिलें आहे.

सम्यग्दृग्बोधचारित्रत्रितयं धर्ममुच्यते ।
मुक्तेः पंथा स एव स्यात् प्रमाणपरिनिष्ठितः ॥ २ ॥

**सारांशः**—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तिन्हींच्या समुच्चयाला धर्म ह्मणतात व हे रत्नत्रयच मोक्षाचें मार्ग—मोक्षप्राप्तीचीं साधनें—आहेत.

या साधनांचा उपयोग वा या उपायांचें अवलंबन न केलें व मिथ्या-मार्गानें वागले तर त्याचा परिणाम काय होतो हें आचार्य पद्मनंदि यांनीं श्लोक संख्या.३ मध्यें सांगितलें आहे. तो असाः—

रत्नत्रयात्मके मार्गे संचरन्ति न ये जनाः ।
तेषां मोक्षपदं दूरं भवेद्दीर्घतरो भवः ॥ ३ ॥

सारांशः—रत्नत्रय मार्गानें जे जाणार नाहींत त्यांना मोक्षपद फार दूर राहील व त्यांना संसारांत बहुत दीर्घकाळ रहावें लागेल. 'तेषां मोक्षपदं दूरम्' असेंच कां म्हटलें आहे ? त्यांना मोक्षपद कदापि शक्यच नाहीं असें न म्हणण्यांत कांहीं हेतू आहे काय ? तसा हेतू नसतां 'मोक्षपदं दूरम्' अथवा 'दीर्घतरो भवः' अशी दुहेरी शब्दयोजना केलीच नसती.

रत्नत्रयाशिवाय मोक्षपदप्राप्तीचे आणखी दुसरे मार्ग आहेत ? असल्यास रत्नत्रयधर्मावांचून मोक्षपदप्राप्तीच होणार नाहीं, असें ते कसें म्हणतील ? ६० व्या श्लोकांत आचार्य पद्मनंदींनी अंतरंगतत्व-विशुद्ध आत्मा व अखिल प्राणिमात्रावर दया-बहिरंग तत्व-व या दोन्ही तत्वांच्या सहकार्यानें सम्मेलनामुळें-मोक्षप्राप्ति होते, असें म्हटलें आहे. अंतरंग विशुद्ध म्हणजे रत्न-त्रय नव्हे व केवळ प्राणिमात्रावर दया म्हणजेही रत्नत्रय नव्हे. यावरून रत्न-त्रयाशिवाय मोक्षप्राप्तीचीं दुसरीं साधनें आहेत व यामुळेंच श्लो. सं. ३ मधील शब्दयोजना हेतुपुरःसर केली असावी असें वाटतें.

## अविरत सम्यग्दृष्टि.

पं. आशाधरांच्या सागारधर्मामृतचें स्व. वा. पं. निटवे यांनीं केलेल्या भाषांतराचें पान ३७ व ३८ यावर अविरत सम्यग्दृष्टि कोणास म्हणावें; याबद्दल उल्लेख केला आहे तो असाः—

१ "जो इंद्रियसुखाच्या विषयापासून विरक्त झाला नाहीं आणि त्रस व स्थावर जीवांच्या वधापासूनही जो विरक्त झाला नाहीं पण जिनवचनावर पूर्ण श्रद्धा ठेवितो तो अविरत सम्यग्दृष्टि होय."

२ "हे देवा, जन्ममरणांचा नाश करावा म्हणून ज्याची इच्छा आहे तो अलभ्य असा तुझ्या पदकमलाची भक्ति करूं दे. तुझ्याठायीं

तेवढीं दृढ ठेवून तो पाहिजे तसा वागल्यास हरकत नाहीं. कारण, जो सम्यक्त्वी झाला, तो आज नाहीं कालांतरानें तरी ज्ञानपूर्वक चारित्र पाळीलच. पण त्यानें कुदेवाची मात्र सेवा करूं नये " इत्यादि.

वर जे दोन उतारे दिले आहेत त्यावरून अविरत सम्यग्दृष्टि होण्यासाठीं तीन प्रकारच्या मूढता व आठ प्रकारचे गर्व सोडलेच पाहिजेत असें नाहीं. जिनवचनावर नितांत श्रद्धा व भक्ति असणें, हीच काय ती कसोटी आहे असें वरील नंबर १ च्या उताऱ्यावरून दिसते; मात्र नं. २ च्या उताऱ्यांत श्रद्धा-भक्ति या शिवाय कुदेवाची सेवा न करणें ही एक अधिक शर्त घातलेली दिसते.

आजच्या जैन समाजाकडे पाहिल्यास अविरत सम्यग्दृष्टीच बहुधा अनेक मिळतील. तीन मूढतेच्या दोषापासून अलीकडील जैनसमाज अलिप्त राहूं लागला आहे; परंतु आठ प्रकारच्या गर्वांपासून अलिप्त राहणारे फारच विरळा. या स्पष्टोक्तिबद्दल क्षमा असावी. गर्वांचे भेद आठच आहेत असेंही नाहीं. त्याचे आठापेक्षांही अधिक भेद दाखवितां येतात. अशा सर्व प्रकारच्या गर्वांपासून अलिप्त राहणें सहज सुलभ कार्य नाहीं, म्हणूनच कीं काय पंचम अगर कलिकालाचा हा महिमा आहे; म्हणूनच कलिकालांत सागार अगर अनगार धर्म पूर्णपणें पाळणारे दुर्लभ असे निराशेनें उद्गार कांहीं आचार्यांनीं काढिले आहेत.

### सम्यग्दर्शनाचें लक्षण.

**श्रद्धानं परमार्थानामाप्तागमतपोभृताम् ।**
**त्रिमूढापोढमष्टांगं सम्यग्दर्शनमस्मयम् ॥ ४ ॥**

**अन्वयार्थः**—( परमार्थानां ) खऱ्या ( आप्तागमतपोभृताम् ) देव, शास्त्र, गुरुचें ( त्रिमूढापोढं ) तीन मूढतेनें रहित ( अष्टांग ) आठ अंगांनीं सहित ( अस्मयम् ) गर्वानें रहित ( श्रद्धानं ) श्रद्धान करणें हें ( सम्यग्दर्शनं ) सम्यग्दर्शन होय.

**अर्थः**—खरा देव, गुरु व शास्त्र यांजवर श्रद्धा ठेवणें व ती श्रद्धा आठ अंगांनीं युक्त व तीन मूढता व आठ प्रकारचे गर्वरहित अशी असावी. अशा श्रद्धेला सम्यग्दर्शन असें ह्मटलें आहे. जिनदेव हेच खरे देव, जिनशास्त्र हेंच खरें शास्त्र व जिनगुरु हेच खरे गुरु असें जैन मानितात. श्लो. सं. ११ ते १८ मध्ये वर्णिलेले गुण सम्यग्दर्शन्यांमध्ये असले पाहिजेत. त्यानें श्लो. सं. २२ ते २४ मधील तीन मूढता व श्लोक सं. २५ मधील ८ प्रकारचे गर्व यांचा त्याग केला पाहिजे.

यावर कोणी अशी शंका घेतील कीं 'तत्वार्थश्रद्धानम् सम्यग्दर्शनम्' असें मोक्ष-शास्त्रादि ग्रंथामध्यें आचार्यांनीं लिहिलें आहे. मग जीवादि या सात तत्वावर श्रद्धान याला श्रीसमंतभद्राचार्य सम्यग्दर्शन कां ह्मणत नाहींत ! (१) जीव (२) अजीव (३) आस्रव (४) बंध (५) संवर (६) निर्जरा व (७) मोक्ष हीं तीं सात तत्वें होत.

खरा देव, खरा गुरु, खरें शास्त्र अबाधित व निर्दोष आगमाचाच उपदेश करणार. त्रिकालाबाधित व निर्दोष आगमाचाच उपदेश करावयाचा ह्मटल्यास जीवादि सात तत्वावर श्रद्धान ठेवावेंच लागणार. जीवादि सात तत्वावर श्रद्धा न ठेवणारा खरा देव नव्हे, खरा गुरु नव्हे अगर तें खरें शास्त्रही नव्हें. यामुळें अशा देव, गुरु व शास्त्रावरील जें श्रद्धान तेंच जीवादि सात तत्वावरील श्रद्धान; ह्मणून आचार्य समंतभद्र व इतर आचार्य यांच्या सम्यग्दर्शनाच्या व्याख्येंत गेरमेळ नाहीं.

आचार्य उमास्वामी यांनीं आपल्या **तत्वार्थसूत्र** अगर मोक्षशास्त्र या ग्रंथांत पहिल्या अध्यायांतील पहिल्याच सूत्रांत ह्मटलें आहे कीं—

**'सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः'**

भावार्थ हा कीं सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यग्चारित्र हे तीन मोक्षप्राप्तीचे उपाय आहेत मोक्षप्राप्तीचे हे तीन निरनिराळे उपाय अगर मार्ग नाहींत. या तीन्हीचा मिलाफ ह्मणजेच मोक्षमार्ग.

दुसऱ्या सूत्रांत सम्यग्दर्शनाचें स्वरूप अगर लक्षण सांगितलें आहे:— ' तत्वार्थश्रद्धानं सम्यग्दर्शनं ' भावार्थ—जीव, अजीवादि सात तत्वाबद्दल वीत-राग-सर्वज्ञ भगवानांनी जें जें सांगितलें आहे, त्या सांगण्यावर श्रद्धा, विश्वास व भक्ति ठेवणें.

तिसऱ्या सूत्रांत सम्यग्दर्शनाचे (१) निसर्गज व (२) अधिगमज असे दोन भेद सांगितले आहेत. निसर्गज ह्मणजे पूर्वजन्मीच्या अगर पूर्वभवाच्या संस्कारामुळें उत्पन्न झालेली श्रद्धा. दुसऱ्याच्या उपदेशामुळें उत्पन्न झालेल्या श्रद्धेस अधिगमज सम्यग्दर्शन ह्मटलें आहे.

चौथ्या सूत्रांत सात तत्वांचीं नांवें दिलीं आहेत:—

**जीवाजीवास्रवबंधसंवरनिर्जरामोक्षास्तत्वम्**

(१) जीव:—ज्ञानदर्शनरूप चेतना ज्यांना आहे, त्यांना जीव असें ह्मणतात.

(२) अजीव:—ज्यांच्यांत चेतना-हालचालीची-शक्ति नाहीं.

(३) आस्रव:—कर्म-द्वार.

(४) बंध:—कर्मांचा-आत्म्याशीं संयोग होणें. दूध व पाणी यांचें जसें मिश्रण होतें तसें शुद्ध आत्म्याच्या ठिकाणीं कर्मांचा संयोग होणें.

(५) संवर:—आस्रवाला निरोधन करणारे. कर्म जडण्याच्या मार्गाला-क्रियेला-आस्रव व कर्म बंद करण्याच्या मार्गाला संवर म्हणतात.

(६) निर्जरा:—आत्म्याला जे कर्मांचे डाग लागलेले असतात त्यांचा एकदेश-अंशत:—क्षय होणें. कर्मापासून आत्म्यानें मुक्त होणें.

(७) मोक्ष:—आत्मा कर्मांपासून सर्वस्वी, संपूर्णपणें मुक्त होतो ती स्थिती.

आचार्य समंतभद्र यांनीं खरा देव, गुरु व शास्त्र यांवर नितांत श्रद्धा ठेवणें यालाच सम्यग्दर्शन ह्मटलें आहे. आचार्य उमास्वामी जीवादि सात तत्वावर श्रद्धा ठेवणें, याला सम्यग्दर्शन ह्मणतात. या दोहोंचा समन्वय

कसा केला जातो हें यापूर्वी लिहिलें आहे. आचार्य उमास्वामींचें प्रतिपादन थोड्याशा विस्तारानें कळण्यासाठीं वर तत्वार्थसूत्रांतील पहिल्या बारही सूत्रांची स्थूलमानानें ओळख करून दिली आहे.

सम्यग्दर्शनाच्या व्याख्येंत असा मतभेद दिसत असला तरी सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यग्चारित्र या रत्नत्रयीनेंच मोक्षप्राप्ति होणार हें सर्वांनाच मान्य आहे.

समन्वयाचा प्रयत्न पटो वा न पटो, आचार्य समंतभद्र यांची सम्यग्दर्शनाची व्याख्या अधिक पटणारी आहे.

आचार्य उमास्वामी जीवादी सात तत्वावर श्रद्धा ठेवणें ह्मणजे ती तत्वें मान्य करणें याला सम्यग्दर्शन ह्मणतात. आचार्य समंतभद्र आप्त, आगम व तपोभृत यांना मानणें एवढ्यालाच सम्यग्दर्शन मानीत नाहींत. जीवादि सात तत्वें व आप्त, आगम आणि तपोभृत-गुरु हें एकच मानिलें तरी आचार्य समंतभद्र यांची सम्यग्दर्शनाची व्याख्या अधिक व्यापक आहे असें ह्मणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. देव, गुरु व शास्त्र यावर नितांत श्रद्धा आहे परंतु तीन प्रकारच्या मूढतेचा त्याग झालेला नाहीं आणि निःशंकितादि आठ अंगाचा स्वीकार केलेला नाहीं तर सम्यग्दर्शनी झाला असें मानतां येणार नाहीं. यावरून आचार्य समंतभद्र यांची व्याख्या अधिक व्यापक आहे असें दिसून येईल. समंतभद्राचार्यांच्या मतें (१) श्रद्धा पाहिजे (२) निःशंकितादि आठ अंगें पाहिजेत व तीन प्रकारच्या मूढता व आठ प्रकारचे गर्व नसावेत. आचार्य उमास्वामींच्या सम्यग्दर्शनाच्या व्याख्येंत तीन प्रकारच्या मूढता व आठ अंगें यांचा समावेश होईल असें वाटत नाहीं.

कोणी ह्मणतील कीं तत्वावर श्रद्धा ह्मणजे खरा देव गुरु व शास्त्र यावर श्रद्धा व खरा देव, गुरु व शास्त्र यावर श्रद्धा ह्मणजेच तीन्हि प्रकारच्या मूढतांना गचांडी असें मानिले तरी आठ अंगांच्या स्वीकाराची उणीव भासतेच.

दुसऱ्या दृष्टीनें विचार करितां उमास्वामींनी केलेली सम्यग्दर्शनाची व्याख्या अधिक सुटसुटीत दिसली तरी सात तत्वें समजून घेण्याची व नंतर ज्ञानपूर्वक श्रद्धा ठेवण्याची पात्रता फारच थोड्यांत आढळ होईल. असें म्हणत असतां आगम या शब्दाच्या अर्थाची व्याप्ति आम्ही मर्यादित करीत आहो, याची जाणीव आहे.

या दोन्ही व्याख्यांचा समन्वय करणें आमच्या अवाक्या बाहेरचे आहे, तथापि मनांत आलेले विचार दडपून ठेवण्यापेक्षां त्यांना वाच्यता देणें इष्ट वाटल्यानें ते विचारासाठीं मांडिले आहेत.

### आप्त-खरा देव-लक्षण

**आप्तेनोच्छिन्नदोषेण सर्वज्ञेनागमेशिना ।**
**भवितव्यं नियोगेन नान्यथा ह्याप्तता भवेत् ॥ ५ ॥**

**अन्वयार्थः**—( नियोगेन ) निश्चयानें ( उच्छिन्नदोषेण ) निर्दोषपणा ( सर्वज्ञेन ) सर्वज्ञपणा ( आगमेशिना ) हितोपदेशीपणा, यांच्या योगानेंच ( आप्तेन) आप्त ( भवितव्यं )होतो. ( हि ) कारण कीं ( अन्यथा ) दुसऱ्या प्रकारें ( आप्तता ) आप्तपणा ( न भवेत् ) प्राप्त होत नाहीं.

**अर्थः**—मागील श्लोकांत खऱ्या देवावर श्रद्धा ठेवावी असें प्रतिपादलें आहे. या श्लोकांत खऱ्या देवाचीं-आप्ताचीं-लक्षणें सांगितलीं आहेत. या गुणांनीं-लक्षणांनीं- युक्त जो देव तोच खरा देव होय. अज्ञानामुळें दगड, झाड, जनावर व गुणरहित अनेकांना व्यावहारिक भाषेंत देव अशी संज्ञा दिली जाते. देव-आप्त-हा तीन गुणांनींयुक्त असला पाहिजे. (१) निर्दोषीपणा (२) सर्वज्ञता व (३) परमहितोपदेशीपणा असे तीन गुण खऱ्या देवाच्या अंगीं असतात. तसेंच रागद्वेषादि अठरा दोषरहितही तो असतो. तो सर्वज्ञ वर्तमान, भूत व भविष्यकाल जाणणारा असतो. एवढ्यानेंही तो खरा देव या संज्ञेला पात्र होत नाहीं.

दिव्य ध्वनीनें जो सर्वांना व सदाकाळीं हितकर असा निःस्वार्थबुद्धीनें उपदेश देतो, तो खरा देव होय. वरील दोष ज्याला टाळतां आले नाहींत तो इतरांना निर्दोषी व सुखी कसा करूं शकणार? कामक्रोध-क्षुधातृष्णादिकांचीं ज्याला बाधा होते तो ईश्वर-देव-या संज्ञेला पात्र मानणें चुकीचें होईल. जो दुसऱ्याचा द्वेष करितो, ज्याचा लोभ सुटलेला नाहीं, त्याच्यांत व इतर सामान्य मनुष्यांत फरक तो कोणता? जो स्वतःच्या जीवाच्या भीतीमुळें शस्त्रास्त्रें जवळ बाळगितो तो देव कसचा?

तीन गुणांनीं सहित असें ह्मणण्याचें प्रयोजन काय? निर्दोषांत दुसऱ्या दोन्ही गुणांचा अन्तर्भाव होत नाहीं? पहिल्या गुणांत दुसऱ्या दोन्ही गुणांपैकीं कोणत्याही गुणांचा समावेश होत नाहीं. अठरा दोष रहित व सर्वज्ञ असतांही परमहितोपदेशी दिव्यध्वनीचा लाभ वीतराग प्रभूशिवाय इतरांना मिळत नाहीं यासाठीं या तिन्ही गुणसमुच्चयामुळें वीतरागपद-देवपणा-मिळतो.

दुसरें समाधान असें कीं आकाश, धर्म, अधर्म, पुद्गल व कालादिकामध्यें निर्दोषपणा हा गुण आहे. निर्दोषपणा व सर्वज्ञता हे गुण सिद्ध भगवानांच्याहि अंगीं असतात; परंतु परमहितोपदेशकता हा गुण सिद्ध भगवानांच्या अंगीं नसतो. मात्र हे तिन्ही गुण वीतरागप्रभूंच्या ठिकाणींच असतात. यासाठींच त्यांना आप्त असें ह्मटलें आहे.

सहाव्या श्लोकांत अठरा दोषांचें, सातव्या श्लोकांत हितोपदेशिकाचें, नवव्या श्लोकांत खऱ्या शास्त्राचें व दहाव्या श्लोकांत खऱ्या साधूंचें लक्षण-स्वरूप-सांगितलें आहे.

### अठरा दोष.

**क्षुत्पिपासाजरातंकजन्मांतकभयस्मयाः ॥**
**न रागद्वेषमोहाश्च यस्याप्तः स प्रकीर्त्यते ॥ ६ ॥**

अन्वयार्थः—( क्षुत्पिपासाजरातंकजन्मांतकभयस्मयाः ) क्षुत्-भूक, पिपासा-तहान, जरा-म्हातारपण, आतंक-रोग, जन्म-जन्म, अंतक-मृत्यु-

मरण, भय-भीति, स्मय-गर्व, ( रागद्वेषमोहाः ) राग, द्वेष व मोह (च) इत्यादि-म्हणजे चिंता, अरति, झोंप, आश्चर्य, शोक, घाम, खेद, ( यस्य ) ज्याला ( न सन्ति ) नाहींत ( सः ) तो आप्त ( प्रकीर्त्यते ) म्हणविला जातो.

अर्थ—ज्या अठरा दोषांचा त्याग आप्त करितात त्या सर्व दोषांचीं नांवें या श्लोकांत दिलीं नाहींत. या अठरा दोषांपैकीं फक्त ११ दोषांचाच तेवढा नामनिर्देश करण्यांत आला असून ' रागद्वेषमोहाश्च ' या शब्दांतील ' च ' म्हणजे ' इत्यादि ' धरून इतर सात दोषांचा समावेश करण्यांत आला आहे. ते सात दोष म्हणजे (१२) चिंता (१३) अरति (१४) झोंप (१५) आश्चर्य (१६) शोक (१७) घाम व (१८) खेद. चारही घाति-कर्मांचा नाश केल्यानें वीतराग हे वरील १८ ही दोषरहित होऊं शकतात. आहारा-शिवाय जगणें शक्य नाहीं, असें मानण्याचें कारण नाहीं. देवयोनीही आहारा-शिवाय जगते मग वीतराग प्रभूंना ते अशक्य कसें म्हणतां येईल ? या वादाचा अधिक उहापोह प्रस्तुत प्रसंगीं अनुचित असल्यानें त्याचा केवळ ओझरता उल्लेख केला आहे.

### हितोपदेशिकांचें लक्षण अथवा आप्तांचीं दुसरीं नांवें.

**परमेष्ठी परंज्योतिर्विरागो विमलः कृती ।**

**सर्वज्ञोऽनादिमध्यान्तः सार्वः शास्तोपलाल्यते ॥ ७ ॥**

**अन्वयार्थः**—( परमेष्ठी ) परमेष्ठी, ( परंज्योतिः ) केवलज्ञानी, ( विरागः ) वीतराग, ( विमलः ) कर्म-मलानें रहित ( कृती ) कृतकृत्य ( सर्वज्ञः ) सर्वज्ञ-सर्व जाणणारा, ( अनादिमध्यान्तः ) आदि, मध्य व अन्त-शेवट यानीं रहित ( सार्वः ) हितकारी, ( शास्ता ) उपदेशी-आप्त ( उप-लाल्यते ) म्हणविला जातो.

**अर्थः**—(१) परमेष्ठी—इंद्रादि देवांकडून वंदनीय व समवसरणादि स्थानांत विराजमान-समवसरणांत विराजमान होण्याचा मान-अतिशय भाग्य, हें वीतराग प्रभू शिवाय इतरांना नाहीं. ( समवसरण=सभामंडप ) चार

अंगुलें अधांत्री बसणें व इंद्रादिकांनी छत्रचामरें ढाळणें व वीतराग प्रभूंनीं जन्मजरामरणादि व्याधींतून मुक्त होण्याचा उपदेश दिव्यध्वनीनें करणें इत्यादि अर्थाचा परमेष्ठी या शब्दांत समावेश होतो.

(२) परंज्योति—केवलज्ञानी-सर्वश्रेष्ठज्ञानी.

(३) विराग—रागद्वेषादि भावकर्म रहित.

(४) विमल—ज्ञानावरणादि कर्मांचा ज्यांनीं नाश केला आहे.

(५) कृती—कृतकृत्य—ज्यांना करण्याचें असें कांहींच राहिलेलें नाहीं. ज्यांचा आत्मा अनंतज्ञानादिमय स्वरूपाला—आत्मस्वरूपाला—पोहोंचला आहे.

(६) सर्वज्ञ-सर्व पदार्थांना एकाच वेळीं जाणणारे डोळे कान इत्यादि इंद्रियांच्या मदतीशिवाय सर्व पदार्थांना—चराचर वस्तूंना-एकाच वेळीं क्रम-रहित जाणणारे.

(७) अनादिमध्यान्त-आदि, मध्य व अन्त रहित. वीतराग हे अनादि कालापासून आहेत व त्यांचा अंत-शेवट कधींही होत नाहीं.

(८) सार्वः-समस्त प्राणीमात्रांच्या हितासाठीं ज्यांची वाणी व कृति असते, त्यांना सार्व असें म्हणतात.

जैनधर्म-मीमांसा दुसरा भाग पान २०६।२०७–' ज्ञान के भेद ' या पांचव्या अध्यायांत श्रीधवलकार व इतर आचार्यांच्या दर्शन-ज्ञान-केवलज्ञान इत्यादि बद्दलच्या निरनिराळ्या मतांचा विचार करीत असतां खालील उद्गार आढळ होतात:— अगर धवलाकार यह सोचते की " भगवान महावीर सर्वज्ञ थे उन्हीं का उपदेश जैन ग्रंथो मे लिखा है, उसका विरोध करके मै मिथ्यादृष्टी क्यों बनू " तो वह यह खोज न कर पाते। परंतु उनने मन में यही विचार किया होगा की " भगवान सर्वज्ञ अर्थात् आत्मज्ञ थे इस लिये यह आवश्यक नही की उनका कोई भी निर्णय पुनर्विचारणीय न हो। अथवा भगवान का निर्णय आज उपलब्ध कहा है ! भगवान उपदेश तो लोग भूल गये है, इसलिये तर्क से जो सत्य सिद्ध हो उसे ही भगवान की

वाणी मानना चाहिये-भले ही वह पूर्वाचार्यों के विरुद्ध हो, क्योंकि सत्यही जैनधर्म है."

यावरून फार प्राचीन काळापासून केवली वाक्य कोणतें, महावीर वाणी कोणती ? याबद्दल शंका उपस्थित झाल्या आहेत. हें पुस्तक वाचीत असतांही कांहीं बाबतींत आचार्यवचनांत भिन्नता आढळते असें दिसून येईल. महावीर वाणी आज उपलब्ध नाहीं त्यामुळें जेथें जेथें असा विरोध व भिन्नता दिसेल तेथें तेथें तर्कानें सत्य कोणतें असावें हें ठरवावें; कारण सत्य ह्मणजे जैनधर्म होय.

यापेक्षां अधिक खोलांत जाण्याची आमची योग्यता नाहीं; व दुसरें असें कीं, अधिक चर्चा एकतर अप्रस्तुत होईल.

वर वीतराग प्रभूंच्या इतर आठ गुणदर्शक नांवाचा अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे, त्यामुळें वाचकांना विशेष बोध होईलच असें न वाटल्यानें स्व. वा. पं. सुखचंदजी यांच्या श्रावकाचारावरील हिंदी टीकेवरून सारांश रूपानें अधिक खुलासा यापुढें दिला आहे. त्यांनीं लिहिलें आहे कीं:- वीतराग प्रभूंना आठ सार्थ नांवें दिलीं आहेत. इंद्रादि देव वीतरागांना वंदतात. वीतराग प्रभूंचा आत्मा परमात्मस्वरूपांत समवसरणांत विराजमान झालेला दिसतो. त्यांचा आत्मा अनंत ज्ञानदर्शनसुखस्वरूपीं दिसतो. समवसरणांत त्यांचा आत्मा जमिनीपासून ४ बोटें अधांत्री असतो. दिव्य सिंहासनाधिष्टित आत्म्यावर इंद्रादिदेव चामरें ढाळीत असतात. भगवंतांच्या दिव्य ध्वनींतून निघणाऱ्या उपदेशामृताचें सेवन करून जन्ममरणादिकांच्या फेऱ्यांतून सुटका व्हावी ह्मणून त्यांचा उपदेश ऐकण्यासाठीं चराचर प्राणी उत्सुकतेनें व वैरभाव विसरून सभास्थानीं बसलेले असतात. अशा प्रभूंना परमेष्ठी संबोधिलें जातें.

आपल्या अतींद्रिय ज्ञानानें लोक व अलोक यांतील सर्व पदार्थांचें एकाच वेळीं संपूर्णज्ञान ज्यांना असतें ते परंज्योति या सार्थ नांवाला पात्र होतात. नाक, डोळे व कान इत्यादी इंद्रियांच्या साधनांनीं समीपवर्ती व

क्रमानें एकामागून एक ज्ञान होतें त्यांना परंज्योति असें कसें ह्मणतां येईल ? सामान्य लोकांचें ज्ञान इंद्रियजनित असतें, तें अपुरें असतें व तें एकाच वेळीं होत नसतें.

सर्व चराचर वस्तूबद्दल रागद्वेषादि अभाव ज्यांच्या ठिकाणीं असतो त्यांना विराग अथवा वीतराग ह्मणतात. कामक्रोधादि भावमल व मूत्र, पुरीष व वातपित्तादिक शरीरमल हे सर्व ज्यांचे नष्ट झाले आहेत व ज्यांची सावलीही पडत नाहीं, अशांना विमल या सार्थ नांवानें संबोधिलें जातें. यावरून आप्तांच्या अंगीं कोणकोणते गुण असतात यांची कल्पना येईल अशी आशा आहे.

आपली आणखी आठ नांवें आहेत, हें तीर्थंकर प्रभूंनींच सांगितलें आहे, असें मानण्यापेक्षां त्यांच्या गुणावरून धर्मज्ञांनीं हीं आठ नांवें त्यांना दिलीं, असें मानणेंच अधिक सयुक्तिक होईल.

## आत्मा-परमात्मा-यांची स्थूल ओळख

### आत्म्याचे भेद.

श्रीपूज्यपादस्वामी आपल्या **समाधिशतकांत** लिहितात कीं:—

बहिरन्तः परश्चेति त्रिधात्मा सर्व देहिषु ।
उपेयान्तत्र परमं मध्योपायाद्बहिस्त्यजेत् ॥ ४ ॥

**भावार्थः**—सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं (१) बहिरात्मा (२) अंतरात्मा व (३) परमात्मा असे तीन प्रकारचे आत्मे आहेत. **परमात्मप्रकाशांतही** आत्म्याचे तीन भेद मानिले आहेत. (१) बहिरात्मा, आपलें शरीर ज्या प्रकारचे आहे त्याच प्रकारचा आपला आत्मा आहे व कर्मोदयानें जी जी अवस्था प्राप्त होते त्या त्या अवस्थेचा आपला स्वभाव आहे, असें समजणें; हें बहिरात्म्याचें लक्षण आहे. मन, वचन, व काय यांच्या साहाय्यानें ज्या ज्या क्रिया घडतात त्या त्या क्रियेला बहिरात्मा या क्रिया आपल्या आहेत असें समजतो, शास्त्राध्ययन केलें व त्या अभिमानामुळें

इतरांना तुच्छ लेखण्यांत समाधान मानणारा जो आत्मा तो बहिरात्मा होय. मी उच्चकुलीन आहे, मी श्रीमंत आहे, मी विद्वान आहे, मी शक्तिमान व आरोग्य संपन्न आहे इत्यादि गर्व वाहणारा आत्मा बहिरात्मा आहे. छत्र चामरादिकांनीं विभूषित असलेल्या तीर्थंकर प्रभूंच्या शरीराला-देहाला-अरहंत समजणारा बहिरात्मा होय. बहिरात्मा गुणाकडे पाहून त्यांना अरहंत ठरवित नसतो तर तो केवळ बाह्य गोष्टीकडे पाहतो.

(२) अंतरात्मा:—सम्यग्दृष्टींना अंतरात्मा असें ह्मणतात. पहिल्या गुण-स्थानापासून सातव्या गुणस्थानापर्यंत येणारा अंतरात्मा होय.

(३) परमात्मा:—उत्कृष्ट व परम पवित्र आत्म्याला परमात्मा ह्मणतात. आत्मा ज्यावेळीं परमात्मपदाला पोहोंचतो त्यावेळीं त्याच्या समवेत पापही नसतें व पुण्यही नसतें. यावरून परमात्मपदप्राप्तीच्या वेळीं पाप शिल्लक नसतें अगर पुण्यही शिल्लक नसतें. पाप अगर पुण्य या दोन्हीपैकीं कोणतेंही शिल्लक असलें कीं जन्मजरामरणादिकांचा फेरा चुकवितां येत नाहीं. जो आत्मा या फेऱ्यांतून मुक्त होतो, तो परमात्मा होय.

सामान्य भाषेंत बोलावयाचें झालें तर मिथ्यात्वी जीवाचा आत्मा बहि-रात्मा, सम्यकत्वी जीवाचा आत्मा अंतरात्मा व जेथें पाप व पुण्य हीं दोन्हीही नाहींत तो परमात्मा. अधिक खुलाशाबद्दल **योगसार टीका** पाहाण्यांत यावी.

जिनवाणी प्र. शासन मालेंतील **परमात्म-प्रकाश** पान ३४ वर पुढील माहिती दिली आहे:—

" ह्याप्रमाणें आत्मा तीन प्रकारचा आहे. अर्थात बहिरात्मा, अंतरात्मा व परमात्मा असें आत्म्याचे तीन भेद आहेत. यांत जो शरीरालाच आत्मा असें मानतो, तो प्राणी बहिरात्मा होय. अर्थात तो बाहिर्मुख मिथ्यादृष्टी होय. विशेषार्थ-जो मनुष्य देहाला आत्मा समजतो, तो वीतराग व निर्विकल्प अशा समाधीपासून उत्पन्न झालेलें असें परमानंद सुखामृत मिळवीत नसल्यामुळें मूर्ख किंवा अज्ञानी आहे. या तीन प्रकारच्या आत्म्यांतील बहिरात्मा त्याज्यच

आहे, म्हणजे आदर करण्याला योग्य नाहीं. याच्या अपेक्षेनें जरी अंतरात्मा ( सम्यग्दृष्टी ) हा उपादेय म्हणजे ग्रहण करण्याला योग्य आहे, तथापि सर्व प्रकारें उपादेय असा जो परमात्मा त्याच्या अपेक्षेनें तो अंतरात्माही हेयच आहे ( त्याग करण्याला योग्यच आहे. ) शुद्ध असा परमात्मा हाच ध्यान करण्याला योग्य आहे असें जाणावें. "

अनेक वेळां कळत वा न कळत परमात्मा या ऐवजीं अंतरात्मा हा शब्दप्रयोग केला जातो. जो बहिरात्मा नव्हे तो अंतरात्मा, एवढाच मतितार्थ मनश्चक्षूपुढें असल्यानें असें घडत असावें.

### परमात्मा कोण ?

परमात्मप्रकाश पान ५९ वरील विवेचन पुढीलप्रमाणें आहे—
" समभाव म्हणजे जीवित, मरण, लाभ, अलाभ, सुखदुःख, शत्रु-मित्र इत्यादिकामध्यें समताबुद्धी ठेवलेल्या परमयोगीश्वरांनां—अर्थात ज्यांनां शत्रुमित्र इत्यादि समान वाटतात **आणि** जे सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्ररूप अभेद रत्नमय हें ज्याचें स्वरूप आहे, अशा वीतराग व निर्विकल्प समाधीमध्यें स्थित आहेत. त्या योगीश्वरांच्या हृदयामध्यें वीतराग परम आनंद उत्पन्न करणारा असा जो कोणी ( आत्मा ) स्फुरायमाण होतो, तोच निश्चयानें परमात्मा आहे, असे जाण—" यावरून परमात्मपदास पोंहोंचण्यास कोणकोणत्या गुणांची जरूरी असते, हें कळून येईल. समताभाव आणि अभेद रत्नत्रय हे परस्पर भिन्न आहेत ? अशी शंका वरील उताऱ्यांतील **आणि** या शब्दावरून आल्यानें तो शब्द जाड अक्षरांत घातला आहे.

### शरीर व आत्मा यांचे अन्योन्य संबंध

समयसारांत म्हटलें आहे कीं:—

' ववहारणओ भासदि जीवो देहो य हवदि खलु इक्को, ' इत्यादि

भावार्थः—व्यवहारनयानें विचार करितां देह-शरीर-व आत्मा हीं एकच आहेत; परंतु निश्चयनयाने पहातां आत्मा व शरीर हें भिन्न आहेत. अरहंत प्रभूंच्या पुद्गलमय शरीराची स्तुती अगर शरीराला नमस्कार करणें हें निश्चय-

पणाच्या दृष्टीनें योग्य नाहीं. नमस्कार करावयाचा तो शरीरांतील गुणांना— शुद्धात्म्यांना करावयाचा असतो.

## आत्म्याला आकार असतो ?

आत्मा हा ज्या शरीरांत असतो त्या शरीरापेक्षां लहान असणें शक्य नाहीं. लहान आहे असें मानिल्यास शरीराच्या सर्व संवेदना त्याला होणार नाहींत.

## आत्मा एकच आहे कीं अनेक आहेत ?

कांहींच्या मतें आत्मा एकच आहे व तो सर्वव्यापी आहे. परंतु ती विचारसरणी चुकीची आहे. आत्मा एकच आहे व तो सर्वव्यापी आहे, असें मानल्यास एकाचें जें ज्ञान तेंच सर्वांना असले पाहिजे. सांगलीस बसून हापूस आंबा खाल्यानें मला जें सुख होतें तेंच व तसलेंच सुख जगावरील सर्व प्राणीमात्रांना व्हावयास पाहिजे; परंतु तसें घडत नाहीं, म्हणून एकच व सर्व-व्यापी आत्मा नाहीं. प्रत्येक प्राणीमात्रांच्या ठिकाणीं आत्मा आहे व त्यामुळें तो अनंत आहे; तो सर्व व्यापीही नाहीं. तो ज्या त्या शरीरापुरता व शरीराच्या आकाराचा असतो म्हणजे सर्व शरीर व्यापून राहिलेला असतो.

यावरून आत्म्याचे प्रकार अगर भेद हे तीन प्रकारचे आहेत व शरीर-देह व आत्मा हीं भिन्न भिन्न आहेत असें दिसून येईल.

## आत्मा सर्वत्र दिसतो, पण केव्हां व कोणता ?

आत्मज्ञान्याला आत्मा सर्वत्र दिसतो. भावना ही अनुभवाची जननी आहे. समताभाव उत्पन्न झाला पाहिजे. सामायिक शिक्षाव्रतांत समभावनेलाच उच्चस्थान दिलें आहे. सामायिक शिक्षाव्रताचें पालन करीत असतां दिवसांतून अधिकाधिक सहा घटका कां होईना सामायिकव्रती शत्रु, मित्र, आप्तइष्ट व सुखदुःख यांना सर्वस्वीं विसरतो. परमशांत व समभावी झाल्यानें कर्माच्या -शुभ वा अशुभ-क्षयाच्या उपायाची किल्ली हस्तगत होते. परमशांत व समभावी झाल्यानें नाना तऱ्हेच्या शंकाकुशंकांना जागा रहात नाहीं. पूजा-

पाठादि करावयाचा आहे, शुद्ध आहार घेणेचा आहे, अशुद्ध आहार घेणेचा नाहीं, अमक्याच्या हातचें खावयाचें व तमक्याच्या हातचें खावयाचें नाहीं वगैरे वगैरे गोष्टींचा त्याला विचार कर्तव्यच नाहीं. कारण त्याच्या मनांत समता व समभाव उत्पन्न झालेला असतो, तो परमशांत झालेला असतो, तो आहार देणाऱ्याचें शरीर कोणाचें आहे, हें पाहात नाहीं. त्याच्या शरीरांतील आत्मा त्याला दिसतो व त्याजकडेच पाहतो.

### आत्म्याचें स्वरूप.

आवाजावरून हा आत्मा असें ओळखतां येत नाहीं. अगर विचाराच्या चक्षूलाही तो दिसत नाहीं. आत्म्याची ओळख निर्विकल्प झाल्याशिवाय होत नाहीं. समताभावच झाल्यावर त्याची ओळख पटते. ईश्वर सर्वत्र आहे. प्रत्येकाच्या देहांत आहे, असें वैदिक धर्मानुयायी मानतात. जैनधर्म ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहीं. तथापि हिंदुधर्मांतील **ईश्वर** या जागीं **आत्मा** असें समजून दोन्ही धर्मांच्या शास्त्रग्रंथाकडे पाहिल्यास बरेंच साम्य आढळून येतें.

### आत्मध्यान व त्याचा परिणाम.

आत्मध्यानाचें अनेक प्रकार तऱ्हा अगर रीति सांगितल्या आहेत. आत्मध्यानामुळें आत्मा कर्मापासून अलग होतो. आत्म्याचें कर्म सुटतें. आत्मा मलहीन होत होत जाणें म्हणजे मोक्षमार्गाच्या पायरीवर चढत चढत जाणें. मळलेल्या कपड्यावरील डाग काढावयाचे झाल्यास डाग पडलेल्या कपड्याच्या भागावर विशेष लक्ष देऊन तो कपडा धुतला म्हणजे डाग जसे एकाच वेळीं अगर हळूं हळूं निघून जातात; तद्वतच आत्मध्यानामुळें आत्म्याचें कर्मरूपी डाग नाहींसे होतात.

### आत्मध्यानामध्यें तल्लीनता पाहिजे.

आत्मध्यानाचेवेळीं--सामायिकाचेवेळीं--कोणकोणते विचार मनांत आणावेत, कोणकोणाचे ध्यान करावे ? आत्मध्यान बसून, उभे राहून व कशाप्रकारें करावे, याबद्दलच्या अनेक योजना व उपाय सांगितले आहेत.

आत्मध्यानाचेवेळीं आपलें मन आत्मध्यानांत तल्लीन झालें पाहिजे. आत्म-ध्यानांत तल्लीनता आली कीं, तितक्या काळांत आपण स्वतःला, स्वतःच्या शरीराला व स्वतःच्या संसारांतील सुख व दुःखाला विसरतो. जितका काळ मनाची अशी स्थिती राहील तितका काळ आपण मुनि होऊं.

अशा तल्लीनतेचें अनुभव नित्य व्यवहारांत अनेक वेळां येतात. एखादें महत्वाचें पत्र आपण लिहीत असतां आपल्या मनाची तल्लीनता अगर चित्ताची एकाग्रता इतकी होते कीं, त्यावेळीं आपल्या जवळ इतर कोण आले तरी त्यांची चाहूलही ऐकूं येत नाहीं. आलेल्या इसमानें चाहूल दिलीच तर मनावर एकदम धक्का बसतो व आपण भ्यालो अगर आपल्याला धक्का बसला असे उद्गार सहजा सहजीं निघून जातात. अशी एकाग्रता झाल्यावेळीं कितीवेळ निघून गेला याचें स्मरणही राहात नाहीं. कांहीं महत्वाचा विषय बोलत आपण आपल्या मित्राबरोबर चाललो आहो; त्या विषयांत आपली एकाग्रता इतकी झालेली असते कीं पाठीमागून येणाऱ्या लोकांचीच नव्हे, टांगयाच्या घंट्याचीच नव्हे, तर धोका टाळावा म्हणून मोटारवाला 'हॉर्न' वाजवुन सूचना देत असतो, तो कर्कश आवाजही ऐकूं येत नाहीं. कारण त्यावेळच्या बोलण्याच्या विषयात आपण इतके रंगून गेलेलो असतो, इतके तन्मय झालेलो असतो कीं, आपल्या इंद्रियापुढें एकच विषय असतो. बाकीच्या सर्व सुखदुःखाचें विस्मरण झालेलें असतें. कांहीं वेळां 'ऑपरेशन' करितांना एक प्रकारची भूल दिली जाते, व त्यावेळीं आपल्याच शरीराचा एखादा भाग तोडला, कापला किंवा चिरला जात असतां, त्या 'आपरेशन' चा त्रास बिलकूल होत नाहीं. तोडलें, कापले अगर चिरले जात असल्याचें डोळ्यांनीं पहात असतांनाहीं त्याच्या वेदना मुळींच होत नाहींत. कारण एकच व तें हें कीं गुंगीचा तो परिणाम. त्याचप्रमाणें आत्मध्यानाच्या ध्यासाचा कैफ चढला कीं सर्व दुःखांचें व शत्रुमित्रांचें विस्मरण होतें व परमात्मपदीं लीन होतो. 'ब्रह्मानंदीं लागली टाळी मग तो देहातें काय सांभाळी' या सुप्रसिद्ध वच-

नांतील मनोवृत्ती म्हणजेच आत्म्याचें स्वरूप जाणणें अगर परमात्मपदाला पोहोंचणें.

भावना ही अनुभवाची जननी आहे, असें वर म्हटलें आहे. कांहीं उदाहरणें देऊन याबद्दलचा थोडासा अधिक खुलासा करणें अप्रस्तुत होणार नाहीं. तंबाकू लावलेल्या शेतांत तंबाकूचें पीक पहाण्यासाठीं जाणाऱ्याचें लक्ष त्या पिकाकडेच असतें. त्या जमीनींत बाभळीचें अगर अन्यतऱ्हेचें झाड असल्यास तिकडे लक्ष जात नाहीं. तसेंच रत्नजडित दागिना विकण्यास नेला असतां रत्नाच्या किंमतीकडे घेणाऱ्याचें लक्ष असतें, ज्या सोन्यांत त्याचें कोंदण केलें असतें, त्या सोन्याच्या किंमतीकडे लक्ष नसतें.

म. गांधी हे आपल्या आश्रमांतील एका महारोग्याची जातीनें शुश्रुषा करितात. म. गांधींचें लक्ष त्या रोग्याच्या देहावर नसतें. समताभावामुळें त्याचा रोगग्रस्त देहही त्यांना रोगग्रस्त दिसत नाहीं. त्या देहांतील आत्माच त्यांना दिसतो.

इतर धर्मीय साधुसंतांच्या कांहीं गोष्टी आपण पाहिल्या अगर ऐकिल्या तरी असतील. त्यांना आपला अगर इतराचा शौच्य, चिखल अगर शेण यांत फरक दिसत नाहीं. अशांना वाटेल त्यानीं शिळें, पाकें अगर कसलेंही अन्न घालावें व तें त्यांनीं खावें

आपल्याच पुराणांतरीची एक कथा. एका आचार्यांपुढें ताटांत मांस वाढून ठेविलें असतां त्याचें कमल झालेलें आपण ऐकितों व वाचतों.

समभावामुळें आपपर, इष्टानिष्ट इत्यादि दुजाभाव पार नाहींसा होतो. व अशांना आत्म्याचें दर्शन होतें. व्यावहारिक दृष्टया नर, नरक, देव व पशु इत्यादि भेद आहेत; परंतु समताभाव ज्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाला आहे, तो हा देह देवाचा आहे कीं नारकीचा आहे, हे त्यास दिसत नाहीं. जगभर व्यापून राहिलेला आत्माच त्यांच्या ठिकाणीं त्याला दिसतो.

असातत्नेचा समताभाव हा शुभ व अशुभ म्हणजे पाप व पुण्य यांचा क्षय करण्यास कारणीभूत आहे. पुण्य अगर पाप यापैकीं दोहोंचा सांठा संसारांत परिभ्रमण करण्यास कारणीभूत आहे. पुण्यकर्मांच्या उदयानें सुख कीर्ति इत्यादि मिळेल व पापामुळें नरकादी गती मिळेल. परंतु या दोन्ही-मुळें संसारचक्रांतून सुटका होत नाहीं. अशी सुटका होण्यास समभावच कारणीभूत आहे. समभावामुळेंच कर्मांचा क्षय होणार. समताभाव ज्याला आहे त्याला आत्म्याचे दर्शन व मोक्षप्राप्ति होणार.

( योगसार टीका १६८ ते १७० )

## ज्ञानी कोणाला म्हणावें ?

आत्मा कोणाला व केव्हां दिसतो याबद्दल यापूर्वी थोडासा विचार झाला आहे. आत्मज्ञान्याला आत्मा सर्वत्र दिसतो, समताभाव धारण करणाऱ्यांना आत्मा सर्वत्र दिसतो इत्यादि चर्चा झाली आहे. हा प्रश्न अनेक दृष्टीनीं अनेकांनी सोडविला आहे या उत्तरापैकीं पुढील उत्तर बरेंच उद्बोधक होईल असें वाटतें.

' जो पापकृत्याला तें कृत्य पापकृत्य आहे असें जाणतो, परंतु त्याबरोबरच पुण्यकृत्यालाही पापच समजतो, तोच खरा ज्ञानी आहे ' व अशा ज्ञान्यालाच आत्मानुभव येतो.

वरील अवतरण चिन्हांतील पुण्यकृत्यालाही पापच जो समजतो तोच खरा ज्ञानी आहे, ही विचारसरणी वाचून वाचकांना आश्चर्य वाटेल, हें खरें आहे; परंतु त्याच्या कारणाचा विचार केल्यास वरील विचारसरणीच खरी आहे असें दिसून येईल.

ज्या ज्या वेळीं धर्माची चर्चा होते त्या त्या वेळीं पुण्यकर्म करा, पापकर्म करूं नका, पुण्यकर्मानें भूतलावर संतती, संपत्ती, मानमरातब, दीर्घायुष्य इत्यादिकांचा लाभ होतो, असें सांगण्यांत येतें. स्वर्गांत इंद्र, अहमिंद्र

इत्यादि पद मिळतें. तो चक्रवर्ति होतो, नारायण व प्रतिनारायण होतो, इत्यादि इत्यादि सांगण्यांत येतें; व तें खरेंही आहे.

परंतु असें ऐश्वर्य भोगणें हा आत्म्याचा हेतू नाहीं, ध्येय सर्वस्वी निराळें आहे. तें ध्येय म्हणजे मुक्ती. पुण्यकर्माच्या उदयानें चक्रवर्ति, अहमिंद्र, नारायण व प्रतिनारायण पद मिळालें तरी तें शाश्वत नाहीं. पंचवीस वर्षें नोकरी केली कीं सरकार त्याला घरीं बसावयास सांगतें. सांगलीहून पुण्याचें तिकीट काढलें कीं पुण्यास उतरावें लागतें; त्या तिकीटावरून मुंबईस जातां येत नाहीं. त्याचप्रमाणें चक्रवर्ति अगर अहमिंद्रपदाची मुदत भरली कीं तें पद त्याला सोडावें लागतें. त्यामुळेंच असें नश्वर व क्षणभंगुर सौख्य हें ध्येय मानलेलें नाहीं. मुक्ती हेंच ध्येय मानलेलें आहे. ती मुक्ती शाश्वत आहे. मोक्षपद प्राप्तिनंतर जन्मजरामरणादिकांची भीति नाहीं.

वरील विवेचनावरून पुण्यकर्मामुळें मोक्षप्राप्ति होत नाहीं हें पटलें. परंतु पुण्यकर्मालाही पापकर्म कां समजावींत ? याचा उलगडा होत नाहीं, अशी शंका येईल. याचें उत्तर असें कीं पापकर्मामुळें संसारचक्रांत जीव सांपडतो व पुण्यकृत्यामुळेंही जीव संसारचक्रात सांपडतो. या दोन्ही कृत्यांचा परिणाम एकच व जो फरक आहे तो एवढाच कीं पुण्यकर्मामुळें चक्रवर्ति व इंद्रपदाची प्राप्ती होते, तर पापकर्मामुळें ना घर, ना दार अशा दारिद्र्याचा परिणाम भोगावा लागतो. पुण्यकर्मानें सोन्याची तर पापकृत्यामुळें लोखंडाची संसाररूपी बेडी घालून घ्यावी लागते. त्यामुळे खरा ज्ञानी पुण्यकृत्यालाही पापकृत्यच समजतो. कारण या दोहोंमुळें संसारांतून सुटका होत नाहीं. मोक्षपद मिळत नाहीं.

पापाचा व पुण्याचा क्षय झाला पाहिजे. जमेकडील व नांवेकडील पापपुण्याच्या रकमांचा उडाप होऊन बाकी शून्य राहिली पाहिजे. पापही शिल्लक नाहीं व पुण्यही शिल्लक नाहीं म्हणजेच मोक्षप्राप्ति; अशी समभावना उत्पन्न झाली कीं त्याला सर्व जग आत्ममय वाटतें. आत्म्याचें त्याला दर्शन होतें. खऱ्या

-ज्ञान्याला हें शक्य आहे. फारच थोडक्यांना हें शक्य आहे; परंतु ध्येय मात्र सर्वांपुढें तेच ठेविले आहे.

केवली केवलज्ञानी, सर्वज्ञ वगैरे शब्दांच्या अर्थाची थोडीशी कल्पना असणे जरूर आहे.

केवलज्ञान ह्मणजे शुद्ध आत्मज्ञान, पराकोटीला पोहोंचणें व संपूर्ण आत्मानुभव होणें; समजून घेण्यासारखें कांहींही न राहणें, संपूर्णज्ञानी, सर्वज्ञ.

शास्त्राधारें ज्यांना ज्ञान होतें अशांना श्रुत-केवली ह्मणतात. केवलज्ञान्यांना तेंच ज्ञान प्रत्यक्ष होतें, शास्त्राची जरूरी असत नाहीं.

### निष्काम उपदेश

**अनात्मार्थं विना रागैः शास्ता शास्ति सतो हितम् ।**
**ध्वनन् शिल्पिकरस्पर्शान्मुरजः किमपेक्षते ॥ ८ ॥**

**अन्वयार्थः**—( शास्ता ) हितोपदेशी ( अनात्मार्थं ) निःस्वार्थपणानें ( विना रागैः ) राग लोभादि भावाशिवाय ( सतः ) भव्य जीवांना ( हितं ) कल्याणाचा ( शास्ति ) उपदेश करतो; ( शिल्पिकरस्पर्शात् ) वाजविणाऱ्याच्या-कलाकाराच्या हाताच्या स्पर्शामुळें ( ध्वनन् ) आवाज करणारा (मुरजः) मृदंग ( किं अपेक्षते ) कशाची अपेक्षा करतो ?

**अर्थः**—मधुर आवाज देणाऱ्या तबल्याला-मृदंगाला-त्या आवाजापासून कोणतेंही सुख मिळत नाहीं; केवळ इतरांचे मनरंजन करावें या उच्च व निष्काम हेतूनें तबला कलावंत तबलजीच्या हातचा मार खात असतो. मार खाऊनही तो इतरांचे मनरंजन करितो. त्याला कीर्तीची व प्राप्तिची अपेक्षा नसते; तद्वतच हितोपदेश करणारे आप्त-वीतराग-लाभ, प्रतिष्ठा, कीर्ति इत्यादिकांपैकीं कशाचीही आशा न धरतां केवळ प्राणिमात्रांचें कल्याण व्हावें यासाठीं सम्यग्दर्शनादि धर्माचा उपदेश करितात. ह्मणूनच तीर्थंकर प्रभू हितोपदेशी होतात. निष्काम बुद्धीनें व स्वयंस्फूर्तीनें हितोपदेश करण्याचे

जातो ! तीर्थंकर प्रभू हे दयासागर आहेत. दुःखितांचें दुःख पाहतांच या दयासागरांना स्वयंस्फूर्ति होते: या कार्यकारण-भावामुळे निष्काम उपदेश घडतो. उपदेशांत उपदेश करणें, याशिवाय कोणताच हेतू नसतो.

**टीपः**—श्रीसमंतभद्राचार्यांनीं मृदंगाला निष्काम सेवकाच्या वर्गांत बसवुन त्याची महति गायिली आहे. याच्या अगदीं उलट मृदंगाची किंमत करणारे एक संस्कृत सुभाषित आहे. तें असें:-

**मृदंगः मुखलेपेन करोति मधुरध्वनिम् ।**

मृदंगाच्या तोंडावर कणीक लावल्याखेरीज त्याच्या तोंडातून गोड बोल निघत नाहींत. हा व्यवहार लक्षांत घेऊन सुभाषित-कारानें असें सुचविलें आहे कीं मूक मृदंगाला खावयास दिले-कणीक तोंडाला लावली—म्हणजें तो गोड आवाज काढतो; म्हणजे तो स्वार्थी आहे. त्याचप्रमाणें स्वार्थी, मतलबी व खुशामत करणाऱ्यांना खावयास घातले कीं ते मालकाची टाळी वाजवितात. ' ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी, ' ही नीति मृदंग आचरितो म्हणून त्याची निंदा व टवाळी केली आहे. मृदंगाची ही दोन प्रकारचीं वर्णनें परस्पर विरोधी वाटल्यानें थोडीशी मौज म्हणून विषयांतर करून हा उहापोह केला आहे. समंतभद्र यांच्या काळीं तरी मृदंग हें वाद्य प्रचारांत होतें असें या वर्णनावरून दिसते. यावरून या वाद्याच्या प्राचीनत्वाची खात्री होईल.

आचार्य समंतभद्रांच्या वेळीं मृदंग हे वाद्य अस्तित्वांत होतें; त्याच-प्रमाणें श्लोक १ मधील दर्पणायते या शद्बावरून पारा लावलेला हल्लीं सारखा कांचेचा आरसाही प्रचारांत असावा. मोजमापें व वजनमापें प्रचारांत होतीं असेंही दिसते. आज ' मैल ' प्रचारांत आहे. आचार्यांच्या काळीं 'योजन' प्रचारांत होते. आजच्या मैलांच्या दगडा सारखे योजनांचे दगडही प्रचारांत होते.

हें पुस्तक वाचींत असतां आचार्यांच्या काळच्या समाजाच्या परिस्थि-तीच्या ज्ञानाबरोबरच ऐतिहासिक इतर्याही ज्ञानांत भर पडते.

### खऱ्या शास्त्राचें स्वरूप

आप्तोपज्ञमनुल्लंघ्यमदृष्टेष्टविरोधकम् ।
तत्वोपदेशकृत्सार्वं शास्त्रं कापथघट्टनम् ॥ ९ ॥

**अन्वयार्थः**—( आप्तोपज्ञं ) सर्वज्ञांनीं सांगितलेलें, ( अनुल्लंघ्यं ) वादीजनांकडून अखंडित ( अदृष्टेष्टविरोधकम् ) प्रत्यक्षप्रमाणांनीं ज्यामध्यें बाधा येत नाहीं, ( तत्वोपदेशकृत् ) तत्वांचा उपदेश करणारें ( सार्वं ) सर्वांचें हितकारी, ( कापथघट्टनं ) कुमार्गांचा नाश करणारें ( शास्त्रं ) शास्त्र (स्यात्) होय.

**अर्थः**—खरें शास्त्र कोणतें ? पांचव्या श्लोकांत आप्त कोणास ह्मणावें हें सांगितले आहे. त्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें ज्यांचीं लक्षणें अगर गुण आहेत त्यांनीं उपदेशिलेल्या धर्माला खरें शास्त्र ह्मणावें. वीतराग प्रभूंनीं प्रतिपादन केलेल्या शास्त्रांचें प्रतिपक्षाकडून खंडन होत नाहीं, ह्मणजे ते अखंडित असतात. प्रत्यक्ष व परोक्ष प्रमाणांनीं या शास्त्राला बाधा येत नाहीं ह्मणून ते अबाधित असतात. तसेंच जें शास्त्र अखिल प्राणिमात्रांच्या हिताचें व त्यांचें हित करणारें आहे व कुमार्गांचा नाश करणारें आहे, तेंच खरें शास्त्र होय.

यावरून सहा गुणांनीं युक्त असें प्रतिपादन व उपदेश ज्यांत आहे त्याला खरें शास्त्र ह्मणतां येईल. यापैकीं कोणत्याही एक वा अधिक गुणांचा अभाव असलेलें प्रतिपादन अथवा उपदेश **खरें शास्त्र** या नांवाला पात्र राहणार नाहीं.

जगांतील विद्यमान प्रमुख धर्मांपैकीं महंमदीय धर्माखेरीज इतर धर्म श्रीसमंतभद्राचार्यांचे कालीं प्रचलित होते. विशेषतः वैदिक व बौद्ध आणि जैनधर्म यामध्यें एकमेकाबद्दल स्पर्धा व असूया आचार्यांच्या काळीं चालू होती. अशावेळीं खरा देव, खरा गुरु व खरें शास्त्र यांचें जनतेला सत्य-खरें-

खुरें-ज्ञान-सम्यग्ज्ञान-व्हावें असें श्री समंतभद्राचार्य व तत्कालीन इतर जैन धर्मीय आचार्यांनां वाटणें स्वाभाविकच होतें. श्री समंतभद्राचार्यांनीं मोठमोठाले तत्वज्ञानाचे ग्रंथ लिहिले. परंतु सामान्य जनतेला-श्रावकांना-त्यांच्याकडून अपेक्षित ग्रंथाची जरूरी भासल्यानें हा फक्त १५० श्लोकांचा-रत्नत्रयांचा करंड तयार करून तो जनतेपुढें ठेविला असावा.

इतर धर्मांत देवदेवतांना अमानुषीय स्वरूप देण्यांत आलें, पुराणें लिहून देवदेवतांचें अमानुषत्व दाखविण्याचे प्रयत्न झाले होते व होत होते; अशावेळीं श्री समंतभद्राचार्यांनीं खऱ्या धर्माचें स्वरूप लोकांना समजावून सांगितलें व तसें करितांना इतर धर्मीयांच्या मतावर प्रत्यक्ष हल्ला न चढवितां युक्तिवादानें जैन धर्माचें वैशिष्टय जनतेसमोर मांडून त्यांतील भेद दाखवून दिला आहे व हंसक्षीर न्यायानें खऱ्या खोट्याचें परीक्षण करण्याची संधी दिली.

इतर धर्मीयांतील देवदेवतांचा विचार करीत असतां जैनधर्मीय पद्मावती इत्यादि देवींची पूजा ही धर्मबाह्य मानणें भाग आहे. कारण आप्तांच्या अंगीं ज्या गुणांची अपेक्षा जैनधर्मानें धरली आहे, ते ते गुण पद्मावती आदि देवींच्या अंगीं आहेत असें म्हणणें साफ चुकीचें होणार नाहीं ?

सत्य, अहिंसा, अचौर्य व ब्रह्मचर्य इत्यादिकांचें महत्व इतर धर्मीय शास्त्रांत वर्णिलेंच आहे, मग त्या शास्त्रांना कुशास्त्र, ते वर्णन करणारे कुगुरु वा कुदेव कां मानावे ? वरवर विचार करणाऱ्यांना हा प्रश्न गोंधळून टाकील; परंतु थोड्याशा विचारांतीं हा प्रश्न भ्रामक आहे असें दिसून येईल. अहिंसा धर्माची महती इतर धर्मांत फारच थोडी मानली आहे. नियोगादि नियमामुळें ब्रह्मचर्यव्रतांचें महत्त्व नष्ट केलें आहे. शिवाय कांहीं गोष्टींत मेळ दिसत असला तरी जैनधर्मांत खरा देव, खरा गुरु व खरें शास्त्र याबद्दल दिलेल्या कसोटीस जे उतरणार नाहींत, ते खरे देव नव्हेत अगर खरे गुरु अगर खरें शास्त्र नव्हे. दहा वेळांपैकीं पांचवेळां सत्य बोलणाऱ्यास सत्यवादी कोण

आणण ?? यास न्यायानें कांहीं बाबतींत साम्य दिसलें तरी कसोटीस तें उतरत नसल्यानें त्यांना कुदेव, कुगुरु व कुशास्त्र म्हटलें आहे.

प्रतिपक्षाबद्दल बोलतांना आचार्य समंतभद्र अत्यंत समतोलपणानें बोलतात. आचार्य अमितगति यांच्या श्रावकाचारांत हा समतोलपणा दिसत नाहीं. दोघांही आचार्योंचें ध्येय एकच, पण तें ध्येय गांठण्याचे मार्ग भिन्न. आचार्य अमितगतींची मांडणी व व्यासपीठावर उभे राहून बोलणाऱ्या जहाल वक्त्यांची विचारसरणी यांत बरेंच साम्य दिसतें. दारु व दारुडे यांच्याबद्दलचे आचार्य अमितगतींचे विचार, हे वरील बाबतींत एक नमुन्यादाखल उदाहरण म्हणून सांगतां येईल.

दारुबंदी व्हावी, असें प्रतिपादन करणाऱ्या आजच्या वक्त्याला आचार्य अमितगतींचें विचार नवीन व मननीय वाटतील.

### खऱ्या साधूंचें लक्षण

**विषयाशावशातीतो निरारम्भोऽपरिग्रहः ।**
**ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १० ॥**

**अन्वयार्थः**—( यः ) जो ( विषयाशावशातीतः ) विषयोपभोगापासून अलिप्त ( निरारंभः ) आरंभापासून रहित असलेला ( अपरिग्रहः ) परिग्रहानें रहित असा ( ज्ञानध्यानतपोरक्तः ) ज्ञान, ध्यान व तप यामध्यें लीन असा ( सः ) तो ( तपस्वी ) गुरु ( प्रशस्यते ) स्तुति केला जातो.

**अर्थः**—सर्वप्रकारच्या विषयोपभोगांचा ज्यांनीं त्याग केला आहे; असी, मषी, कृषी व वाणिज्यादि निर्वाहाच्या साधनांच्या आरंभापासून जे अलिप्त आहेत; व ज्यांनीं बाह्य व अभ्यंतर अशा दोन प्रकारच्या परिग्रहांचा त्याग केला आहे व जे सदैव धर्माध्ययन, ध्यान व तप यांत मग्न असतात, तेच खरे गुरु—साधु—होत.

खऱ्या देवांचीं लक्षणें सांगितल्यानंतर खऱ्या साधूंचीं-गुरुंचीं-लक्षणें सांगणें क्रमप्राप्त होतें. ४ थ्या श्लोकांत खरा देव, खरा गुरु व खरें शास्त्र यावर श्रद्धान-विश्वास-ठेवण्यानें सम्यग्दर्शनी होतां येते असें प्रतिपादिलें आहे. यापूर्वी खरा देव व खरें शास्त्र याबद्दल विवेचन झालेंच आहे.

यावरून रसना-जीभ, कर्ण-कान, नेत्र-डोळे इत्यादि पंचेंद्रियांच्या आधीन असणारा खरा गुरु नव्हे. नानाप्रकारचें स्वादिष्ट अन्न खाण्याची इच्छा धरणें, आपली स्तुति वा कीर्ति आणि परनिंदा व चुगली ऐकणें, उत्तम वस्त्र, उत्कृष्ट वनश्री, स्वरुपसुंदर स्त्री-पुरुष इत्यादि पाहणें; मऊमऊ बिछाना, उच्चासनशयन इत्यादिकांची आशा धरणें; हीं खऱ्या गुरूंचीं लक्षणें नव्हेत.

त्रस-स्थावर जीवांचा घात होणाऱ्या कोणत्याही कार्याचा आरंभ करणारा गुरुपदास पात्र कसा होईल ?

## अंतरंग व बहिरंग परिग्रह कोणते ?

चौदा प्रकारच्या अंतरंग-परिग्रहानें युक्त असणारा गुरुपदास पात्र नाहीं. वेद, राग, अनुराग, द्वेष, हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा, क्रोध, मान, माया, लोभादि १४ अंतरंग-परिग्रह होत. या चौदा अंतरंग परिग्रहात 'वेद' नांवाच्या परिग्रहाला प्रथम स्थान देण्यांत आले आहे. मी अमुक कुलांत जन्मलो आहे, माझा धंदा उच्च होता, माझे रूप सुंदर आहे, मी श्रीमंत होतो, माझ्याकडे नोकरचाकर होते इत्यादींचा वृथा अभिमान धरणें अगर याच्या उलट भावना धरणें हें गुरुपदाला उचित नाही. गुरूनें आपले सर्वस्व विसरलें पाहिजे. (१) क्षेत्र, (२) वास्तु (३) हिरण्य (४) सुवर्ण (५) धान्य (६) दास (७) दासी (८) कुप्यांदि दहा प्रकारचे बहिरंग परिग्रह आहेत. अंतरंग व बहिरंग परिग्रहापासून मुक्त असणारा खरा गुरु होय.

चोवीस परिग्रह रहित आणि ज्ञान, तप व ध्यान यांत निमग्न असणाऱ्या खेरीज इतरांना गुरु मानून त्यांना वंदनही करूं नये. व्यवहारिक दृष्टया

व शिष्टाचार सांभाळण्यासाठीं नमस्कार करणें ही गोष्ट निराळी व गुरु मानून नमस्कार करणें ही गोष्ट निराळी आहे. व्यवहार व शिष्टाचार पाळण्यासाठीं नमस्कार करण्यास हरकत नाहीं. वंदन व नमस्कार करावयाचा तो गुणाला करावयाचा असतो; गुणरहित शरीराला तो करावयाचा नसतो, कारण जैनधर्म गुणोपासक आहे. व्यक्तिमहात्म्याला जसा तो महत्व देत नाहीं तद्वतच तो वेषांतराकडेही पाहत नाहीं. जैनधर्म केवळ गुणाकडेच पाहतो.

ज्ञान, ध्यान व तप यांत तल्लीन होणारे रसना-जंभ, कान, डोळें इत्यादि इंद्रियांच्या आधीन राहणार नाहीत. समता व समभाव उत्पन्न झाला असल्यानें. आपल्या दर्शनार्थ आलेल्यांत गरीब किंवा श्रीमंत या विचाराचा त्याला स्पर्शही होणार नाहीं. आहार कोणी दिला व काय दिला यांचेही भान व ज्ञान त्याला राहणार नाहीं. सातव्या श्लोकांत जें विवेचन केलें आहे तिकडे वाचकांचे पुनः एकवार लक्ष वेधीत आहों.

## सम्यग्दर्शनाचे आठ अंग-गुण-चर्चा.

*सम्यग्दर्शनाच्या प्राप्तीनंतर सम्यग्दर्शनीयाच्या आचारांत व विचारांत* जें वैशिष्ट्य येतें त्यांस दर्शनाचार म्हणतात. हात, पाय, नाक, कानादि अवयवांच्या वर्णनानें शरीराचें आपण जसें वर्णन करितो त्याचप्रमाणें निःशंकितादि आठ अंगानें दर्शनाचाराचें वर्णन केले जातें. सम्यग्दर्शनीयांचें जें आठ-अंग-गुण-आहेत तें यापुढें क्रमशः दिलें आहेत. शरीराला जशी पांच इंद्रियें, तद्वतच सम्यग्दर्शनाचें पुढील आठही गुण इंद्रिये आहेत.

### (१) निःशंकित अंगाचें-लक्षण-स्वरुप.

**इदमेवेदृशमेव तत्वं नान्यन्न चान्यथा ।**
**इत्यकंपायसाम्भोवत्सन्मार्गेऽसंशया रुचिः ॥ १० ॥**

**अन्वयार्थः**—( तत्वं ) तत्व ( इदं एव ) हेंच आहे, ( ईदृशं एव ) अशाच प्रकारचें आहे, ( अन्यत् न ) दुसरें नाही, ( अन्यथा न ) दुसऱ्या

प्रकारचें नाहीं ( इति ) याप्रमाणें ( आयसाम्भोवत् ) तरवारीच्या धारेच्या पाण्याप्रमाणें ( सन्मार्गे ) मोक्षमार्गांत ( रुचिः ) श्रद्धा असणें ( असंशया ) हें असंशय अर्थात निःशंकित अंग आहे. अंग म्हणजे गुण.

**अर्थः**—तलवारादि शस्त्रांची धार-पाणी त्या तलवारीचे तुकडे तुकडे झाले तरी ती धार कमी होत नाहीं अथवा हवेचा परिणाम होऊन ती गंजतही नाहीं; धार कायमच राहते. तलवार अखंड असतांना जशी तिची धार असते तशीच तिचें तुकडे तुकडे झालें तरी कायम राहते. तुकडे झाल्यामुळें धारेंत-तीक्ष्णतेंत फरक होत नाहीं. तद्वतच सत्यार्थ देव, गुरु व शास्त्र याबद्दल नितांत श्रद्धा ठेवणें याला निःशंकितांग म्हणतात व सम्यग्दर्शनाच्या आठ अंगांपैकीं हें पहिलें अंग आहे. सत्यार्थ देव, गुरु व शास्त्र यांचीं लक्षणें-स्वरूप-अगर गुण अमुकच आहेत, दुसरी नाहीत असा दृढ विश्वास असावयास पाहिजे. देव, गुरु व शास्त्र यांच्या लक्षणासंबंधीं शंका उत्पन्न झाली, मन द्विधा झालें व हें खरें कीं तें खरें अशी मनाची चलविचल सुरू झाली कीं निःशंकिताचें पालन झालें नाहीं, असें समजावें.

देवाच्या कृपेनें संतती, संपत्ती व वैभव आदि प्राप्त होतात व देवाच्या कृपेनें रोगादिकापासून सुटका होतें असें इतर धर्मीय मानतात. इतर धर्मीय गुरु मंत्रतंत्रादिकांच्या सहाय्यानें आपल्या अनुयायांच्या भक्तांच्या-मनकामना पूर्ण करूं इच्छितात. हिंसादि पापकर्मांचा उपदेश इतर धर्मीय शास्त्रें करितात; सबब अशी कृपेची सांवली घालणाऱ्यांना देव व गुरु मानूं नये अगर हिंसादि पापकर्मांचा उपदेश करणाऱ्या शास्त्रांना शास्त्र असें मानूं नये. कारण सत्यार्थ देव, गुरु व शास्त्र यांचीं जीं लक्षणें सांगितली आहेत व जी कसोटी दिली आहे, त्या स्वरूपाचें ते नाहीत व त्या कसोटीला ते उतरत नाहीत.

कल्याणकारी, सुखकारी अगर श्रेयोमार्गावर दृढ विश्वास ठेवावा. या आचाराला-गुणाला-प्रथम स्थान देण्यांत आलें तें योग्यच आहे. कोणत्याही -कार्यारंभीं प्रथम श्रद्धा उत्पन्न होणें जरूर असते. श्रद्धेनंतर ज्ञान व ज्ञानानंतर

आचरण व या तीन्हींचे एकफळ ह्मणजेच कार्यसिद्धि. अनेक आचार्य व शास्त्रीपंडीत होऊन गेले. त्यांच्या तोंडून निघालेल्या प्रत्येक विधानावर अगर लेखणींतून उतरलेल्या प्रत्येक शब्दावर विश्वास ठेवण्याची अपेक्षा नाहीं. परंतु कल्याणकारी मार्गावर व हितोपदेशावर श्रद्धा असावी अशी आज्ञा आहे. एका बेडकाची कथा सांगितली आहे. बेडूक फूल घेऊन निघाला होता, या कथेवर विश्वास ठेवला नाहीं; तथापि केवळ सद्भावनेचें फळ कसें मिळतें, हा या कथेंतील जो सार आहे त्यावर विश्वास ठेविल्यास हें अंग पूर्णपणें पाळलें जाईल. विशेष खुलासा करून घेण्यासाठीं शंका विचारण्यानें या अंगास बाध येत नाहीं.

श्रावकांचे आठ मूळ गुण कोणते याबद्दल व अशाच कांहीं बाबतींत आचार्यवचनांत महत्वाची तफावत दिसते. तीर्थंकर भगवानांच्या वाणीचा पुनरुच्चार करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या आचार्यवचनांत अशी तफावत कां ? अशी शंका विचारून, शंकेचें समाधान करून घेण्याचा कोणी प्रामाणिक प्रयत्न केल्यास, त्या अंगाचें त्यानें पालन केलें नाहीं असें कसें ह्मणतां येईल ? आदिपुराणांतील ब्राह्मण जातीच्या निर्माणाची कथा ऐकून जात जन्मावर नसून ती गुणकर्मावर आधारलेली आहे, असें ह्मणणाऱ्यांना नास्तिक कसें ह्मणावें ? आहारदान देणारा दाता शुद्धाहार व तें नवधा भक्तीनें तो देतो कीं नाहीं, त्या पलीकडे पाहण्यास शास्त्राधार आहे ? अशी शंका काढणाऱ्यास मुनिनिंदक व या अंगाचे रक्षक नसून भक्षक आहे असें तरी कसें ह्मणतां येईल ?

देव, गुरु व शास्त्र कोणास ह्मणावें, याच्या लक्षणासंबंधीं मनांत शंका आली तरच या अंगाचें पालन झालें नाहीं असें निःशंकपणें ह्मणतां येईल. अधिक खुलासा करावयाचा झाल्यास असें ह्मणतां येईल कीं अमूक देव हा खरा देव नव्हे, अमूक ग्रंथ हा सर्वस्वी अगर त्या ग्रंथांतील कांहीं भाग हें खरें शास्त्र नाहीं अगर अमूक व्यक्ति-खरा गुरु नाहीं असें प्रामाणिक-

पणानें म्हणणारा धर्मलंड वा सुधारक म्हणून हेटाळणीस पात्र नाहीं. खरा देव, गुरु व शास्त्र यांचीं जीं लक्षणें सांगितली आहेत, त्या लक्षणासंबंधीं शंका धरणारा धर्मलंड व सुधारक म्हणून हेटाळणीस पात्र होईल.

## (२) निःकांक्षित अंगाचें स्वरूप.

**कर्मपरवशे सान्ते दुःखैरन्तरितोदये ।**
**पापबीजे सुखेऽनास्था श्रद्धाऽनाकांक्षणा स्मृता ॥१२॥**

**अन्वयार्थः**—( कर्मपरवशे ) कर्माच्या स्वाधीन असलेल्या ( सान्ते ) नाश पावणाऱ्या ( दुःखैः अन्तरितोदये ) ज्याच्यामध्यें दुःखाचा प्रादुर्भाव आहे अशा ( पापबीजे ) पापाच्या उत्पत्तीला कारणीभूत ( सुखे ) सुखामध्यें ( अनास्था ) इच्छरहित ( श्रद्धा ) श्रद्धा असणें हें ( अनाकांक्षणा ) निष्कांक्षित अग ( स्मृता ) होय.

**अर्थः**—पुण्यकर्माच्या उदयानें संसारसुखाचा लाभ होतो हें खरें असलें तरी तो लाभ कर्माधीन असतो. इंद्रिय--जनित सुख कर्माच्या आधीन—कर्मावर अवलंबून—असतें. अनंत सायास केलें परंतु पुण्यकर्माचा उदय झाला नाहीं, तरी सुखाचा लाभ होणार नाहीं, इच्छित मिळणार नाहीं. बरें, पुण्यकर्माचा उदय झाला, सुखप्राप्ती होऊन इच्छित मिळालें तरी तें चिरकाल टिकणारें नाहीं. कारण तें सुख आज ना उद्यां नष्ट होणार आहे. इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणें क्षणोक्षणी हें सुख बदलणारें आहे. मित्राच्या भेटीमुळें आनंद वाटतो, परंतु त्या भेटीनंतर त्याचा वियोगही ठरलेला आहे. रोग जडणं व नष्ट होणें, धन, लाभ-फायदा-होणें व नुकसान येऊन त्याचा नाश होण, असे सुखदुःखाचे प्रसंग नेहमीच येतात. प्राप्त झालेलें सुख अगर दुःख, श्रीमंती अगर गरिबी इत्यादि अखंड नाहींत, तें चिरकाल टिकणारें नाहींत. सुख अगर दुःख, लाभ वा हानी, आरोग्य वा रोगपीडा इत्यादि गोष्टी नश्वर आहेत व त्या कर्माधीन आहेत.

इंद्रियजनित सुखदुःखादिकांचा फेरा असतो. शुभ अगर अशुभ कर्मांच्या उदयानें सुख व दुःखांची अनुक्रमें प्राप्ति होते. हा फेरा टाळणें मांत्रिकांच्या अगर देव-दानवांच्याही स्वाधीन नाहीं. कर्म-फळें भोगल्याशिवाय सुटत नाहींत; अशा दृढनिश्चयानें वागल्यानें या दुसऱ्या अंगाचे पालन होईल.

कोणी अशी शंका घेईल कीं सकलपरिग्रह त्यागी मुनींना व त्यागी गृहस्थांना या पहिल्या दोन अंगाचें पालन करणें शक्य आहे; परंतु व्रतरहित गृहस्थी लोकांना हें कसें शक्य आहे ? व्रतरहित व अव्रती सम्यग्दृष्टी गृहस्थांना भोगाची इच्छा राहणारच. व्यापारांत पैसा मिळावा, नोकरींत मालकाची मर्जी प्रसन्न रहावी, असें वाटणारच. आपण संपत्तीमान व्हावें, निरोगी असावें, असें कोणास वाटणार नाहीं ? यामुळें या अंगाचें पालन कसें करतां येईल ? याचें उत्तर असें कीं—सुख अगर दुःख हें दैवाधीन—कर्माधीन—असतें. हें समजून सुख मिळाल्यास तें टिकविण्यासाठीं आस्था ठेवूं नये, दुःख झाल्यावर त्याबद्दल खेद मानूं नये. दुःखाचा परिहार करण्यासाठीं न्याय व नीतिमार्गाला पायाखालीं तुडवूं नये. सारांश, या पहिल्या दोन व्रतांचें पालन करितांना समता व सहनशीलता बाळगावी. आपण निष्काम बुद्धीनें व फलाची आशा न धरितां कर्तव्यकर्म करीत रहावें. इंद्रियजनित सुख मिळविण्यासाठीं न्याय, अन्याय व पापपुण्य इकडे दुर्लक्ष करूं नये. याही अंगपालनामुळें 'सुखदुःखें समे कृत्वा ' अशी मनाची स्थिती होण्यास मदत होते. या गुणामुळें सम्यग्दर्शनीं निर्भय होतो—संकटाला डरत नाहीं.

या श्लोकांतील 'कर्मपरवशे सान्ते' या शब्दांतील कर्म म्हणजे काय, याची त्रोटक तरी कल्पना येणें जरूर आहे. कर्माधीन जगत्, केल्या कर्माचें फळ अगर Reap as you sow या म्हणीतील कर्म म्हणजे काय ? व कर्माची एवढी जबरदस्त सत्ता ती कां ? आत्मा म्हणून एक चीज मानिली आहे. आपलीं इंद्रियें आत्म्याला सदैव विषयाकडे खेंचीत असतात. इंद्रियांच्या आधीन झालों कीं, दुष्कर्में घडतात व त्याचा परिणाम आत्म्यावर होऊन

आत्मा मलीन होतो व दुःखपरंपरा सुरू होते. दुःखांचा नाश करण्याचा उपाय ह्मणजे इंद्रियांना बहकू न देतां त्यांना आपल्या कह्यांत ठेवणें. इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवल्यानें आत्मा मलीन होत नाहीं. जीवात्मा परमात्म-पदास पोहोंचतो. इंद्रिय-दमन करणें फारच थोड्यांना शक्य असतें. ह्मणून संसार-चक्रांतून सुटून परमात्मपदाला सर्वांना पोहोंचतां येत नाहीं.

जीव भिन्न भिन्न योनींत कसा जातो व एकाच योनींतील जीवाला सुखदुःख कमीअधिक कां मिळतें? मनुष्ययोनींत जन्म घेतलेल्यापैकीं एक गरीब तर दुसरा श्रीमंत, एक सुखी तर दुसरा दुःखी असा भेदभाव कां? इतर धर्मांनीं, ही ईश्वरेच्छा असें उत्तर दिलें आहे. जैन-धर्म ह्मणतो कीं, हें कर्मांचें फळ आहे. सुख वा दुःख हें यदृच्छेनें मिळत नाहीं तर तें कर्माधीन आहे. कर्मवादामुळें मनुष्यप्राण्याची सदाचाराकडे प्रवृत्ति होते. दुराचाराचें फळ भोगावेंच लागणार. भोगल्याशिवाय कर्म सुटत नाहीं, हें कळून आलें कीं सदाचाराकडे प्रवृत्ति ही राहणारच. सदाचारप्रवृत्तीलाच धर्म म्हणावें; निदान त्यामुळें न्याय्य व नीतीचें तरी पालन होईलच.

जैनधर्मानें कर्मवादाला जितकें महत्व दिलें आहे तितकें महत्व कर्माला इतर धर्मांनीं दिलें नाहीं; फार काय कर्मवाद हा जैनधर्माचा आत्मा-प्राणच आहे.

### निर्विचिकित्सा अंगाचें स्वरूप.

**स्वभावतोऽशुचौ काये रत्नत्रयपवित्रिते ।**
**निर्जुगुप्सा गुणप्रीतिर्मता निर्विचिकित्सता ॥१३॥**

**अन्वयार्थः**—( स्वभावतः ) मूळचाच ( अशुचौ ) अशुद्ध ( तु ) परंतु ( रत्नत्रयपवित्रिते काये ) रत्नत्रयानें पवित्र अशा शरीराविषयीं ( निर्जुगुप्सा ) किळस भावानें रहित ( गुणप्रीति ) गुणाविषयींची प्रेमबुद्धी ( निर्विचिकित्सता ) निर्विचिकित्सता ( मता ) मानली गेली आहे.

**अर्थः**—मनुष्यपर्यायाचा हा मानवीदेह स्वभावानें—मूळचाच—अशुद्ध व अपवित्र आहे. मानवी शरीर सप्त धातुमय व मल—मूत्रादिकांनीं भरलेलें आहे; तथापि रत्नत्रयांनीं तें युक्त असलें कीं, त्याची अपवित्रता नष्ट होऊन तें शरीर पवित्र बनतें. रोगजर्जरित व मलीन झालेल्या व्रती लोकांच्या शरीराकडे पाहून मनांत किळस येऊं न देणें याला निर्विचिकित्सा असें ह्मटलें आहे. गुणाबद्दल प्रीति व अनुराग ठेवावा. शरीराकडे पाहून मनांत किळस उत्पन्न होऊं देऊं नये. सद्गुणोपासना करावी. जो सद्गुणी असतो तो शरीरानें सुंदर व निरोगी असेलच असें नाहीं. मानवी देहच मोक्षमार्गाचें साधन आहे. देवादिकांचें शरीर मोक्षमार्गाचें साधन मानण्यांत आलेलें नाहीं. या अंगांत आणखीहि कितीतरी सद्गुणांचा समावेश होतो. उदाहरणार्थ—दयाधर्म, वात्सल्य—धर्म, स्थितीकरण व वैयावृत्य इत्यादि. मुनी अगर व्रती आजारी पडले, मलमूत्रांनीं त्याचें शरीर भरलें तर त्यांची शुश्रुषा कोण करणार ? डॉक्टर व उपचारिका कोणताहि किळस न मानतां रोग्याची शुश्रुषा कर्तव्य-कर्म ह्मणून करितात. तद्वतच मुनी व व्रती लोकांच्या रोगाबद्दल व मलीन शरीराबद्दल आपली भावना असावी. आत्मा हा पूजनीय आहे, शरीर नव्हे. सद्गुणीच्या शरीराबद्दल तिटकारा दाखविल्यास त्या शरीरांतील गुणा-बद्दल तिटकारा व अनादर दाखविल्यासारखें होतें. इतरांच्या सद्गुणा-बद्दल आदर दाखविण्यानें सद्गुणी होण्यास इतरांना उत्तेजन मिळतें. एखाद्यानें लढाईत विशेष शौर्य दाखविलें व त्या गुणांबद्दल त्याला तरवार बक्षीस मिळाली कीं, इतरांनाही आपण पराक्रम गाजवून तरवार मिळवावी असें वाटतें. तरवारीच्या बक्षीसामुळें इतरांना उत्तेजन मिळतें.

यासंबंधीं थोडासा अधिक विचार कर्तव्य आहे. या विचाराच्या निमित्तानें सुधारकी मतें वाचकांच्या गळीं उतरविण्याचा हा प्रयत्न नसून वाचकांच्या विचारांना चालना मिळावी व हंसक्षीर न्यायानें या विचारांचें ग्रहण करावें, अशी विनंती आहे.

विचिकित्सा ग्लानि, घृणा अगर किळस हे कषाय आहेत, ही भावना पापजनक आहे. कांहीं कषाय शुभही असतात. कोणी पापकृत्य करीत आहे, त्या कृत्यापासून त्याला परावृत्त करण्यासाठीं त्याच्यावर रागावलों तर तें कृत्य पाप या सदराखालीं येणार नाहीं; कारण रागावण्यांत आपला सद्धेतु आहे.

किळस धरूं नये, याचा अर्थ शुचिर्भूत राहू नये असें नाहीं. व्यावहारिक व आरोग्य दृष्ट्याही शुचिर्भूततेची अत्यंत जरूरी आहे; तथापि 'अति सर्वत्र वर्जयेत्' या न्यायानें केव्हांही मर्यादाही राहाणारच. शुचिर्भूतता अगर शौच-धर्म याच्या नांवाखालीं किती चुका व अन्याय घडतात इकडे लक्ष देणें जरूर आहे. कांहीं रोग संसर्गजन्य आहेत. अशा रोग्यापासून दूर राहाणें जरूर असते. वाईट व दुष्ट लोकांच्या संगतींत राहिल्यानें त्यांचे दुर्गुण आपणांस जडण्याचा संभव असतो, ह्मणून त्यांच्यापासून दूर राहावें. याच विचारसरणीचा विचार करून स्पर्शास्पर्शाबद्दल रूढी पडत गेली; परंतु पुढें-पुढें ही विचारसरणी मागें पडून मानव समाजांतील बराच मोठा भाग अस्पृश्य समजला गेला व शुचिर्भूतपणाला धर्माचें स्वरूप येऊन धर्माच्या नांवाखालीं अशा जातीवर अन्याय होऊं लागला.

हलके धंदे करणाऱ्यांना स्पर्श करूं नये असें ह्मणतांना आपल्या मनांत जातीच्या, कुळाच्या व जन्माच्या उच्चनीचपणाची भावना येत नाहीं ? अहंकार उत्पन्न होतो, त्या जातीबद्दल मनांत अनुदार व द्वेषयुक्त भावना उत्पन्न होतात. सम्यग्दृष्टींनीं आठ प्रकारचे जे मद-गर्व-धरूं नयेत अशी जी धर्माज्ञा आहे, याच्या अगदीं विपरीत असें वर्तन घडत असतांनाही तें धर्म-कृत्य समजलें जातें !!

अन्नोदक व्यवहारांत अन्नपाण्याच्या शुद्धाशुद्धतेपेक्षां तें तयार कोणी केलें, इकडे अधिक लक्ष दिलें जातें. आपली जात श्रेष्ठ आहे असें मानून व अभिमान धरून इतरांच्या हातचें वस्त्रगाळित पाणीही वर्ज्य मानिलें जातें. उच्चगोत्र कर्मबंधामुळें चांगल्या कुळांत व नीचगोत्र कर्मबंधामुळें नीच-

कुळांत जन्म होतो. यावरून जन्म हा कर्माधीन आहे, आपल्या आधीन नाहीं; असा विचार केल्यास अन्नोदकाच्या शुद्धाशुद्धतेकडे लक्ष देणें जरूर आहे असें दिसून येईल. तें तयार कोणी केलें हा विचार गौण आहे.

अस्पृश्यतेचा विचार करीत असतां (१) आचारशुद्धि व (२) शुचिर्भूतता या दोन गोष्टीकडे लक्ष देणें जरूर आहे. आपण ज्यांना आज जन्मतःच अस्पृश्य मानितों, त्यांच्यासारखाच आचार असणारे अनेक लोक व जाती आहेत. बंगाल वगैरे प्रांतांतील ब्राह्मणही मांसाहारी व मच्छाहारी आहेत. युरोप, अमेरिकादि खंडांतील प्रायः सर्वच लोक मद्य व मांसाहार सेवन करणारे आहेत. अशा स्थितींत आचार शुद्धीच्या नांवावर ठराविक लोकच अस्पृश्य कां ? शुचिर्भूततेच्या दृष्टीनी विचार करितां ज्यांना ज्यांची स्पृश्यांत गणना केली जाते, ते लोक तरी किती शुचिर्भूत असतात !!

घरच्या मुलाबाळांची घाण आपण काढितों, दवाखान्यांत तर डॉक्टरपासून उपचारिकापर्यंत सर्वांनाच हें कृत्य करावें लागतें. तेवढ्या वेळेपुरतें आह्मी अस्पृश्य ठरतो. स्नानानंतर स्पृश्य होतो. अस्पृश्यांच्या बाबतींत ही विचारसरणी कां असू नये ?

आचार्य समंतभद्रच ह्मणतात कीं " स्वभावतो शुचौ काये " ह्मणजे मलमूत्रादिकांनी भरलेलें हें शरीर मूलतः—जन्मताच—अपवित्र आहे. पित्याचें वीर्य व मातेचें रक्त यांच्या संयोगामुळें जीवाची उत्पत्ती होते; असा हा अपवित्र जीव व हे शरीर रत्नत्रयामुळें पवित्र होतें. त्यामुळें शरीराबद्दल घृणा-किळस-धरूं नये व गुणाबद्दल प्रेम—प्रीति—व आदर हीं दाखवावींत, अशी धर्माज्ञा आहे. नित्य व्यवहारांत मात्र या धर्माज्ञेचें पदोपदीं उल्लंघन होऊन रुढींना महत्व दिलें जात आहे. निर्विचिकित्सा ही सम्यक्त्वाची एक शर्त आहे, ही मोडून सम्यक्त्वी कसें होतां येईल ? परंतु रूढी. प्रिय जैनसमाज या श्लोकांतील थोर व उदात्त हेतूंकडे दुर्लक्ष करीत आहे. सम्यग्दर्शनाच्या आचाराचें, अंगाचें अगर गुणाचें पालन केल्याचें

मातंगाचा उद्धार होऊन त्यांचें नांव धर्मग्रंथांतही अजरामर होऊन राहिलें आहे. जैन समाजानें जरी त्याला आपला मानिला नसला तरी जैनधर्मानें त्यास आपला मानून त्याचा उद्धार केला आहे.

या अंगाच्या महत्त्वाचें पंचाध्यायीकारांनीं केलेल्या वर्णनाशीं वाचकांचा परिचय करून देणें जरूर आहे. ते ह्मणतात कीं:—

दुर्दैवाद् दुःखिते पुंसि तीव्रासाताघृणास्पदे ।
यन्नादयापरं चेतः स्मृतो निर्विचिकित्सकः ॥ ५८३ ॥

**सारांशः**—दुर्दैवामुळें अगर पूर्वजन्माच्या कर्मामुळें जे दुःखी आहेत, दरिद्री आहेत, रोगी आहेत व ज्यांना पाहतां किळस उत्पन्न होतो, त्यांच्या-बद्दल कठोर मन न करितां दयार्द्र चित्तानें त्यांच्याकडे पहावें. सहानुभूतीनें त्यांचा समाचार घेऊन त्याचें दुःख कमी होईल असें करावें. या पुढील श्लोकांत याही पुढें जाऊन पंचाध्यायीकार ह्मणतात कीं:—

नैतत्तन्मनस्यज्ञानस्म्यहं संपदां पदम् ।
नासावस्मत्समो दीनो वराके विपदां पदम् ॥ ५८४ ॥

**सारांशः**—मी श्रीमंत आहे व मी मोठा आहे असा गर्व धरणें हें अज्ञान आहे. या उलट प्रत्येक हीन, दीन, दुःखी व दरिद्री इत्यादिकांबद्दल समताभाव ठेविला पाहिजे. गर्व धरणें मूर्खपणा आहे कारण जो समताभावी आहे तोच खरा सम्यग्दृष्टी, तोच खरा ज्ञानी, तोच मान्य, तोच कुलवान, तोच श्रीमान व तोच धार्मिक. यापुढील श्लोक तर अधिक विचारार्ह आहे:—

प्रत्युत ज्ञानमेवैतत्तत्र कर्मविपाकजाः ।
प्राणिनः सदृशाः सर्वे त्रसस्थावरयोनयः ॥ ५८५ ॥

**सारांशः**—पूर्व-भवांत मीही या दुःखी व दारिद्र्यासारखाच असेन. अखिल प्राणिमात्र एकच आहे. त्यांत उच्चनीच वा गरीब-श्रीमंत असा भेद-भाव मुळींच नाहीं. वरील चर्चेवरून असें दिसेल कीं तीर्थंकर प्रभूंनीं अचूक

जी गोष्ट त्याज्य व धर्मबाह्य मानिली आहे, तीच गोष्ट आह्मी त्यांचे अनुयायी जीव कीं प्राण समजत आहों. समताभाव धरा, अस्पृश्यता मानूं नका, आत्मा-दिकांचा गर्व व्यर्थ आहे असें ह्मटलें कीं धर्म-बुडवे या पदवीला पात्र व्हावें लागतें. समतादि उच्च विचार नष्ट झाले व आज कूपमंडूकवृत्तीचे आह्मी झालों आहों !!

दिगंबर मुनी व त्यांचे आचार पाहून नाक मुरडणारे अनेक अजैन महाभाग !! आहेत. मुनींच्या शरीराकडे पाहून किळस मानूं नका. त्यांच्या अंगच्या गुणाकडे पहा. आपलें स्वतःचें शरीरही मलमूत्रादिकांनीं भरलेलें आहे, याचें विस्मरण त्यांना होतें ह्मणून दिगंबर मुनींना ते दोष देतात. दिगंबर मुनींची शरीरावर आसक्ती मुळींच नसते, हे ते टीकाकार विसरतात, हें त्यांचेंच दुर्भाग्य नव्हे काय ?

नेमिग्रंथमालेंतील रत्नकरंडक श्रावकाचारांतील विचार पहावेत, अशी शिफारस आह्मी वाचकांना करितों.

### (४) अमूढदृष्टि अंगाचें लक्षण.

**कापथे पथि दुःखानां कापथस्थेऽप्यसम्मतिः ।**
**असंपृक्तिरनुत्कीर्तिरमूढादृष्टिरुच्यते ॥ १४ ॥**

**अन्वयार्थः**—( दुःखानां पथि ) दुःखद मार्ग असणाऱ्या ( कापथे ) मिथ्यामार्गाबद्दल ( कापथस्थेऽपि ) मिथ्या मार्गानें चालणाऱ्या लोकांविषयीं देखीलही, ( असंमतिः ) मनानें संमती-मान्यता न देणें, ( असंपृक्तिः ) शरीरानें सत्कार न करणें-व आदर न दाखविणें, व ( अनुत्कीर्तिः ) वचनानें स्तुति न करणें ही ( अमूढ दृष्टिः ) अमूढ दृष्टि (उच्यते) अंगाची लक्षणें सांगितलीं आहेत.

**अर्थः**—मिथ्यादर्शन-मिथ्याधर्म-खोटा धर्म व मिथ्याधर्मानें वागणारे यांची मन, वचन व काया यांनीं स्तुती इत्यादि न करणें याला अमूढ दृष्टि

असें ह्मटलें आहे. मिथ्यात्वाच्या प्रभावामुळें वा अज्ञानपणामुळें रागद्वेषादि युक्त अशा मानलेल्या देवदानवांची झालेली पूजा-अर्चा पाहून त्या देवदेवींची अगर त्यांची पूजा-अर्चा करणाऱ्यांची प्रशंसा करण्यानें या अंगाचें पालन होणार नाहीं. मंत्रतंत्र यांचा प्रभाव वर्णन करणें, कंदमूळ व मांसभक्षण करणाऱ्यांची स्तुती करणें, कुपात्रीं दान देणाऱ्यांची ख्याति गाणें इत्यादि कृत्यें केल्यानें या अंगाचें पालन होणार नाहीं; कारण ते मिथ्याधर्मानें व मिथ्यामार्गानें चालणारे असतात. मागील श्लोकांत सद्गुणांची स्तुतिस्तोत्रें गावींत व तसें केल्यानें ती स्तुती सद्गुणांच्या वाढीस कारण होते, असें सांगितलें आहे. दुर्गुणांची स्तुती करूं नये असें या श्लोकांत सांगितलें आहे. अशी स्तुती दुर्गुणांचे वाढीस कारण होईल. शंका-म. गांधी, पं. नेहरू अगर अशाच विश्ववंद्य विभूति, स्व. वा. टागोर यांचें गुणवर्णन करणें, लढायाची बातमी छापणें अगर लढाईत प्राणाहुती देणाऱ्या वीरांच्या शौर्यादिकांचें वर्णन करणें, हे त्याज्यच मानावें कीं काय ? या शंकेचें उत्तर:—श्लो. संख्या १० खालील विवेचनांत पहावें. व या शंकेचें निरसन झालें कीं नाहीं हें ठरवावें.

या गुणाचें-अंगाचें-पालनामुळें कसल्याही प्रसंगीं मिथ्यादेव, शास्त्र व गुरु यांना न मानण्याचें धैर्य अंगीं येतें. सम्यग्दृष्टी सात प्रकारच्या भयापासून दूर असतो. सात प्रकारची भीति बाळगिली नाहीं ह्मणजे कुदेवादिकांची भीति बाळगण्याचें कारणच राहणार नाहीं. खरा देव, गुरु व शास्त्र यावर या अंगपालनामुळें अखंड व अढळ श्रद्धा राहील.

### (५) उपगूहन अंगाचें लक्षण.

**स्वयं शुद्धस्य मार्गस्य बालाशक्तजनाश्रयाम् ।**
**वाच्यतां यत्प्रमार्जन्ति तद्वदन्त्युपगूहनम् ॥ १५ ॥**

**अन्वयार्थः**—(स्वयं शुद्धस्य) स्वतः शुद्ध (मार्गस्य) मोक्षमार्गावर (बालाशक्तजनाश्रयाम्) अज्ञानी व असमर्थ लोकांकडून होणाऱ्या (वाच्यतां)

निंदेला (सत्प्रमार्जन्ति) दूर करणें (तद्) त्याला (उपगूहनं) उपगूहन (वदन्ति) म्हणतात.

**अर्थः**—रत्नत्रयमय व दशलक्षण धर्म हा मूलतः शुद्ध धर्म आहे. कारण तो जिनेंद्र भगवानांनीं सांगितला आहे. हा धर्म अनादि आहे. अखिल प्राणिमात्रांचें कल्याण करणारा हा धर्म आहे. सर्वप्रकारें हा निर्दोष आहे. अशा या त्रिकालाबाधित व सर्व कल्याणकारी धर्माची कोणी अज्ञानामुळें अगर गैरसमजुतीनें निंदा करूं लागले तर त्याचें निराकरण करणें, याला उपगूहन असें म्हटलें आहे.

एखाद्या मुनीकडून अगर व्रती गृहस्थाकडून चूकभूल झाल्यास ती चव्हाट्यावर आणण्यानें सर्वच मुनी व व्रती लोक असे असतात, अशा निंदेस व गैरसमजास जागा राहण्याचा संभव असतो. सबब ते दोष चव्हाट्यावर न आणितां, आपल्या मुलांचे दोष झांकण्याचा व सुधारण्याचा माता जशी प्रयत्न करते तद्वत् प्रयत्न करणें, याला उपगूहन म्हणतात.

सम्यग्दृष्टीला दुसऱ्याच्या निंदेचा व स्वतःच्या स्तुतीचा त्याग सांगितला आहे. एका मराठी कवीनें म्हटलें आहे कीं, 'आत्मस्तुति परनिंदा मिथ्याभाषण कधीं न यो वदना'

### पण पांघरूण केव्हां घालावें?

मुनी अगर व्रती गृहस्थांकडून चूकभूल झाल्यास त्यावर पांघरूण केव्हां घालावें? हा प्रश्न महत्वाचा आहे. चूक झाली व त्याचें प्रायश्चित घेण्यास ते तयार आहेत आणि पुढें तसें कृत्य करणार नाहीं असें अश्वासन मिळत असल्यास ती चूक चव्हाट्यावर आणण्यांत अर्थ नाहीं; परंतु चूक असतां ती चूक नाहीं असें मुद्दापणानें कोणी प्रतिपादन करूं लागेल तर त्याची गय करूं नये. त्याच्या कृत्याचा दंभस्फोट करून त्या कृत्याला विरोध व कृत्याचा निषेध करणें जरूर आहे. तसें न होईल तर पापकृत्याला उत्तेजन मिळेल व इतर अशा कृत्यालाच इतर धर्म समजत राहतील. या अंगाच्या पालना-

मुळें कल्याण मार्गात आपली प्रगती होत होत जाते व कुमार्गापासून दुष्ट-त्याचा बचाव होतो. इष्ट कोणतें व अनिष्ट कोणतें अगर धर्म कोणतें अगर अधर्म कोणतें, कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें, याचा विचार सम्यग्दृष्टीला राहतो व त्यामुळें तो सदाचरणी राहतो. लोक, शास्त्र, गुरु व देवमूढता तो पाळीत नाहीं यामुळें तो फसला जात नाहीं, रूढीचा तो गुलाम बनत नाहीं.

श्लोक संख्या २२ मध्यें लोकमूढतेचीं कांहीं उदाहरणें आचार्यांनीं दिलीं आहेत. श्लोकसंख्या २४।२५ यांत अनुक्रमें देवमूढता व गुरुमूढता यांचें स्वरूप दिलें आहे.

### काळाची कर्तबगारी.

यावरून आचार्यांच्या काली नसलेल्या अनेक लोकाचारांना काळानें रूढीच्या गादीवर बसविलें. व 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' असें ह्मणून त्यानंतरच्या पंडितांनीं अशा रूढींना धर्माध्यक्ष केलें आहे.

नदीनदांचें स्नान धर्म ह्मणून समजुन करूं नये, स्नानानें पुण्यलाभ होईल, अशा भावनेच्या विरुद्ध आचार्य आहेत. आरोग्य वाढतें अगर स्वच्छता रहावी या हेतूनें नदीनदांचें व समुद्रस्नान करण्यास धर्मानें मनाई केलेली नाहीं. अशा स्नानामुळें मूढतेचा दोष पदरीं येणार नाहीं. जैनधर्म हेतूकडे पहाणारा आहे. तो पदोपदीं हेतूचा विचार करितो व हेतू विचारांत घेऊन त्यावर पाप अगर पुण्य यांचे शिक्कामोर्तब करितो.

### (६) स्थितीकरण अंगाचें स्वरूप.

**दर्शनाच्चरणाद्वापि चलतां धर्मवत्सलैः ।**
**प्रत्यवस्थापनं प्राज्ञैः स्थितीकरणमुच्यते ॥ १६ ॥**

**अन्वयार्थः**—( दर्शनात् चरणात् अपि ) सम्यग्दर्शन अथवा सम्यक्चारित्र यांच्यापासून ( चलतां ) चलायमान होणाऱ्याला ( धर्मवत्सलैः ) धर्मप्रेमी लोकांकडून ( प्रत्यवस्थापनं ) स्थिर करणें हें ( प्राज्ञैः ) शहाण्या लोकांकडून ( स्थितीकरणं ) स्थितीकरण अंग ( उच्यते ) सांगितलें गेलें आहे.

**अर्थः**—एखादा सम्यग्दर्शनी व व्रती असेल व चारित्रधारकही असेल. परंतु प्रबल कर्मांच्या उदयामुळें, रोगादिक कारणामुळें, दारिद्र्यामुळें, दुष्टांच्या संगतीमुळें मिथ्या धर्मांच्या उपदेशाच्या परिणामामुळें, मंत्रतंत्रादि चमत्काराच्या प्रभावामुळें अगर अशाच अनेक कारणांमुळे त्याच्या श्रद्धेंत व मनांत चलविचलता झाल्यास, त्याचें मन पूर्ववत् धर्मांत स्थिर करणें, याला स्थितीकरण असें ह्मटलें जातें. दारिद्र्यामुळें कोणी धर्मांतर करूं पहात असेल तर त्याला पैशाची मदत करून त्यास धर्मात स्थिर करणें, धर्मतत्वाबद्दल शंका येऊन धर्मांतर करूं पहाण्याची शंका दूर करणें असें कां करावें ? जनसंख्या कमी होते ह्मणून ? कीं दुसरी कांहीं कारणें आहेत ? दुसऱ्यांचें दुःख व संकट दूर करणें हें सम्यक्त्वाचें लक्षण आहे. तसेंच जगांत जितके अधिक सदाचारी होतील तितकें इष्टच आहे. या अंगाच्या पालनामुळें सदाचाराची बुद्धी होते व सदाचारी लोकांचें अभिनंदन झाल्यानें इतर त्यांचें अनुकरण करितात. व्रती व संयमी लोकांचा आदरसत्कार करणें, त्यांना सहाय्य देऊन व त्यांचें नांव होईल, असें करावें. श्रीमंताच्या श्रीमंतीची स्तुती केव्हां करावी ? तर न्यायमार्गानें मिळविलेल्या पैशाचा धर्म-कार्यांत खर्च होतो तेव्हां. विद्वान, तपस्वी, कलाकार इत्यादिकांबद्दल हीच वृत्ती ठेवावी.

या अंगाच्या महत्वाचा थोडासा अधिक खुलासा करणें अनाठायीं होणार नाही. प्रत्येक जिज्ञासूला धर्ममार्ग दाखवावा; अनीतीनें वागणाऱ्यांना नीतीचे धडे देऊन त्यास सन्मार्गावर आणावें अगर आणण्याचा प्रयत्न करावा. जो भ्रष्ट आहे, पापी आहे व पतित आहे त्याला उच्च पदावर नेणें हाच खरा धर्म आहे. कारण त्या कृत्यांत त्याचा उद्धार आहे, ही उच्च विचारसरणी डोळ्यापुढें ठेवून पंचाध्यायींत ह्मटलें आहे कीं—

**सुस्थितीकरणं नाम परेषां सदनुग्रहात् ।**
**भ्रष्टानां स्वपदात्तत्र स्थापनं तत्पदे पुनः ॥ ८०७ ॥**

सारांश, जो भ्रष्ट झाला आहे, पतित झाला आहे व पदच्युत झाला आहे त्याला कायमचा भ्रष्ट, पतित व च्युत न ठेवतां उपदेश देऊन त्याला वर काढून घेणें अर्थात् त्याला सन्मार्गाला लावणें व पूर्वपदाला पोंचविणें हें जैनधर्माचें एक प्रमुख अंग आहे.

अनेकवेळां अनुभव मात्र विपरीत येतो. एकवार भ्रष्ट झाला कीं, तो कोणी आपला नव्हेच असें समजून त्याला दूर लोटलें जातें. तो बहिष्कृत मानला जातो. त्याला सुधारणेस संधी मिळत नाहीं, अगर इतर त्याला सुधारणेचा प्रयत्न करीत नाहींत, व हें करणेंच धर्म आहे, अशी चुकीची समजूत झाली आहे. वास्तविक धर्माज्ञा मात्र निराळी आहे. याचें कारण धर्माचें अज्ञान, अंधश्रद्धा व उच्चनीचपणाचा वृथा-अभिमान. पुनर्विवाहामुळें पतित होतो, असें मानिलें तरी त्याचे वंशज आजन्म व वंशपरंपरेनें पतितच समजावयाचें झाल्यास या अंगाचें महत्व कोठें उरलें ? व त्यांना आत्मोद्धाराचा मार्ग तो कोणता राहिला ?

जैनधर्म प्रगतिपर, आशावादी व उच्च ध्येयवादी आहे. पतित झालेला पावन होऊन पवित्र व सदाचारी होईल, अशी आशा व विश्वास तो धरितो. आज नाहीं उद्या, या जन्मीं नाहींतर पुढील भवांत आणि कर्मफळ भोगल्यानंतर पतित पावन होणारच असा आशावाद जैनधर्म धरितो. पतिताला सन्मार्गाला लावण्याचा, त्याची प्रगति करण्याचा तो प्रयत्न करितो या अंगाचा अशा सर्व दृष्टीनें विचार करावा, म्हणजे त्याचें महत्त्व कळून येईल.

### (७) वात्सल्य अंगाचें स्वरूपः-

**स्वयूथ्यान् प्रति सद्भावसनाथापेतकैतवा ।**
**प्रतिपत्तिर्यथायोग्यं वात्सल्यमभिलप्यते ॥ १७ ॥**

**अन्वयार्थः**—(अपेतकैतवा) कपटभावानें रहित होऊन (सद्भावसनाथा) चांगल्या भावनेनें ( स्वयूथ्यान्प्रति ) धर्मबंधूचा ( यथायोग्यं ) यथायोग्य

(प्रतिपत्तिः) आदरसत्कार करणें (वात्सल्य) वात्सल्य (अभिलप्यते) असें सांगितलें आहे.

**अर्थः**—सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्ररूपी धर्माच्या पालकांचा जो समूह-समाज-असतो तो स्वधर्मीयांचा समूह आहे. ते स्वधर्मीय आहेत असें समजावें. या समाजांत मुनी, अर्जिका, श्रावक, श्राविका व अव्रती, सम्यग्दृष्टी या सर्वांचा समावेश होतो. या सर्वांचा मनोभावें व कपटरहित नमस्कारा-दिकांनीं सन्मान करणें, त्याना सामोरे जाणें, त्यांचें गुणवर्णन करणें व त्याना उच्चासनावर बसवणें व त्यांच्या भोजनादिकांची व्यवस्था आदरपूर्वक व धर्मबंधु म्हणून करणें, त्याला वात्सल्य म्हणतात. मात्र हे आदरादि व्यवहार कपट व मायारहित असावेत. त्यांत स्वार्थी हेतु नसावा. **या अंगानें जगन्मित्र होण्यास संधी दिली आहे.** परोपकार करणें हें आपलें कर्तव्य आहे, हा आपला धर्म आहे. आपल्या कुटुंबियांची, धर्मीयांची व देशाची उन्नती करण्यांत धन्यता मानावी व त्यामुळें विश्वबंधुत्वाचें नातें जडतें व असें नातें जोडणें हें आपलें धर्मकार्य आहे.

अहिंसाधर्माबद्दल आदर दाखविणाऱ्यांचा सन्मान करणें, हिंसारहित कार्याबद्दल सहानुभूती दाखविणें, सत्यधर्माचा प्रसार करणाऱ्यांना उत्तेजन देणें, व परधर्म व परस्त्री यांना त्याज्य मानणाऱ्याबद्दल आदर दाखविणें वगैरे कृत्यांचा वात्सल्य अंगांत समावेश होतो.

साधर्मियाबद्दल व परधार्मियाबद्दल आपली भावना कशी असावी याबद्दल या श्लोकांत आचार्यांनीं उत्कृष्ट नियम घालून दिला आहे. इतर धर्मियांचा द्वेष करावा, असा अर्थ करणें चुकीचें होईल. **स्वयूथ्यान्प्रति सद्भाव** याचा अर्थ केवळ स्वजातीय असें न समजतां आपल्या गुणासारख्या गुणी लोकांचा समूह, मग तो कोणत्याही जातीचा असो. गुणामुळें तो जैन व स्वधर्मीय होतो. गाय आपल्या वासरांवर जशी ममता करिते, तद्वतच आपल्या समान गुणिजनावर प्रेम करावें, हा या गुणाचा सारांश आहे. विश्वप्रेम,

बंधुभाव व गुणग्राहकता इत्यादि सद्गुणांच्या विकासाला स्फूर्ति देणारें हें अंग आहे.

वात्सल्य अंगाबद्दल श्रीपद्मनंदि आचार्य ह्मणतात कीं:—

स्वमतस्थेषु वात्सल्यं स्वशक्त्या ये न कुर्वते ।
बहुपापावृतात्मानस्ते धर्मस्य परांगमुखाः ॥ ३६ ॥

सारांश, आचार्य समंतभद्र या अंगाचें स्वरूप सांगतांना 'स्वयूथ्यान् प्रतिसद्भावः' इत्यादि शब्द योजना करितात व आचार्य पद्मनंदि 'स्वयूथ्यान्' च्या ऐवजी 'स्वमतस्थेषु' हा शब्दप्रयोग करितात, एवढेंच नव्हेतर 'स्वशक्त्या' असेंही ह्मणतात. आचार्य समंतभद्र यानीं अशी मर्यादा घातलेली नाहीं; हे विचारी वाचकांच्या लक्षांत येईलच. आपल्या धर्मबांधवांबद्दल शक्तिनुसार प्रेमभाव धरावा व जो असा प्रेमभाव धरणार नाहीं तो पापी व धर्मपरांगमुख आहे, असें समजावें; असें पद्मनंदींनीं वरील श्लोकांत सांगितलें आहे. प्रेम व मोह या शब्दात महदंतर आहे. प्रेमांत पापवृत्ती नाहीं, मात्र मोहांत ती प्रवृत्ति दृढतर आहे.

शत्रू व मित्र याना समान लेखावें, सर्वांशीं समता भावानें वागावें व विश्वबंधुत्वाचें नातें निर्माण करावें असा उपदेश सामायिक व्रताचें स्वरूप सांगताना केला आहे. वात्सल्य अंगाचे लक्षण देतांना स्वधर्मीयांशी प्रेमभावानें वागावें असें सांगितलें आहे. या दोन्ही विचारसरणीचा समन्वय करणें कठीण नाहीं. स्वधर्मीयांबद्दल प्रेम दाखवितांना परधर्मीयांचा द्वेष करणें जरूरच आहे अगर त्याचा निर्विवाद तसा परिणाम होतोच असें नाहीं. आपल्या मुलाबद्दल माता प्रेम दाखवितें ह्मणून ती शेजाऱ्यांच्या मुलांचा द्वेषच करिते असें ह्मणता येईल ? 'स्वयूथ्यान्' व स्वमतस्थ हे शब्दप्रयोग कां ? जाती या शब्दाची आज जी कल्पना आहे तीच कल्पना आचार्यद्वयांची असती तर वरीलसारखे शब्दप्रयोग त्यानीं योजलेच नसते. जन्मावरून ठरविलेल्या जातीचा विचार यांत दिसत नसून स्वमतस्थ गुणांचाच विचार केलेला दिसत आहे.

**जाती:—कशावरून ठरविल्या गेल्या आहेत?**

**संयमो नियमः शीलं तपो दानं दयोदया।**
**विद्यंते तात्विका यस्यां सा जातिर्महती मता॥**

**सारांश:**—संयम, नियम, शील, तप व दान इत्यादिक सद्गुण ज्यांच्या ज्यांच्या अंगीं आहेत, अशा लोकांच्या समुदायाला उच्च जातीय असें समजलें जातें. या मान्य आचार्यवचनांत जाती ही जन्मावरून ठरविली नसून ती गुणावरून ठरविली गेली आहे, हें स्पष्ट दिसेल. भगवान महावीरांनीं तर गुणाचा व जन्माचाही विचार केलेला नाहीं. **मनुष्यजातिरेकैव** ही क्रांतिकारक घोषणा भगवानानींच करून इथून तिथून सर्व मानवी प्राणि हे **एकाच जातीचे** आहेत, अशी जाहीर घोषणा केली आहे. या जाहीर घोषणेच्या आधारावर दुसऱ्या एका आचार्यांनीं गाय व घोडा यांच्यांत जसा शारीरिकच भेद आहे, त्याप्रमाणें भेद मनुष्य योनींत नाहीं, म्हणून मानवी प्राण्यांची **जात एकच** आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. श्लोकसंख्या २५-२६ खालीं यासंबंधी आणखीही थोडासा अधिक खुलासा विस्तारपूर्वक आचार्यवचनासह दिला आहे; त्याकडे विचारी वाचकांचें लक्ष अगत्यपूर्वक वेधीत आहे. याही उप्पर जन्मावरून जाती मानाव्यात असा आग्रह धरिल्यास भगवान महावीरासारख्या विभूतींच्या अवताराचीच वाट पहाण्यापेक्षां अधिक तें काय करतां येईल!!

**प्रभावना अंगाचें स्वरूप.**

**अज्ञानतिमिरव्याप्तिमपाकृत्य यथायथम्।**
**जिनशासनमाहात्म्यप्रकाशः स्यात् प्रभावना॥ १८॥**

**अन्वयार्थ:**—(अज्ञानतिमिरव्याप्तिं) अज्ञानरूपी अंधःकाराच्या प्रसाराला (अपाकृत्य) दूर करून (यथायथम्) यथाशक्ति (जिनशासनमाहात्म्यप्रकाशः) जैनधर्माचें महात्म्य प्रगट करणें (प्रभावना) प्रभावना (स्यात्) होय.

अर्थः—संसारी लोकांत अज्ञानामुळें मिथ्याधर्माबद्दल आदर असतो व सत्यधर्माची खरी कल्पना नसते. त्यांच्या मनांतील अज्ञानरूपी अंधःकार नाहींसा करण्याच्या प्रयत्नाला प्रभावना असें ह्मणतात. अज्ञानरूपी अंधः-काराचा नाश करावयाचा ह्मटल्यास रत्नत्रय-धर्माचा उपदेश करणें क्रम-प्राप्तच आहे.

या अंगाचें महत्त्व फार मोठें व परिणाम फार दूरगामी आहेत. सत्यार्थदेव, गुरू व शास्त्र कोणास ह्मणावें ! कल्याणकारी धर्म कोणता ! दशधर्म ह्मणजे काय ! वगैरे बगैरेबद्दल लोकांना ज्ञान करून जैनधर्माचें वैशिष्ट्य वा माहात्म्य पटवुन देण्यानें या अंगाचें पालन होणार आहे.

जैनधर्माचें वैशिष्ट्य पटविण्यासाठीं पुस्तक प्रकाशन, उपदेश, विद्या-दान, पूजाप्रतिष्ठा वगैरे अनेक मार्ग आहेत. या मार्गाचें अवलंबन करण्यांत प्रभावना अंगाचें पालन होणार आहे. जिन-मंदिर बांधणें, पूजाप्रतिष्ठादि महोत्सव करणें, पाठशालादि स्थापन करणें व धर्मग्रंथ प्रकाशन करणें इत्यादि कृत्यांत प्रभावना करण्याचा हेतू असावा; नांवलौकिकाचा हेतू नसावा. निष्काम कार्य करावें. बडेजावासाठीं व नांवलौकिकाच्या हेतूनें हें करूं नये. सम्यग्दर्श-न्याला आत्मस्तुती व परनिंदा वर्ज्य मानिली आहे. वात्सल्य अंगपालनानें इतराचे शारीरिक कष्ट कमी होतील. प्रभावना अंगाच्या पालनामुळें, अज्ञानी लोकांच्या बौद्धिक वाढीस व सन्मार्ग प्रवृत्तीस मदत होणारी आहे. प्रभावना अंगाच्या पालनामुळें खऱ्या धर्माचें ज्ञान इतरांनाहि होऊन धर्मप्रसारास सहाय्य होईल. धर्मप्रसारामुळें सद्गुणांची वाढ होऊन जगत् सुखमय व आनंदमय होईल.

**आठ अंगांचें पालन करणाऱ्या प्रसिद्ध व्यक्तिः—**

**तावदंजनचौरोऽङ्गे ततोऽनन्तमतिः स्मृता ।**
**उद्दायनस्तृतीयेऽपि तुरीये रेवती मता ॥ १९ ॥**

**ततो जिनेन्द्रभक्तोऽन्यो वारिषेणस्ततः परः ।**
**विष्णुश्च वज्रनामा च शेषयोर्लक्ष्यतां गतौ ॥ २० ॥**

**अन्वयार्थः**—( तावत् अंगे ) पहिल्या अंगामध्यें ( अंजनचौरः ) अंजनचोर ( स्मृतः ) जाणावा ( ततः ) दुसऱ्या अंगामध्यें ( अनन्तमतिः ) अनंतमति ( स्मृता ) प्रसिद्ध झाली आहे. ( तृतीये ) तिसऱ्या अंगामध्यें ( उद्दायनः ) उद्दायन ( लक्ष्यतां गतः ) प्रसिद्धीस आला आहे. ( तुरीये ) चवथ्या अंगामध्यें ( रेवती लक्षतां मता ) रेवती प्रसिद्ध झाली आहे ( ततः अन्यः जिनेंद्रभक्तः लक्ष्यतां गतः ) पांचव्या अंगामध्यें जिनेंद्रभक्त प्रसिद्धीस आला आहे. ( ततः परः वारिषेण. लक्ष्यतां गतः ) सहाव्या अंगांत वारिषेण प्रसिद्ध झाला आहे. ( विष्णुच वज्रनामा ) विष्णुकुमार व वज्रकुमार हे ( शेषयोः लक्ष्यतां गतौ ) शिल्लक राहिलेल्या अर्थात् अनुक्रमें सातव्या व आठव्या अगांत प्रसिद्ध झाले आहेत.

**अर्थः**—पहिल्या निःशंकित अगाचें पालन केल्यानें अंजनचोर, दुसऱ्या निष्कांक्षित-अंगाचें पालन केल्यानें अनंतमति, तिसऱ्या-निर्विचिकित्सा अंगाचें पालन केल्यानें राजा उद्दायन, चौथ्या अमूढ-दृष्टि-अंगाचें पालन केल्यानें राणी रेवती, पांचव्या-उपगूहन-अंगाचें पालन केल्यानें शेठ जिनेंद्रभक्त, सहाव्या-स्थितीकरण-अंगाचें पालन केल्यानें राजपुत्र वारिषेण, सातव्या-वात्सल्य-अगाचें पालन केल्यानें विष्णुकुमार मुनी, व शेवटच्या-प्रभावना-अंगाचें पालन केल्यानें वज्रकुमार अशा आठ प्रसिद्ध व्यक्ति होऊन गेल्या. यांचीं नांवें आज दोन हजार वर्षे तरी अजरामर होऊन राहिलीं आहेत. एकेका अंगाचें पालन केल्यानें जर उद्धार होतो तर 'अधिकस्य अधिकं फल' या न्यायानें हे आठही आचार पाळल्यास त्यांचा अधिकच अधिक उद्धार होईल. एकेका अंगाच्या पालनानें उद्धार झाला, इतर अंग पालन करण्याची जरूरी नाहीं अशा गैरसमजास जागा राहू नये म्हणून आचार्यांनीं पुढील श्लोकांत आठही

अंगांच्या पालनाची आवश्यकता सांगितली आहे. कारण या आठ अंगांपैकीं एखाद्या अंगाचें पालन करणाऱ्यांचा जरी उद्धार झाला असला तरी जन्म जरादिकांच्या फेऱ्यांतून सुटका होऊन मुक्ति मिळण्यास आठही अंगाच्या पालनांची जरूरी आहे हे पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**आठही अगांच्या पालनाची आवश्यकता.**

**नांगहीनमलं छेत्तुं दर्शनं जन्मसन्ततिम् ।**
**न हि मंत्रोऽक्षरन्यूनो निहन्ति विषवेदनाम् ॥२१॥**

**अन्वयार्थः**—('यथा') ज्याप्रमाणें (अक्षरन्यूनः) अक्षरानें न्यून—कमी असलेला (मन्त्रः) मंत्र (विषवेदनां) विषाच्या वेदनेचा (न निहन्ति) नाश करीत नाहीं (तथा) त्याप्रमाणें (अंगहीनं) अंगहीन (दर्शनं) दर्शन (जन्मसंततिं) जन्माच्या चक्राचा (छेत्तुं) नाश करण्यास (अलं न) समर्थ नाहीं.

**अर्थः**—सर्पदंशाचो अगर इतर विषाची विषबाधा नष्ट करण्याचें कांहीं मंत्र आहेत. विषबाधा नष्ट करण्यासाठीं मन्त्रोच्चार करीत असतां, त्या मंत्राच्या उच्चारांत कमी अधिक झालें अगर मंत्र बरोबर व योग्य रीतीनें म्हटला वा घातला गेला नाहीं तर मन्त्राचा इष्ट तो परिणाम होऊन विष बाधा नष्ट होणार नाहीं. तद्वतच वरील आठ अंगांपैकीं कांहीं अंगांचें पालन झालें तर तर असें अंगहीन सम्यग्दर्शन जीवाला संसाराच्या फेऱ्यांतून मुक्त करण्यास समर्थ ठरणार नाहीं.

**सारांशः**—संसाराचा जन्ममरणाचा फेरा चुकविण्यासाठीं आठ अंगसहित सम्यग्दर्शनाचें पालन होणेंच जरूर आहे. सम्यग्दर्शन त्याच्या आठही अंगाचें आचारासह-गुणासह असलें पाहिजे.

**मूढताः**—

चौथ्या श्लोकांत आठ अंगानें सहित वा युक्त आणि तीन प्रकारच्या मूढता व आठ प्रकारचे गर्व यांनीं रहित असलेल्या श्रद्धेला सम्यग्दर्शन या

नांवानें संबोधिलें आहे. श्लो. सं. ११ ते १८ यांत आठ अंगाचें-गुणांचे स्वरूप वर्णिलें आहे. श्लोक नंबर १९।२० यांत या आठ अंगापैकीं एकेका अंगांत प्रसिद्धीस आलेल्या महानुभावांची नामावली दिलेली आहे. श्लोक नं. २१ मध्यें आठही अंगाच्या पालनाचें महत्व व आवश्यकता प्रतिपादिली आहेत. त्यानंतर मूढता ह्मणजे काय, त्याचे प्रकार किती त्यांचें स्वरूप काय आहे, इत्यादिकांचा विचार करणें क्रमप्राप्तच आहे. श्लोक नं. २२।२३।२४ मध्यें याबद्दल विचार केलेला आहे.

## लोकमूढतेचें स्वरूप.

**आपगासागरस्नानमुच्चयः सिकताश्मनाम् ।**
**गिरिपातोऽग्निपातश्च लोकमूढं निगद्यते ॥ २२ ॥**

**अन्वयार्थः**—( आपगासागरस्नान ) 'धर्म समजून ' नदी, समुद्र यांत स्नान करणें, ( सिकताश्मनां उच्चयः ) वाळू, पाषाण यांचें ढीग करणें, ( गिरिपातः ) पर्वतावरून उडी घेणें, ( अग्निपातः ) अग्नीमध्यें आहुति घेणें ही ( लोकमूढं ) लोकमूढता ( निगद्यते ) ह्मटली जातें.

**अर्थः**—पुण्यलाभाच्या हेतूनें नदी नद व समुद्र यांत स्नान करणें, वाळूचें अगर दगडांचें ढीग करून व त्यांना देव समजून-वाळूची व दगडांची पूजा करणें, पर्वतावरून उडी मारून पुण्य ह्मणुन जीव देणें, नदीच्या पाण्यांत बुडवून घेऊन जीव देणें—जलसमाधी घेणें व अग्निकाष्ठ भक्षण करून जीव देणें-सति जाणें-इत्यादि कृत्यांचा लोकमूढता या सदराखालीं श्रीसमंतभद्राचार्यांनीं समावेश केला आहे.

वरील श्लोकांत लोकमूढतेची ह्मणून फार थोडीं उदाहरणें दिलीं आहेत; परंतु 'अग्निपातश्च' या शब्दप्रयोगांत जो ' च ' शब्द घातला आहे त्यावरून ' इत्यादि इत्यादि ' असा बोध होतो. अर्थातच ते इत्यादि ह्मणजेच कोण व समुद्र स्नानादिकांना लोकमूढता या सदराखालीं कां घातलें

आहे याचा थोडासा अधिक खुलासा करणें जरूर आहे; कारण अनेक आचार जैन समाजांत धर्म म्हणून रूढ झाले आहेत व नव्या नव्या आचारांची त्यांत प्रत्यहीं भर पडत आहे.

मिथ्यात्वाच्या उदयानें, देशकाल परिस्थितीमुळें व स्वार्थी लोकांच्या शिकवणुकीमुळें अनेक आचार रूढ झाले व त्या आचारांत नव्या नव्या आचारांची भर पडत गेली. झटपट रंगारी होऊन विनासायास पुण्यसंचय करितां आल्यास तें सर्वांनाच हवें. मानवी मनांतील या अशा विचारांचा विचार करून धूर्त व स्वार्थी लोकांनीं धर्माच्या नांवावर अनेक खुळांचीं रानें व स्तोम माजवून ठेविली व अज्ञानी लोक या खुळांना धर्म समजून वागू लागले. हा भ्रम दूर करून खऱ्या धर्माचा उपदेश करणें, हें श्रीसमंतभद्रासारख्या आचार्यांचें कर्तव्यच होतें व तें त्यांनीं केलें आहे.

श्लोक नं. १३ मध्यें आचार्यांनी या मानवी देहाचें वर्णन— 'स्वभावतोऽशुचौ काये'—असें केलें आहे. हा देह मूलतः—जन्मतः— अशुद्ध व अपवित्र असलेला देह समुद्र वा नदीनदांच्या स्नानानें पवित्र होतो, असें मानणेंच चुकीचें होईल. चामडें अपवित्र आहे; असलें अपवित्र चामडें गंगायमुनादि नदींच्या पाण्यांत एकवार बुचकळून काढलें काय, अगर अनेक दिवस पाण्यांत ठेवलें काय, तें अपवित्रच राहणार. पर्वतावरून उडी मारून आत्महत्या केल्यानें वा जलसमाधी घेतल्यानें पुण्य लाभ तो कसला? आजन्म वाटेल तसें वागावें व एके दिवशीं वरीलप्रमाणें कृत्य करून स्वर्गाच्या अगर मोक्षाच्या दारावर ठोठावण्याचा हक्क आला असें मानावें !!

शरीराच्या शुचिर्भूतपणामुळें मुक्ति मिळणारी नाहीं. आत्मा-शुद्धात्मा-परमात्मा-झाल्याशिवाय मुक्तीची आशा धरणें व्यर्थ आहे. भांड्यांमध्यें विष्टा ठेविली व तें भांडें गंगानदीच्या पात्रांत बुचकळून आणिलें काय? व मल-मूत्रादिकांनीं भरलेलें हें शरीर नदींत बुचकळून आणिलें काय? परिणाम

सारखाच; फरक मुळींच नाहीं. तशांत गंगादि नद्यांमध्यें किती, कोण कोणती व कोठकोठून घाण वाहून येते, याचा विचार कर्तव्य नाहीं ?

ग्रहणांचें सुतक मानणें, ग्रहणांचे दिवशीं शूद्रांना दान देणें, विहीर-पूजा, शमीपूजा, वडपिंपळादिकांची पूजा, गाईची पूजा, लक्ष्मी-पैशाची पूजा, श्राद्ध करणें व सुतक पाळणें वगैरे वगैरे लोकमूढतेचीं आणखी कांहीं रूढ उदाहरणें होत.

आचार्य अमितगतिच्या श्रावकाचारांतील चतुर्थ परिच्छेदांतील श्लोक संख्या ९५-९६ मध्यें गाय, मुसळ, चूल इत्यादिकांची पूजा यांना देवमूढता या सदराखालीं घालण्यांत आलें आहे. श्लो. संख्या ९८ मध्यें मिथ्यात्वाचा जो त्याग करितो व सम्यक्त्व धारण करितो, त्याला मुक्ति शीघ्र मिळते असें प्रतिपादिलें आहे; अर्थात् सम्यक्त्वाचें हें अनन्यसाधारण फळ होय.

यावरून लोकांनीं शुचिर्भूत असूंच नये कीं काय ? असा प्रश्न साह-जिकच उद्भवतो. शुचिर्भूतपणाचे एक लौकिक व दुसरा लोकोत्तर वा अलौकिक असे दोन भेद आहेत. लौकिक शुचिर्भूतपणाचें पुढील आठ प्रकार आहेत. (१) कालशौच (२) अग्निशौच (३) भस्मशौच (४) मृत्तिक-शौच (५) गोमयशौच (६) जलशौच (७) पवनशौच व (८) ज्ञानशौच.

वर जे प्रकार सांगितले आहेत, ते अवश्य पाळावेत; पण ते पुण्यदायी ह्मणून नव्हे तर व्यवहार ह्मणून. ही व्यावहारिक शुचिर्भूतता पाळणें आरोग्यादि दृष्टयाही जरूर आहे.

## स्त्रिया, कुंकू व लोकमूढता.

कांहीं समाजांतील स्त्रिया कुंकू आडवा लावितात, दुसऱ्या समाजांतील तो उभा लावतात. कांहीं रुपयाएवढा गोल लावितात तर कांहीं डाळी-एवढाच लावितात. कुंकवाचा हा आकारही धर्मावर आधारलेला आहे, असें प्रत्येकीचें ह्मणणें आहे. यावरून आडवा, उभा, गोल, लांबट, लहान

वा मोठा अशा निरनिराळ्या आकाराचा असावा असा एकच धर्म परस्पर-विरोधी कसें सांगेल ? लोकमूढता ती हीच व अशा मूढतेला—मूर्खपणाला—आपण धर्माच्या सिंहासनावर बसवून त्याच्यापुढें आदबीनें मान तुकवितो !! अशा मूढतेची मजल कासोटा, जोडा व हजामत इत्यादिकांपर्यंत गेली आहे. या सर्वांत अथांग धर्म भरला आहे असें मानणारे महाभाग जैनसमाजांतहि विरळ आहेत असेंच नाहीं. अशा नमुन्यांचीं उदाहरणें हुडकूं पाहतां असंख्य मिळतील यांत संदेह नाहीं.

स्वर्गवासी हिराचंद नेमचंद दोशी यांनीं प्रसिद्ध केलेल्या रत्नकरंडाच्या प्रतींतील पान ५६।५७ वर लिहिलें आहे कीं, 'कित्येक स्नान करून स्वयंपाक करण्यांत, कित्येक स्नान करून जेवण्यांत, तसेंच कित्येक ओलें वस्त्र नेसून जेवण्यांत आपली पवित्रता, शुद्धता मानतात, पण अभक्ष्य भक्षण व हिंसादिक याविषयीं विचार करीत नाहींत. हें सर्व मिथ्यात्वाच्या उदयानें होत आहे, याला लोकमूढता ह्मणतात. वरील उताऱ्यांत स्नान करून स्वयंपाक करणें व त्यांत पवित्रता मानणें या कृत्याला लोकमूढतेंत घातलें आहे. अन्नाची पवित्रता स्नानावर नाहीं, अन्न पवित्र नाहीं व देह पाण्यानें धुतला तर त्यामुळें अपवित्र अन्न पवित्र थोडेंच होणार ? बाह्य शुचिर्भूतता असूं नये असें म्हणण्याचा उद्देश नाहीं, हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

## २ देवमूढता लक्षण.

**वरोपलिप्सयाशावान् रागद्वेषमलीमसाः ।**
**देवता यदुपासीत देवतामूढमुच्यते ॥ २३ ॥**

**अन्वयार्थः**—( आशावान् ) ऐहिक सुखाची इच्छा करणारा ( वरोपलिप्सया ) वर मिळविण्याच्या इच्छेनें ( रागद्वेषमलीमसाः ) रागद्वेषानें मलीन असलेल्या ( देवताः ) देवतेची (यत्) जी ( उपासीत ) पूजा करतो ( तत् ) ती ( देवतामूढं ) देवमूढता ( उच्यते ) म्हटली जाते.

**अर्थः**—ऐहिक सुखाच्या आशेनें रागद्वेषादिकांनीं युक्त असलेल्या देवदेवतांची पूजा करणें याला देव-मूढता असें ह्मटलें आहे. स्त्रीपुत्र, धन-धान्य, वस्त्रप्रावरण, मानमान्यतादिकांची इच्छा संसारी जीव धरतो. त्याची प्राप्ती व्हावी ह्मणून तो रागद्वेषादियुक्त असलेल्या देवदेवतांची पूजा करितो. त्यांना संतुष्ट करून त्यांच्याकडून धन-धान्यादिकांचा वर मिळेल ह्मणून आशा धरितो.

सातावेदनीय कर्मोदयानें राज्यसुख संपदादिकांचा लाभ होतो. लाभांतराय कर्मोदयानें लाभ होतो व भोगोपभोग कर्मोदयानें भोग व उपभोग यांची साधनसामुग्री मिळते. अर्थात् हें सर्व देणारें कर्म आहे. देव देतहि नाहीं व काढूनहि घेत नाहीं. जीवाला—आत्म्याला—जो देवपणा येतो तो कोणाकडून मागून घेऊन येत नाहीं. शुभ व अशुभ कर्मांचा फेरा चुकविणें कोणाच्याच हातीं नाहीं. कर्मोदय झाला तर तो भोगल्यानेंच संपणार आहे. देवदेवता मध्येंच पडून विघ्न व दुःख हरण करण्यास असमर्थ आहेत. आपण होऊन संकटें आणावयाचीं व संकटग्रस्तानें शरण येऊन पूजा केली कीं, त्या संकटाचें निवारण करवायाचें असा खेळ खेळविणारा देव कसला ? तो खरा देव नव्हे. खरा देव अशा उलाढाली करीत नसतो. अशा उलाढाली करणाऱ्याला देव मानणें मूर्खपणाचें लक्षण आहे. सम्यग्दृष्टी होणाऱ्यानें अशा मूर्खपणापासून दूर रहावें. ऐहिक सुखाची आशा बलवत्तर झाली कीं, मनुष्य-प्राणी अशा फंदांच्या मागें लागतो.

जैनधर्म गुणाचा चाहता आहे, व्यक्तीचा नाहीं. अरहंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधू यांना भजावें, त्यांना नमस्कार करावा व तसें करीत असतां तीन प्रकारच्या मूढता धरूं नयेत असेंहि सांगितलें आहे.

देव, शास्त्र व गुरु पारखून घ्यावा व त्यांनाच देव, शास्त्र व गुरु मानावें अशी स्पष्ट आज्ञा दिली आहे. असें करितांना अमक्यालाच देव, शास्त्र अगर गुरु माना असें आचार्यांनीं सांगितलें नाहीं. त्या त्या गुणसमुच्चयानें

जें युक्त असतील त्या गुणसमुच्चयाला भजा असें सांगितलें आहे. आचार्यांना हें माहित होतें कीं, आपल्या पूर्वी जसें अनेकांनीं धर्मग्रंथ लिहिले आहेत, तसेंच आपल्यानंतरहि लिहिले जाणार. त्यामुळें अमुकच ग्रंथांना शास्त्र माना असें सांगण्याचें त्यांनीं टाळलें आहे. शास्त्राबद्दलची जी विचारसरणी तीच इतराबद्दलची आहे.

इतर धर्मीयांत मात्र हें वैशिष्ट्य दिसत नाहीं. राम, कृष्ण इत्यादिकांना हिंदुधर्मीय देव मानतात. रामकाळांतील लोकांना श्रीकृष्ण हा देव ह्मणून माहित नव्हता. ती अडचण टाळण्यासाठीं अवतारांची कल्पना निघाली असावी व त्यामुळेंच श्रीराम व श्रीकृष्ण हे एकाचेच अवतार आहेत असें मानण्यांत येऊं लागले. अवतारांची व्याप्ति वाढत वाढत गेली व शेवटीं बौद्ध बुद्धालाही–या अवतार परंपरेंत जागा दिली गेली. ख्रिस्तानुयायी येशूलाच देव समजतात, तर मुसलमानांचा देव एक अल्लाच होय. आपआपल्या धर्मांतील देवाशिवाय इतरांना भजूं नका, त्यांना देव असें मानू नका, फार काय त्यांना आदर दाखवूं नका असें बजावून सांगण्यांत आलें आहे. गीतेंत–' मामेव शरणं व्रज '–मला एकट्यालाच शरण ये, भज व देव मान असें सांगितलें आहे. श्रीबसवेश्वरांचाही तोच उपदेश. लिंगायत धर्मांतील यासंबंधींचीं कांहीं वचनें खालीं दिलीं आहेत. श्रीबसवेश्वर ह्मणतात कीं, ' नंबिद इंडतिगे गंडनोब्बने काणिरो । नंबबल्ल भक्तगे देवनोबन्न काणिरो । बेडबेड अन्यदेवद संग बोल्ल, अन्य देववेंबुदु हादर काणिरो । भावार्थः—साध्वी व पतिव्रता स्त्री आपल्या पतीवरच भक्ति ठेवते-तिला नवरा एकच असतो–तद्वतच भक्ताला देव एकच आहे. दुसऱ्या देवाला भजणें हा व्यभिचार आहे. याच धर्मांतील एक वचन–' शंभू ह्मणे अन्य देव जे पूजिती । नरकी पावती कल्पांतरीं '–यावरून प्रत्येक धर्मीयांचा कटाक्ष विशिष्ट नांवाच्या देवालाच भजा असें सांगण्याकडे आहे. जैनधर्म मात्र नांवानें कोणाला देव, गुरु अगर शास्त्र मानीत नाही तर त्या त्या गुणानें युक्त असणाऱ्यांनाच देव, शास्त्र व

गुरु मानितो. ह्मणूनच तो गुणांचा भक्त आहे, शरीराचा व व्यक्तीचा भक्त नाहीं.

येथें अशी शंका घेतली जाईल कीं तेवीसाव्या तीर्थकरांच्या काळांत चोवीसाव्या तीर्थकरांना भजत नव्हते ? जैनधर्मानें वर्तमान भूत व भविष्य कालीन तीर्थकरांना मानिले आहे. त्यामुळें तेवीसाव्या तीर्थकरांच्या काळांतही चोवीसावे-भविष्य कालीन-तीर्थकर ह्मणून वीर वर्धमानांना भजतच होते. आजचे जैन वर्तमान व भूत काळच्या तीर्थकराबरोबरच भविष्य कालीन तीर्थकरांनाहि वंदन करितात.

श्रीकृष्णाला जैनधर्मानें-भविष्य कालीन-तीर्थकर मानिले आहे. हें जरी खरें असलें तरी गोपीच्या समूहांत वावरणारा श्रीकृष्ण भावी तीर्थकर मानिलेला नाहीं. जैन रामायणांतील श्रीराम हा हिंदुधर्मीय रामाहून जसा भिन्न आहे तद्वत हिंदुधर्मीय मारुती-वानर-वा-नर व जैनधर्मीय मारुती हे भिन्न आहेत. हिंदुधर्मीय मारुतीचीं चित्रें पाहतां त्यांत मारुतीच्या शरिराची व जातीची एकवाक्यता दिसत नाहीं. मारुती हा वानर वा—नर जातीचा नव्हता तर तो एक मानवी प्राणीच होता, असें जैनधर्म मानितो.

या जीवाला धन इतर कोणी देत नाहींत अगर उपकार व अपकारहि कोणी करीत नाहींत. आपल्यावर इतरांनीं उपकार अगर अपकार केल्याचें दृश्य नित्य व्यवहारांत दिसतें हें कसें ? हें सर्व आपल्या पूर्वकृत शुभाशुभ कर्माचें फळ आहे. पूर्वजन्मी आपण शुभकृत्यें केली होती ह्मणून आपल्यावर उपकार करण्याची बुद्धी दुसऱ्यास झाली असें समजणेचें आहे. यक्ष, यक्षिणी व व्यंतर देवादिकांची पूजा केल्यानें आपणांस धन व पुण्यप्राप्ती होते असें मानिल्यास मग दान, शील संयमादि गुणांची जरूरी ती कोठें ? अर्थात व्यंतर देव सर्व सुख देणारे आहेत असें मानिल्यास धर्माचरण जसें व्यर्थ तसेंच कर्म ह्मणून कांहीं आहे व त्याचीं फळें भोगावीं लागतात हें ह्मणणेंहि व्यर्थ होईल.

पार्श्वनाथ भगवानांची पूजा करितांना त्यांच्या डोकीवरील धरणेंद्राच्या फणाचीहि पूजा घडते. समवसरणांत धरणेंद्र फणा धरून होता, हे संभवनीय कसें? परंतु प्रथा पडली व आतां फणाशिवाय पार्श्वप्रभूंची मूर्ति मिळणेंच दुर्मिळ. यासंबधीं स्व. वा. हिराचंद नेमचंद दोशी यांनीं प्रसिद्ध केलेल्या श्रावकाचारांतील पान ६२।६३ वरील विवेचन जरूर पहावें.

'वरा'च्या-सांसारिक सुखाच्या आशेनें कुदेवादिकांना भजूं नये, हें ठीक आहे. परंतु खरा देव, गुरु व शास्त्र' यांना तरी 'वरा'च्या सांसारिक सुखाच्या आशेनें भजावें काय? याचेंहि उत्तर नकारार्थींच द्यावें लागतें. देव, गुरु व शास्त्र यांची भक्ती व पूजा करावयाची ती निष्काम असावी. कोण-त्याहि आशेनें भक्ति व पूजादिक करणें त्याज्य मानिलें आहे. फार काय, मोक्ष व मुक्ति मिळावी या आशेनें, धर्माचरण करणेंहि त्याज्य मानिलें आहे. कर्तव्य ह्मणून धर्माचरण करावें. धर्माचरण निष्काम असावें.

## (३) गुरु-पाखंडी-मूढता

**सग्रन्थारंभहिसानां संसारावर्तवर्तिनाम् ।**
**पाखण्डिनां पुरस्कारो ज्ञेयं पाखण्डिमोहनम् ॥२४॥**

**अन्वयार्थः**—( सग्रन्थारंभहिसाना ) परिग्रह, आरंभ व हिंसा यांनीं सहित असणाऱ्या ( संसारावर्तवर्तिनाम् ) व संसाररूपी भोवऱ्यांत फिरणाऱ्या ( पाखण्डिनां ) पाखंडी साधूंची ( पुरस्कारः ) पूजा संस्कार करणें ही ( पाखण्डिमोहनम् ) पाखण्डिमूढता ( ज्ञेयं ) जाणावी.

**अर्थः**—परिग्रही, आरंभी व हिंसावादि लोकाना गुरु समजून त्यांची पूजाअर्चा, त्यांचा मानसन्मान करणें याला पाखण्डि-मूढता असें ह्मटलें आहे.

नोकरचाकर, धनधान्यादि व बायकामुलांसह संसार करणारे परिग्रही होत. शेतीभाती, सावसावकारी करणारे आरंभी होत. पंचाग्निसाधन व यज्ञ-यागादिकांचा उपदेश करणारे व स्वतः करणारे ते हिंसावादी होत.

अज्ञांना गुरु समजणें याला मूढता असें म्हटलें आहे. मंत्रतंत्र, जप, होम, मारण, उच्चाटन व वशीकरणादि निंद्य आचारांचा जे प्रचार करितात, ते पाखण्डि होत. त्यांना गुरु असें म्हणतांच येणार नाहीं. अशा कृत्यामुळेंच ते स्वतःच संसारांत भ्रमण करण्यास पात्र असतात. मग ते दुसऱ्याचा उद्धार कसा करणार! ज्याला स्वतःला पोहतां येत नाहीं, तो पाण्यांत बुडणाऱ्या इतरांना कसा वांचविणार?

पांचव्या श्लोकांत खऱ्या देवाची, नवव्या श्लोकांत खऱ्या शास्त्राची व दहाव्या श्लोकांत खऱ्या गुरुचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्या कसोटीस उतरणारे ते खरे देव, तें खरें शास्त्र व तो खरा गुरु होय. जो खरा देव नाहीं, जें खरें शास्त्र नाहीं व जो खरा गुरु नाहीं त्यांनीं सांगितल्याप्रमाणें वर्तन करणें यांना मूढता म्हणतात.

धर्माच्या नांवावर अगर धर्माच्यामागें अनेक घडामोडी जगामध्यें झाल्या आहेत; व आजमितीस त्यांना खंड पडलेला आहे, असेंही नाहीं. तीं कार्यें अशीं आहेत कीं त्याच्या कर्त्याला सुख मिळत नाहीं अगर परोपकारालाही तीं कार्यें उपयुक्त ठरत नाहीत. अशा कार्यांमुळें स्व अगर पर सुख मिळत नाहीं. ज्या कार्यांमुळें स्वतःचें अगर इतरांचें हित नाहीं व जीं कांयें कल्याणकारक नाहींत अशा कार्यांना अधर्म म्हणजे मूढता म्हणतात. नदी व समुद्र स्नानामुळें आरोग्य वाढण्यास व सुधारण्यास मदत होते व आरोग्यासाठीं अगर शुचिर्भूत होण्यासाठीं स्नान करण्यांत अधर्म नाहीं. अशा हेतूनें केलेल्या स्नानांत मूढता नाहीं. परंतु गंगादि नद्यांमध्यें स्नान केल्यानें पाप हरण होतें, या भावनेनें व हेतूनें स्नान करणें अधर्म आहे, अशा स्नानाला लोकमूढता असें म्हटलें आहे. पाप घडलें तर आत्मा मलिन होतो, त्या आत्म्याची मलीनता शरीराला अभ्यंगस्नान घातल्यानें जाणार नाहीं. कर्माचा-पापाचा क्षय, भोगल्यामुळेंच होणार आहे. बादलींत पाणी घेऊन "हर गंगे' अगर 'जान्हवीतोयं' असें मोठमोठ्यानें तोंडानें म्हणत स्नान

करणारे अनेक लोक आपण पाहातो. या बादलीतील पाण्यांत गंगा नसतें. गंगेचेंच पाणी पाप हरण करण्यास जेथें असमर्थ, तेथें बादलीतील पाणी काय करूं शकणार !!

श्लोक संख्या २२ मध्यें आचार्यांनीं लोकमूढतेचीं कांहीं उदाहरणें नमुन्यादाखल दिलीं आहेत. या मूढतेचें क्षेत्र अत्यंत विशाल आहे; व जुन्या रूढींत नव्या रूढीची भर पडत चालली आहे. रूढीचा दास अगर गुलाम बनणें हें मूढतेचेंच लक्षण नव्हे ? विवाहादि कार्यांत अनेक रूढी आहेत, खाण्यापिण्यांत त्या आहेत व पोषाखांतही त्या आहेत. या रूढी पाळणें हें आपलें कर्तव्य आहे व त्यांत धर्म आहे, असें समजणाऱ्यांची मूर्खांतच गणना केली पाहिजे.

एकाद्याला रोग जडला तर औषधोपचार करून रोगमुक्त होण्याचा प्रयत्न अवश्य करावा; परंतु रोगमुक्त होण्यासाठीं अभिषेक करणें, तसेंच संकट निवारणार्थ शनिमाहात्म्य वाचणें, पाऊस न पडल्यास देवावर सतत पाण्याची धार धरणें अगर देवालाच पाण्यांत बुडविणें. मुलगा जन्मल्यावर टाळू राखणें. पाहिली हजामत म्हणे मुहुर्तावर करावयाची व न्हाव्याची पूजा करावयाची !! आरोग्यप्राप्तिसाठीं जिनेंद्राची पूजा करण्यांत मूढतेचा दोष कां येणार नाहीं ? रोगपीडा झाली तर अगर दुसरें संकट आलें तर मनुष्य स्वभावतःच देवादिकांचा, धर्माचा व गुरूचा आश्रय करूं पाहतो. असा आश्रय करणें वाईट आहे अगर अधर्म आहे असें नाहीं. परंतु आश्रय कोणत्या हेतूनें करावयाचा ? रोग नष्ट होईल किंवा संकट निवारण होईल म्हणूनच नव्हे—पूजादि करणें हें रोग निवारणाचें औषध नव्हे. **संकट सोसण्याची ताकद मनाला यावी** हा हेतू पूजादिकांत असावा. संकटाचे वेळीं देवादिकांचें स्मरण केलें तर समताभाव उत्पन्न होतो. आपल्या पापकृत्यांचें स्मरण होऊन मनाला पश्चात्ताप होतो. पश्चात्तापानें मनःशुद्धी होते. देव रोग देत नाहीं अगर नष्टही करीत नाहीं. देव कृपा अगर अवकृपा

करीत नाहीं. खरा उपाय बाजूला राहतो व रोग मात्र बळावतो. देवीच्या अगर महामारीच्या सांथीच्या वेळीं योग्य उपाय न करितां केवळ देवावर विश्वास ठेवून राहिल्यानें कित्येक अर्भकें व वयांत आलेले लोक मृत्युमुखीं पडतात, हा अनुभव सर्वत्र आहे.

देवपूजादिकांमुळें पुण्यसंचय होतो व त्याचें फळ भविष्यकाळीं मिळेल; विद्यमान संकटाला या पुण्याचा उपयोग नाहीं. संचित कर्माचा नाश देवपूजादिकानें होणार नाहीं. सम्यग्दृष्टी हा **सत्याचा पुजारी** आहे, तो सत्याचा भोक्ता आहे. खरा देव कोण, खरें शास्त्र कोणतें व खरा गुरु कोण यांची तो कसोटी लावून पाहतो; जेथें जेथें सत्य-कल्याणकारी व हितावह-आहे तें तें आपलें आहे असें मानितो. कोणत्या भाषेत शास्त्र लिहिलें आहे, त्या भाषेकडे पहात नाहीं.

अशा सांप्रदायाचा तो गुलाम नाहीं. सम्यग्दृष्टी स्वतंत्र विचाराचा आहे. तो जी कसोटी लावतो ती ही कीं, त्या ग्रंथांत जें जें लिहिलें आहे तें तें आत्महिताचें आहे कीं नाहीं ? कल्याणकारक आहे कीं नाहीं ? तें श्रेयोमार्ग दाखविणारें आहे कीं नाहीं ? इत्यादि. ते कल्याणमार्ग दाखविणारें आहे असें ठरलें कीं त्यावर तो श्रद्धा ठेवितो.

कोणी ह्मणतील कीं, शास्त्राची अगर गुरूची परीक्षा करण्यापूर्वी आपण निदान तितकेंच विद्वान व सुशील असावयास पाहिजे. अगर ज्या गुरूची परीक्षा करावयाची त्याच्याइतकें तरी आचारसंपन्न असावयास पाहिजे; परंतु ही विचारसरणी चुकीची आहे. स्वयंपाक चांगला झाला नाहीं असें आपण ह्मणतो; त्यावेळीं त्यापेक्षां चांगला स्वयंपाक आपणांस करावयास येतोच असें नाहीं. क्रिकेट खेळणारा चुकला असें ह्मणतो त्यावेळीं त्याची चूक आपण काढतां, त्यापेक्षां आपण चांगलें खेळतोच असें नाहीं. एकही टाका घालावयास येत नसला तरी शिंप्याची चूक दाखवितोंच कीं नाहीं ?

सोनें, चांदी, कपडालत्ता वगैरे खरेदी करितांना आपण सर्वप्रकारें परीक्षा करितों. रोज लागणाऱ्या कपड्याच्या खरेदीच्यावेळीं जितकी परीक्षा करितो, त्यापेक्षां अधिक परीक्षा भारी किंमतीचा कपडा खरेदी करितांना करितों. त्याहीपेक्षां अधिक परीक्षा सोनें, चांदी आदि मूल्यवान् वस्तूंच्या खरेदीच्यावेळीं करितो. कारण किंमत अधिक द्यावयाची असते. धर्म ही चीज सर्वांपेक्षां अधिक मौल्यवान् आहे. इहपरलोकीं सुख देण्याचें धर्म हें साधन आहे, अर्थातच शास्त्राबद्दल, धर्माबद्दल व गुरुबद्दल अधिक चौकशी करणें क्रमप्राप्त आहे, तें कर्तव्य आहे.

गुरुच्या वेषाकडे तरी पहा ! कसाही झाला तरी तो गुरु आहे. आपल्याहून थोर आहे. करितां त्याची परिक्षा कां करा ? जेवढें ग्राह्य असेल तेवढें घ्या, असें अनेक वेळीं ह्मटलें जातें. वेषाकडे पाहून गुरु मानणें मूढता आहे. बाह्य परिग्रह सोडलें कीं तो गुरु होण्यास पात्र नाहीं, तर अंतरंग परिग्रहाच्या त्यागाची जरूरी अत्यावश्यक आहे. मोहवान् मुनीपेक्षां निर्मोही गृहस्थ अधिक पूज्य असें आचार्यच ह्मणतात. असें ह्मणतांना वेषाकडे त्यांनीं पाहिलें नाहीं; अंतरंगाकडे पाहिलें. जेवढें ग्राह्य असेल तेवढें घ्या, असें ह्मणणें संपूर्णपणें स्वीकारतां येणार नाहीं. आचारयुक्त मुनि आहे, त्यांच्या आचाराबद्दल विवेकी आदर दाखवील. परंतु आचार-संपन्न असलेल्यांनीं धर्माचा अभ्यास न करितां अद्वातद्वा प्रवचनें झोडूं लागल्यास त्यास विरोध न करणें ह्मणजे मूढता आहे, अंधश्रद्धा आहे. बाह्यवेषाला बळी पडून रूढीचा दास बनण्यासारखें आहे. शिवाय ग्राह्य तेवढें विवेकी घेईल; परंतु इतर सर्वांनाच तें शक्य नसतें. अंशतः आदर कोण व कां देतो, याचें ज्ञान व भान न राहिल्यानें अशांना इतर, सर्वगुणसंपन्न मानूं लागतात. ह्मणूनच आचार्यांनीं देव, गुरु व शास्त्र यांना पारखा व भलत्यावर विश्वास ठेवूं नका; ठेविल्यास तो अधर्म आहे. व ती मूढता आहे, असा स्पष्ट इशारा दिला.

**वनेऽपि दोषाः प्रभवन्ति रागिणाम् । गृहेऽपि पंचेंद्रियनिग्रहस्तपः ॥**
**अकुत्सिते वर्त्मनि यः प्रवर्तते । विमुक्तरागस्य गृहं तपोवनम् ॥**

**सारांशः**—घरादाराचा त्याग करून अरण्यांत गेला, परंतु पंचेंद्रियांवर ताबा नाहीं, अशापेक्षां संसारांत राहूनही ज्यानें पंचेंद्रियांवर ताबा मिळविला आहे, तो श्रेष्ठ आहे. रागद्वेषादिरहित अशा गृहस्थाचें घर तपोवन आहे. वेषावर भाळण्याचें कारण नाहीं, तें यासाठींच. गुरु कोणास ह्मणावें याची पारख करितांना गुरुच्या जातीकडे न पाहतां त्याच्या गुणाकडे पाहणें जरूर आहे. केवळ सजातीय व सद्धर्मीय आणि वेषांतरित ह्मणून वाटेल त्यास गुरु मानणें मूढताच ठरेल. अंधश्रद्धा ह्मणजे बौद्धिक गुलामगिरीच आहे. या गुलामगिरींतून मुक्त करणें हें तर जैनधर्माचें ध्येय आहे. स्याद्वाद नयानेंही अशी दृष्टी ठेवणें न्याय व युक्तच ठरेल.

भाषा-शुद्धीची चळवळ सुरू झाल्यापासून इतर भाषेंतील शब्दांना प्रतिशब्द देशभाषेंत रूढ करण्याचा प्रयत्न सुरू आहे. आचार्य, कुलगुरु हे शब्द प्रोफेसर व प्रिन्सिपॉल या इंग्रजी शब्दाऐवजीं उपयोगांत आणिले आहेत.

सर राधाकृष्णन्सारख्या विश्वविख्यात तत्ववेत्ताहि प्रोफेसरच व कोणत्याही कॉलेजांतला तत्वज्ञानविषय शिकविणाराही प्रोफेसरच !! धंदा दोघांचा एकच, पण विद्वत्तेंत फरक; तद्वतच समंतभद्रापासून आजवर अनेक आचार्य होऊन गेले, त्या सर्वांना जनता आचार्यच मानीत आली तर त्यांच्या योग्यतेंत फरक हा राहणारच. विद्वत्तेबरोबर आचार्य **संग्राहकही** असतो. संग्राहक ह्मणजे परिग्रही नव्हे तर दुराचारी लोकांना सत्प्रवृत्त बनवून त्यांना जैनधर्मानुयायी बनवावयाचें. त्यांच्यांतील मूढतेचें उच्चाटन करून त्यांना खरा देव, खरें शास्त्र व खरा गुरु यांचे अनुयायी बनवावयाचें. आठ प्रकारच्या अहंकारापासून त्यांना दूर ठेवावयाचें असें कार्य करणारे संग्राहक आचार्य व गुरुपदास पात्र आहेत व त्यांना गुरु मानावें अशी धर्माज्ञा आहे.

## आठ मद व त्यांचीं नांवें.

**ज्ञानं पूजां कुलं जातिं बलमृद्धिं तपो वपुः ।**
**अष्टावाश्रित्य मानित्वं स्मयमाहुर्गतस्मयाः ॥ २५ ॥**

**अन्वयार्थः**—( गतस्मयाः ) अहंकार-गर्व-रहित ( ज्ञानम् ) ज्ञान-विद्वत्ता ( पूजाम् ) पूजा-मानमरातब ( कुलम् ) कुल ( जातिम् ) जाती ( बलम् ) बल-शक्ति ( ऋद्धिम् ) धन-संपत्ति आदि ( तपः ) तप ( वपुः ) शरीर सौंदर्य अशा (अष्टौ) आठांचा (आश्रित्य) आश्रय करून ( मानित्वम् ) मान धरणें यास गर्व ह्मणतात.

**अर्थः**—शास्त्र व शिल्पज्ञानादिबद्दल, आपल्या मानमान्यतेबद्दल, आपल्या कुलाबद्दल, जातीबद्दल, आपल्या सामर्थ्याबद्दल, आपल्या संपत्तिबद्दल, आपल्या उपवासादि तपाबद्दल, आपल्या सौंदर्यादिबद्दल गर्व वाहण्यानें आपण सम्यग्दृष्टी होऊं शकत नाहीं.

वरील आठ गर्वांपैकीं कोणताहि गर्व धरूं नये, याचीं कांहीं कारणें खालीं दिली आहेत. ज्ञान हें इंद्रियजनित आहे. ज्ञानावरणीय कर्मांच्या क्षमामुळें ज्ञानप्राप्ति होतें, अर्थात ज्ञानप्राप्ति-विद्वत्ता ही कर्माधीन आहे. वातपित्तादिकांच्या-शरीरस्वास्थ्यावर ज्ञान अवलंबून असल्यानें ते विनाशी आहे. पूर्व वयांतील ज्ञान वृद्धापकालीं टिकत नाहीं; तें मलिन होतें, स्मरणशक्ति कमी होते. **साठी बुद्धी नाठी** ही ह्मण प्रसिद्धच आहे.

पूजा-पूज्यता-मानसन्मान-क्षणभंगूर व विनाशी आहेत. मानसन्मान पराधीन आहे. कलहाचें बीज मानसन्मानांत आढळते. असा विचार करावा कीं, इतर केवळ अज्ञानामुळें आपणांस मोठेपण देतात. आपल्यापूर्वींच्या कित्येक सन्माननीयांची काय दशा झाली आहे ! राजकीय क्षेत्रांत तर हा अनुभव पदोपदीं येतो. जाती व कुळ याबद्दल गर्व धरूं नये. कारण आपण असा विचार करावा कीं, यापूर्वींच्या भवांत मी

कोण होतो कोण जाणे ! घाणेरडा डुक्कर, हिंस्र व्याघ्र, सिंह अगर भिल्लादि जातींतही माझा जन्म झाला नसेलच असें नाहीं. शुभ कर्मांच्या उदयामुळें मनुष्ययोनींत आपला जन्म झाला आहे. आयुमर्यादा संपल्यानंतर फिरून आपला जन्म कोणत्या योनींत होईल कोण जाणे !! संतति, संपत्ति, धनधान्य व दागदागिनें इ. ही क्षणभंगुर आहेत. लक्ष्मी चंचळ आहे. हा अनुभव आजचा नाहीं. साम्राज्यपदहि धुळीस मिळतें. अशाच विचारसरणीचें अवलंबन केल्यास संपत्तीचा गर्व कां धरूं नये, याचा बोध होईल. कुंतीच्या कौमार्यावस्थेंत तुझा जन्म झाला आहे असें दानशूर व पराक्रमी कर्णास हिणविलें असतां, त्या उदारधी महाभागानें दिलेलें बाणेदारपणाचें उत्तर सर्वश्रुतच आहे. 'दैवायुक्तं कुलं जन्म, मदायत्तनु पौरुषम्'. चांगल्या अगर वाईट कुळांत जन्म घेणें ही गोष्ट दैवाधीन आहे. जन्मजात मोठेपणा व कर्तृत्वानें व गुणानें मिळविलेला मोठेपणा यांत नेहमीच द्वंद्व आहे. जैनधर्म हा गुणोपासक असल्यानें तो जन्मजात मोठेपणाकडे—कुल व जातीकडे दुर्लक्ष करून त्यांचा गर्व धरूं नका असें सांगतो.

गर्वत्यागाचा दुसराहि मोठा इष्ट परिणाम म्हणजे समताभाव. संपत्तीचा गर्व नष्ट झाला कीं, श्रीमान व गरीब हा भेदभाव नष्ट होईल. विद्वान व अविद्वान, रोगी व सशक्त, सौंदर्यवान व कुरूप इत्यादि इ. भेद नष्ट झाल्यास विश्वबंधुत्त्वाचें व समतेचें नाते निर्माण होईल. गर्व सोडा, अभिमान सोडा, अहंकार धरूं नका; असा उपदेश अनेक साधू-संत करीत आले असतांहि त्यापैकीं एक ना अनेक प्रकारच्या गर्वांच्या मगरमिठींतून सुटणें प्रायः फारच थोडक्यांना शक्य झालें आहे. सामाजिक स्वास्थ्य विचारांत घेऊन गर्वाला धार्मिक संस्थेंत जागा दिली गेली व जैनधर्मानें तर गर्व न सोडाल तर तुह्मांला सम्यक्त्वी ह्मणवून घेण्याचा अधिकार नाहीं, असें बजावून सांगितले आहे.

गर्व धरूं नये, याचा अर्थ स्वाभिमान धरूं नये असें मात्र नाहीं. ग्रंथलेखन करून चिरंजीव झालेल्यानींही आपण अल्पमती व अल्पज्ञानी आहोंत, अशी प्रामाणिकपणानें व खरीखुरी कबुली दिली आहे. या कबुलींत केवळ विनयच आहे असें मात्र नाहीं. उत्कृष्ट डॉक्टर झाला तरी तो कायदे-पंडित व शिल्पशास्त्रज्ञ नसण्याचाच संभव अधिक. अर्थातच त्याचें ज्ञान अपुरेंच होय.

शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प कीं मानवा ।
तेंही विघ्नशताभिभूतच असें नाहींच रे वाणवा ॥

या श्लोकार्धांत विद्वत्तेचा गर्व कां धरूं नये याचें हृदयस्पर्शी वर्णन दिलें आहे.

जातिकुल इत्यादिकांचा गर्व कां धरूं नये याबद्दल इतर आचार्य-वचनांची ओळख करून देणें जरूर आहे. आठ प्रकारच्या गर्वाची कारणें कर्माधीन आहेत व त्यामुळें मनाचा समताभाव नष्ट होतो; सबब, जाति-कुलादिकांचा गर्व धरू नये असें आचार्यांचें मत आहे.

आचार्य अमितगति ह्मणतात कीं:—

आचारमात्रभेदेन जातीनां भेदकल्पनम् ।
न जातिर्ब्राम्हणीयास्ति नियता कापि तात्त्विकी ॥

अथवा

गुणैः संपद्यते जातिर्गुणध्वंसैर्विपद्यते ॥

भगवद्गीतेंतहि असेंच ह्मटलें आहे:—

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।

**सारांश:**—शुभ अगर अशुभ, चांगले अगर वाईट आचरणामुळें जातिभेदाची कल्पना मानिली आहे. ब्राह्मणादि जाति अमूकच असें निश्चयानें ह्मणतां येत नाहीं. जो क्षत्रियांचे कर्म करील तो क्षत्रिय. मग तो ब्राह्मण

अगर वैश्य आईबापांच्या पोटीं येवो अगर क्षत्रियांच्या कुळीं त्याचा जन्म होवो, गुणामुळें तो उच्च जातीचा होतो; व ते गुण नाहींसे झाले, कीं तो त्या जातींतून गळतो. वयाच्या चाळीसीपर्यंत शस्त्रधारण केलें म्हणून तो तोंवर क्षत्रिय व नंतर व्यापार करूं लागला कीं तो वैश्य होईल, अगर नीच धंदा करूं लागला तर शूद्रहि होईल, अगर ब्राह्मणांचा धंदा केला तर ब्राह्मणहि होईल. सारांश जाति ही गुणांवर व धंद्यावर आहे. चर्मकाम करितो म्हणून चांभार, रंगाचें काम करितो म्हणून रंगारी इत्यादि इत्यादि.

रविषेणाचार्य पद्मपुराणांत म्हणतात कीं:—

चातुर्वर्ण्यं यथान्यच्च चांडालादिविशेषणम् ।
सर्वमाचारभेदेन प्रसिद्धं भुवने गतम् ॥

**सारांश:**—ब्राह्मण, क्षत्रिय व शूद्रादिक हे भेद-विभाग-या जाति-आचरणावर अवलंबून आहेत, हें सुप्रसिद्धच आहे.

रविषेणाचार्य आणखीहि म्हणतात कीं:—

अनार्यमाचरन् किंचिज्जयते नीचगोचरः ।

आचरणामुळें निरनिराळ्या मानिलेल्या जातींना जैनधर्म कसा ओळखतो अगर खऱ्या जैनधर्मीयानें काय समजावें, याबद्दल पुढील आचार्य-वचन उपयुक्त आहे.

विप्रक्षत्रियविट्शूद्राः प्रोक्ताः क्रियाविशेषतः ।
जैनधर्मे पराःशक्तास्ते सर्वे बांधवोपमाः ॥

**सारांश:**—आचार, आचरण, क्रिया इत्यादिकांच्या भेदामुळें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्रादि भेद मानिले आहेत. परंतु हे जेव्हां जैनधर्म धारण करितात तेव्हां ते सर्व आपल्या भावाप्रमाणें आहेत असें मानावें.

यावरून जैनधर्म धारण करणाऱ्या कोणाहि व्यक्तीस जैनधर्मांतील सर्व अधिकार प्राप्त होतील. एका अंगाच्या पालनामुळें यमपाल चांडाळ देवा-

दिकांच्या पूजेस पात्र ठरला आहे. अर्थात् धर्मानें त्याला मान्यता दिली. जैनधर्मीय आपली त्याला मान्यता देवोत अगर न देवोत जैनधर्म हा उदार आहे; परंतु त्या धर्माचे अनुयायी ह्मणविणारे आम्ही अनुदार झालों आहोंत.

येथें आणखी एक अशी शंका घेण्यांत येईल कीं, आचार्य अमितगतींच्या वरील श्लोकांत **जातीनां भेदकल्पनम्** या शब्दप्रयोगांतील 'जाति' या शब्दाचा अर्थ तरी काय ? आचार्य समंतभद्रहि ' जाति ' या शब्दाचाच उपयोग या श्लोकांत करितातच कीं नाहीं ? या शंकेचे उत्तर यापुढें दिलें आहे. जाती या शब्दाच्या अर्थाचा खुलासा खालील श्लोकावरून होईल.

**न विप्राविप्रयोरस्ति सर्वथा शुद्धशीलता ।**
**कालेनानादिना गोत्रे स्खलनं क न जायते ॥**
**संयमो नियमः शीलं तपो दानं दयादयः ।**
**विद्यन्ते तात्विका यस्यां सा जातिर्महती मता ॥**

**सारांश**:—संयम, नियम, शील, तप, दान इत्यादि गुण ज्यांचे अंगीं आहेत, अशा लोकांच्या समुदायाला उच्च-जातीय असें समजलें जावें.

दुसऱ्याही एका दृष्टीनें विचार कर्तव्य आहे. प्रथम तीर्थंकरांचे वेळीं ब्राह्मणवर्ग अस्तित्वांत नव्हता. भरतेश्वरानें हा वर्ग निर्माण केला. यासंबंधीं आदिपुराणांत दिलेली माहिती विचारार्ह आहे. राजा भरतानें राजदरबारीं इष्टमित्रासह येण्याबद्दल नागरिकांना आमंत्रण दिलें. आमंत्रितांत क्षत्रिय, वैश्य व शूद्र **पुरुषच** होते. अंकुर तुडवून सभास्थळीं गेलें त्यांना भरतेश्वरांनीं घालवून दिले व जे अंकुर न तुडवितां बाहेर राहिले, ते विचारी आहेत, असें ठरवून त्यांना ब्राम्हण ठरविलें. यावरून आमंत्रित लोकांपैकीं अंकुर तुडवून न जाणाऱ्यांत त्यावेळचे क्षत्रिय, वैश्य व शूद्र होते व त्या सर्वांना ब्राम्हण बनविण्यांत आलें व त्यांना यज्ञोपवीत घातलें. पुरुषच आमंत्रित होते व त्यांनाच ब्राम्हण ह्मटलें. स्त्रिया ब्राह्मणी कशा झाल्या ? शिवाय ब्राम्हण

इतरांशीं विवाह करीत नव्हते असेंहि नाहीं. यावरून स्पष्ट दिसतें कीं भर-तेश्वरांनीं ब्राम्हणवर्ग निर्माण केला व तसें करितांना ज्यांच्या अंगांत विवेक होता, तेच ब्राम्हण झाले. गुणांकडेच भरतेश्वरांनीं पाहिलें. यावरूनही जाती ही जन्मावर अवलंबून नाहीं; ती गुणावर अवलंबून आहे, हें उघड आहे. तसेंच त्यापूर्वी ब्राह्मण हा वर्गहि अस्तित्वांत नव्हता, हेंहि उघड होतें.

आणखी एका मुद्याचा ओझरता उल्लेख करणें जरूर आहे. एखाद्याचें आईबाप अगर आप्तसंबंधीयांनीं दूषणाई असें कृत्य केलें तर तो दोष पुत्र-पौत्रादिकांना राहतो ? आदिपुराण पर्व ४० वरून या प्रश्नाचें नाहीं असेंच उत्तर द्यावें लागेल. दूषणाई आईबाप अगर आप्तेष्ट यांचें पूर्वज कसे होते, हें पहावे, तसेंच जन्म कर्माधीन असल्यानें पुत्रपौत्रांना आईबापांच्या दोषाबद्दल जबाबदार धरणें धर्म, व्यवहार, नीति व न्याय यांना मान्य होणार नाहीं. ' मनुष्यजातिरेकेव '–सर्व मानवी प्राण्यांची जात एकच व ती मनुष्य जाति अगर गुणभद्राचार्य म्हणतात—

' नास्ति जातिकृतो भेदो मनुष्यानांम गवाश्ववत् ' गाय व घोडा यांच्या शरीर रचनेंत जसा फरक आहे, तसा फरक मानवी प्राण्यांत नाहीं, म्हणून मनुष्य **जात** ही एकच जाति आहे.

सागारधर्मामृत अध्याय सातवा श्लो. सं. २०—

**ब्रह्मचारी गृही वानप्रस्थो भिक्षुकश्च सप्तमे ।**
**चत्वारोऽमी क्रियाभेदादुक्ता वर्णवदाश्रमाः ॥ २० ॥**

**अर्थः**—ज्याच्या त्याच्या कर्मभेदानें जसे चार वर्ण ( क्षत्रिय, ब्राम्हण, वैश्य व शूद्र ) सांगितले, त्याचप्रमाणें कर्मभेदामुळें (१) ब्रम्हचारी, (२) गृहस्थ, (३) वानप्रस्थ व (४) भिक्षु असें चार आश्रम होतात.

यावरून पं. आशाधर क्षत्रियादि चार वर्ण वा जाति जन्मावरून ठरवीत नाहींत तर कर्मावरून चार वर्ण ठरवितात. गृहस्थ अगर वानप्रस्थ या आश्रम

संस्था कर्मावरून ठरविल्या आहेत. त्याचप्रमाणें चार वर्णांचे अस्तित्वही ते कर्मावरूनच मानतात.

या व अशा उहापोहामुळें प्रस्तुत लेखक सुधारक व धर्म बुडव्या आहे असा आहेर होणार, हें जाणूनही जें प्रामाणिकपणानें सत्य वाटलें तें विचार वाचकापुढें ठेविलें आहेत. हंसक्षीर न्यायानें या कृतीकडे पहावें.

आपल्या मताला अनुकूल तेवढीं आचार्यवचनें घेतलीं आहेत, असा आक्षेप येण्याचा दृढ संभव आहे..आचार्यवचनांतच मतभेद असल्यास त्या मतभेदाच्या मुळाशीं जाणें जरूर आहे. या मतभेदाचें एक प्रमुख कारण म्हणजे देश व काल परिस्थिती होय.

श्रीबसवेश्वरांनींही जातिभेद न मानण्याचाच उपदेश केला. बसवेश्वराच्या वेळीं जातिभेदाच्या बळावर इतरांचा छळ होत होता व त्या छळाला कंटाळलेल्यांनीं जातिभेदविरहित बसवेश्वरांचें अनुयायित्व पतकारिलें व बसव संप्रदायक झाले.

मूळच्या वैदिक धर्मातील स्थित्यंतराचा इतिहासही हेंच सांगतो कीं- देश, काल व परिस्थितीमुळें यज्ञप्रधान वैदिक धर्मांचें मूळचें स्वरूप पार पालटून जाऊन काल, मान व देश परिस्थितीच्या प्रभावाचा आजचा हिंदुधर्म आहे.

सत्य, चिरंतन व सनातन धर्म म्हणजे रत्नत्रयादिक. रत्नत्रयादिकांचा पालक अमूक जातीचा वा वर्णाचा अगर कुळाचा असला पाहिजे असा निर्बंध नाहीं.

वरील सर्व विवेचनाचा निष्कर्ष एकच दिसतो व तो हा कीं जैनधर्म गुणोपासक आहे. सर्व मानवीप्राण्यांची जात एक; त्यांत जन्मजात उच्चनीच असा भेदाभेद नाहीं. कर्मामुळें भेदाभेद उत्पन्न होतात.

## गर्व त्याग कां करावा ?

**स्मयेन योऽन्यानत्येति धर्मस्थान् गर्विताशयः ।**
**सोऽत्येति धर्ममात्मीयं न धर्मो धार्मिकैर्विना ॥२६॥**

**अन्वयार्थः—** (यः) जो ( गर्विताशयः ) गर्विष्ट ( स्मयेन ) गर्वानें ( अन्यान् ) दुसऱ्या ( धर्मस्थान् ) धार्मिकानां ( अत्येति ) तिरस्कारानें पाहतो ( सः ) तो ( आत्मीयं ) आपल्या स्वतःच्या ( धर्मं ) धर्माचा ( अत्येति ) तिरस्कार करितो. ( धर्मः ) धर्म ( धार्मिकैः विना ) धार्मिक लोकाशिवाय ( न ' भवति ' ) राहूं-टिकू-शकत नाहीं.

**अर्थः—** मागील श्लोकांत सांगितलेल्या आठ प्रकारच्या गर्व-मदापैकीं कोणत्याही एक अथवा अनेक गर्वामुळें जेव्हां रत्नत्रयसंपन्न अशा धार्मिकांची अवज्ञा, मानखंडना होते तेव्हां ती अवज्ञा, अवहेलना, अपमान अगर मानखंडना त्या व्यक्तीची नसून ती रत्नत्रय धर्माचीच होते म्हणून गर्व व अभिमान सोडावा. धार्मिक लोकाशिवाय धर्माचें अस्तित्वच राहत नाहीं. जे धार्मिक आहेत त्यांचा धर्म आत्म्यांत असतो. धर्माला दुसरी जागा नाहीं. गर्वामुळें जो धार्मिकाची अवज्ञा करितो तो धार्मिकाच्या देहाचीच अवज्ञा करितो असें नाहीं तर त्याच्या धार्मिक आत्म्याची-धर्माची-अवज्ञा करितो. पूर्व जन्मींच्या शुभ-कर्मोदयानें मनुष्याला धनदौलत, विद्या, शरीर संपदा इत्यादिकांचा लाभ होतो परंतु हा कार्यकारणभाव न कळल्यानें त्याचा अनिष्ट परिणाम असा होतो कीं त्याला देवधर्मांचा, साधुसंताचा व गुणी लोकांचा विसर पडतो. गर्वाच्या भरांत तो धर्म व साधुसंतादिकांचा अविनय करितो. समता, बंधुभाव नष्ट होऊन ' मी ' ची त्याला बाधा होते. संपत्तीचा उपभोग घेण्यांत त्याला ' मी ' च्या बाधेपासून दूर राहतां येत नाहीं. ' मी ' मंदिर बांधविलें, ' मी ' मोठी पूजा केली. ' मी ' अन्नदाता आहे. शास्त्री-पंडित व विद्वान लोक ' माझ्या ' घरचा उंबरठा झिजवितात. हें सर्व 'माझ्या'

संपत्तीचें दास व गुलाम आहेत, असा गर्व त्यास होतो. यामुळें धर्म व धार्मिक यांची अवहेलना होते. '**गर्वाचें घर खालीं**' ही म्हण प्रसिद्धच आहे. लक्ष्मी चंचल व त्याप्रमाणेंच इतरही गर्वाच्या बाबी क्षणभंगुर व विनाशी आहेत. अखेर गर्वाचें घर खालीं हा अनुभव येतोच येतो.

आचार्य समंतभद्र यांच्या वरील श्लोकांतील **न धर्मो धार्मिकैर्विना** या वचनांतील विचारसरणीला सदृश अशी विचारसरणी आचार्य पद्मनंदी यांच्या श्रावकाचारांतील श्लो. सं. ५ मध्यें पहावयास मिळते.

संप्रत्यपि प्रवर्तेत धर्मस्तेनैव वर्त्मना ।
तेनैतेऽपि च गण्यन्ते गृहस्था धर्महेतवः ॥ ५ ॥

**सारांशः**—वर्तमानकाळांत-कलिकालांत-सर्व लोक एकदेश धर्ममार्गानें चालले आहेत. यासाठीं गृहस्थी हेंच धर्मसंरक्षण व वृद्धि यांचें आधारस्तंभ आहेत. गृहस्थी-श्रावक-हेंच धर्माचें विद्यमान कलियुगांत आधारस्तंभ आहेत असें म्हटल्यानें आधारस्तंभाचा हा मान मुनीजनांकडून काढून घेतला आहे असें नाहीं; तर निर्ग्रंथ मुनींचा आचारही 'सकल' राहणार नाहीं. तोही स्थूलमानानेंच राहील, असा भावार्थ आहे.

जैन जनसंख्या मोठी घेऊन काय करायचें ? आदर्श पण मोजके लोक राहिले तरी जैनधर्म नष्ट होणार नाहीं, अशी विचारसरणी वादाचे भरांत मांडली जाते; परंतु हें कृत्य आत्मघातकीपणाचें आहे. ७ कोटी जर्मनांतून एकच हिटलर अगर १५ लाख जैनांतूनहि एकच मुनी शांतिसागर हीच संख्या अधिक असती तर एकापेक्षां अधिक शांतिसागर अगर जैनसमाजांतील नामवंताची संख्या खास वाढली असती. पण याचा विचार करतो कोण ? कलियुगाचा आरंभ कोणता याबद्दल विद्वानामध्यें तीव्र मतभेद आहे. ११०० ते ५५०० वर्षांपूर्वी हा युग सुरू झाला असा तीव्र भेद आहे. विद्यमान काळांत खरा निर्ग्रंथधर्म आढळ होणार नाहीं, या विधानावर सर्वस्वी विश्वासच

ठेवणेचा झाल्यास अंधश्रद्धेचाच आश्रय करावा लागतो. धर्मश्रद्धा व धर्मानु-चरण ही वाढत जात असल्याचें दिसत असतां कलियुगाची सबब पोकळ आहे; असें आम्हांस तरी वाटतें. तथापि धर्मप्रसाराच्या आधुनिक साधनांचा उपयोग अधिक जोराचा व प्रयत्नशील होणें जरूर आहे.'

## न धर्मो धार्मिकैर्विना या वचनाचा अधिक खुलासा.

या प्रयत्नाचे हस्तलिखित छापखान्याकडे छपाईसाठीं धाडल्यानंतर ता. ३१।७।४२ च्या केसरीच्या अग्रलेखांत 'न धर्मो धार्मिकैर्विना' या वचनाच्या समान अर्थाचें वचन पहावयास मिळालें. तें वचन व त्यासंबंधीं केसरीकरांचें विवेचन खालीं दिलें आहे.

या लेखाचा मथळा हिंदुमहासभा व हिंदुत्वरक्षण हा असून कु. रानडे-शर्फी या ब्राह्मण-मुसलमान विवाहाचा निषेध करण्यासाठीं पुणें येथील संस्कृति संरक्षक मंडळातर्फे भरलेल्या सभेंत बॅ. सावरकर यांच्यावर घेतलेल्या आक्षेपाच्या खंडनार्थ हा केसरींतील लेख आहे.

केसरीकार लिहितात कीं-" धर्मो रक्षति रक्षितः " या वाक्याचें मर्मच सनातनी व रूढिप्रिय मंडळीच्या लक्षांत येत नाहीं. समाजाचें धारण करून धर्म हा समाजाचें रक्षण करितो हें खरें आहे; तथापि धर्म हा समाजाचें रक्षणाला समर्थ होण्याला समाजाकडून त्या धर्माचें रक्षण झालें पाहिजे; आणि धर्माचें रक्षण करावयाचें म्हटल्यास त्या धर्मावर कोणतें संकट, कोणीकडून ओढवत आहे, याची आधी यथार्थ कल्पना झाली पाहिजे. हिंदुधर्माचार्यांनीं पूर्वी हीं संकटें कशीं टाळली याचें विवेचन पुढीलप्रमाणें आहे.

' तथापि हें करीत असतांनादेखील आपली मर्मस्थानें ओळखून हिंदु-धर्माचार्यांनीं आपल्या चालीरीतींत अवश्य ते फेरफार करून बहुजन समाजास परधर्म स्वीकारापासून परतविलें, आणि परधर्मांत गेलेल्यांना परत स्वधर्मांत घेण्यासाठीं शुद्धि करण्याचा मार्ग अवलंबिला. यावरून धर्मातील आचार-

विभाग अपरिवर्तनीय नसून तो परिवर्तनीय आहे व असें परिवर्तन करावें लागतें ' इत्यादि.

यावरून परधर्म स्वीकार करून अगर अन्यरीतीनें आपल्या धर्मानुयायांची संख्या कमी झाली तरी होईना कां ! मूठभर व मोजके लोक राहिले तरी धर्म हा टिकणारच असें हिंदुधर्माचार्यांना वाटलें नाहीं. जैनाचार्यांची तशी भिन्न विचारसरणी ती कुठें आहे ! जैनाचार्यांनीं इतरांना जैनधर्मानुयायी केलें. शुद्धिकरण केलें व इतर न्यायमार्गांचें अवलंबन करून जैनधर्मानुयायांची संख्या वाढविली. मूठभर व मोजके लोक असले तरी पुरे अशा घातुक विचाराचा त्यांच्या विचारी मनाला स्पर्शहि झाला नाहीं. त्या विचारसरणीचें फळ त्या काळीं मिळालें व हल्लींच्या विचारसरणीचीं फळें भोगीत असतांहि आपण मागें वळून पाहूं नये !

## संपत्तीचा गर्व कां धरूं नये ?

**यदि पापनिरोधोऽन्यसम्पदा किं प्रयोजनम् ।**
**अथ पापास्रवोऽस्त्यन्यसम्पदा किं प्रयोजनम् ॥२७॥**

**अन्वयार्थः**—( यदि ) जर ( पापनिरोधः ) पापकृत्यें न होणें ( अस्ति ) आहे तर ( अन्य-संपदा ) धन, कुल इत्यादींची ( किं प्रयोजनम् ) काय जरूरी आहे ! ( यदि ) जर ( पापास्रवः ) पापकृत्यें ( अस्ति ) आहेत ( 'तर्हि' ) तर ( अन्यसंपदा ) दुसरी संपत्तीची ( किम् प्रयोजनम् ) काय जरूरी आहे !

**अर्थः**—अशुभास्रवाचा निरोध ( संवर ) झाला तर कुल व इतर धनदौलत इत्यादिकांची किंमत ती काय ! या उलट अशुभास्रवाचा निरोध न होईल तर उत्तम कुलांतील जन्म, अफाट संपत्ति, ऐश्वर्य, शरीरसंपत्ति इत्यादि व्यर्थ होत. त्यांची किंमत मुळींच नाही. पापास्रव बंद न झालें तर इंद्रियजनित सुखाला काय करावयाचें ! पापास्रव बंद झाले तर त्यामुळें

शाश्वत, चिरंतन व अविनाशी अशी मोक्षलक्ष्मी मिळणारी आहे. मोक्षलक्ष्मी मिळत असतां ऐहिक सुखाची किंमत ती काय ? आज लक्षाधीश तर उद्या भिक्षाधीश अशी उदाहरणें थोडथोडकी नाहींत. दिवे लावण्याच्या वेळीं घर झाडूं नये, कारण बाहेरून येणाऱ्या लक्ष्मीला झाडल्यासारखें होतें; व आंत असलेलीला बाहेर लोटल्यासारखें होतें. ही समजूत लक्ष्मीच्या चंचलपणाची साक्ष देण्यास पुरेशी नाहीं ? आपल्यापेक्षां श्रीमताकडे पाहून त्याच्या इतकी संपत्ति आपल्याजवळ नाहीं म्हणून आपण दुःख मानितो. या उलट आपल्यापेक्षां गरिबाकडे पाहून आपणांस सुख होतें. अर्थातच ही भावना सुख व दुःख मिश्रित व अनिश्चित आहे. अशा अस्थिर मोठेपणाला स्थिर समजून गर्व वाहणाऱ्यांना संपत्तीचा अभिमान धरूं नका असें सांगितलें आहे. वैराग्यभावना उत्पन्न करण्यासाठीं हा उपदेश आहे. जगांतील संपत्ति मिळाली परंतु आत्म्याचा घात झाला तर ती संपत्ति काय कामाची ? आत्महितच खरी व सर्वश्रेष्ठ संपत्ति आहे.

महाकवी वादीभसिंह यांनीं संपत्तीचा गर्व धरणाऱ्यांचें स्वभावचित्र खालील श्लोकांत यथार्थ दिलें आहे.

> न शृण्वन्ति न बुध्यन्ति न प्रयान्ति च सत्पथम् ।
> प्रयान्तोऽपि न कार्यान्तं धनांधा इति चिन्त्यताम् ॥ २–५६ ॥

**सारांश:**—धनांध लोक आपला मतलब साधण्यापुरता कानाचा उपयोग करितात. सत्य काय आहे, याचा विचार करण्याचा श्रीण ते मेंदूला देत नाहींत. कल्याणप्रद मार्गानें चालत नाहींत. ते ऐकतात, विचार करितात व वागतात परंतु हें सर्व केवळ आपल्या मतलबापुरतेंच असतें.

संपत्तीचा गर्व कां धरूं नये, याबद्दलचें वरील विवेचन वाचून संपत्ती ही वमनासमान आहे, असें समजणें मात्र साफ चुकीचेंच होईल. प्रत्येकानें चार पुरुषार्थ साधावयाचे आहेत. या पुरुषार्थांत अर्थ हा एक पुरुषार्थ आहे.

अर्थपुरुषार्थ संपादन करावा, मात्र तो धर्मावर अधिष्ठित असला पाहिजे. अर्थाला-संपत्तीला-परिग्रहाला-मर्यादा घातली पाहिजे व मर्यादेत ठेविलेल्या संपत्तीबद्दलही गर्व वाहूं नये.

### जाति-कुलादिकांचा गर्व कां धरूं नये ?

**सम्यग्दर्शनसम्पन्नमपि मातंगदेहजम् ।**
**देवा देवं विदुर्भस्मगूढांगारान्तरौजसम् ॥ २८ ॥**

**अन्वयार्थः**—( देवाः ) देव ( सम्यग्दर्शन संपन्न ) सम्यग्दर्शनानें युक्त ( मातंगदेहजं अपि ) चांडाळाला देखील ( भस्मगूढांगारान्तरौजसं ) राखेमध्यें झांकलेल्या विस्तवाच्या प्रकाशाप्रमाणें निर्मल व ( देवं ) पूजा करण्यास योग्य असें ( विदुः ) म्हणतात.

**अर्थः**— मांग जातीच्या आईबापांच्या पोटी जन्मून एखादा जर सम्यग्दर्शनी झाला तर देवांच्याही पूजेला तो पात्र होतो. राखेनें झांकलेल्या अग्नीचें खरें स्वरूप न दिसल्यानें आपण त्याला राख समजतो; परंतु वरील राख काढल्यानंतर आंत खऱ्या अग्नीचें स्वरूप आपणांस दिसून येते. तद्वतच सम्यग्दर्शनधारी चांडाळ बाहेरून चांडाळ दिसतो परंतु त्याच्या अंतरंगांत सम्यक्त्वाची झांकलेली प्रदीप्त ज्योत असतें; यामुळें देवही त्याची पूजा करितात. अर्थात देवही त्याला आपल्यापेक्षां श्रेष्ठ मानितात. यावरून **जाति** अगर कुल हीं पूज्यतेला नेण्यास कारण नसून **गुण** हेंच कारण आहेत. यासाठींही जातीचा अगर कुळाचा गर्व धरूं नये. तसेंच यापूर्वीच्या भवांत आपण कोण व काय होतो व पुढील भवांत आपण कोणत्या योनींत जन्म घेऊं कोण जाणें! इत्यादि विचार करितां जाति व कुळांचा गर्व धरणें व्यर्थ आहे. विख्यात उदारधी कर्ण याची जन्मकथा सुप्रसिद्ध आहे. त्याला उद्देशून कर्ण म्हणाला आहे कीं ' दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् ' सारांश जन्माला कुठें यावयाचे हें दैवाच्या-कर्माच्या-स्वाधीन आहे, परंतु

पौरुषार्थ करणें हें आपल्या हातीं आहे. जन्म कर्माधीन आहे, हेंच कर्णानें सांगितलें आहे; व अशा पराधीन व कर्माधीन गोष्टीबद्दल गर्व धरूं नये असेंही त्यानें सांगितलें आहे.

## आचार्य अमितगति-यांचे विचार.

जाति, कुलादिकाचा गर्व कां धरूं नये याबद्दल आचार्य अमितगति यांचे विचार वाचकांपुढें ठेवणें इष्ट आहे असें वाटल्यानें त्यांतील महत्वाचा भाग खालीं दिला आहे. सप्तम परिच्छेद श्लो. संख्या ३४ पासून पुढील कांहीं श्लोकांत आचार्यांचें विचार पहावयास मिळतात. श्लोक संख्या ३७ व ३८ मध्यें आचार्य लिहितात कीं आपल्यापेक्षां श्रीमंत, उच्चकुलीन इत्यादि-कांना पाहून आपणांस दुःख होते व आपल्यापेक्षां खालच्या दर्जाच्या लोकां-कडे पाहून आपणास सुख होते. याप्रमाणें मोहि जीव एकाचवेळीं सुख-दुःखाचा अनुभव घेत असतो. यासाठीं जात्यादिकांचा गर्व धरूं नये.

श्लोक संख्या ३९ मध्यें आचार्य लिहितात कीं उच्च अगर नीच यांचे '।निदान ' परीक्षा करण्याचा प्रयत्न करणारा कुबुद्धी होय; वाळू गाळून तेल काढण्याच्या प्रयत्नासारखाच हा निष्फळ व हास्यास्पद प्रयत्न आहे. सारांश उच्च कोण व नीच कोण याची पारख करणेंच व्यर्थ व निष्फळ आहे. सत्पु-रुष हा प्रयत्न करणार नाहीं. श्लोक ३५ मध्यें आचार्य लिहितात कीं, निगो-दादि नीच पर्यायांत जीवाचें वास्तव्य अनंत-काल असतां चुकून केव्हां तरी उच्च कुळांत तो जन्म घेतो. संसारांत असतां अंगांत कोणताही सद्गुण नसतां केवळ उच्च कुलांत जन्म झाल्याचा अभिमान बाळगणें पापमूलक आहे. आचार्योनीं गुणाला-कृतीला-प्राधान्य दिलें आहे; जन्माला दिलेलें नाहीं. श्लोक ३६ मध्यें आचार्योनीं लिहिलें आहे कीं उच कुळांत जन्म झालेल्याचा जीव उच्च-निराळा-असतो व नीच कुळांत जन्म झालेल्याचा जीव नीच--भिन्न-असतो असें मुळींच नाहीं, परंतु अभिमानाची-गर्वाची बाधा झाल्यानें मी उच्चकुलीन आहे व दुसरा नीचकुलीन आहे, असें

अज्ञानामुळें समजलें जातें; ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. वरील विचारसरणी विचारांत घेतल्यास उच्च व नीच असा भेदभाव करून गर्व वाहणें पाप आहे, असें दिसून येईल.

## महावीरवाणी.

मे १९४२ च्या महावीरजयंतीच्यावेळीं 'सस्ता साहित्यमंडळ, नवी दिल्ली' या ग्रंथप्रकाशक संस्थेनें **महावीरवाणी** या नांवाचें एक उत्कृष्ट पुस्तक हिंदींत प्रसिद्ध केलें आहे, त्यांत पान १५१ वर **जाती** ही जन्मावर अवलंबून नसून ती कर्मावर अवलंबून आहे, असेंच स्पष्ट मत दिलें आहे. तें असें:--

कम्मुणा बंभणो होइ, कम्मुणा होइ खत्तिओ।
वइसो कम्मुणा होई, सुद्दो हवइ कम्मुणा॥

**हिंदी अर्थः**—मनुष्य कर्मसेहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र होता है. अर्थात् वर्ण-भेद जन्मसे नही होता। जो जैसा अच्छा या बुरा कार्य करता है, वह वैसाहि उँचा नीचा हो जाता है।

**मराठी अर्थ:**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे कर्मावरून ठरतात. वर्णभेद जन्मावर अवलंबून नाहीं. सत्कृत्य अगर दुष्कृत्य यामुळें उच्च अगर नीच होतो.

यापूर्वी निरनिराळीं आचार्यवचनें देऊन जाति या जन्मावर अवलंबून नाहींत व चक्रवर्ति भरतेश्वरांनींच प्रथम ब्राह्मण या नांवाची जात अगर वर्ग निर्माण केला, त्यापूर्वी क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे तीनच वर्ण अगर या जाति होत्या हे आदिपुराणांतील कथेवरून दाखविलें आहे. सूज्ञ वाचक या चर्चेचा योग्य तो विचार करतील अशी आशा आहे.

## धर्म (पुण्य) अधर्म (पाप) यांचीं फलें.

**श्वाऽपि देवोऽपि देवः श्वा जायते धर्मकिल्बिषात्।**
**काऽपि नाम भवेदन्या सम्पद्धर्माच्छरीरिणाम्॥२९॥**

अन्वयार्थः—( धर्मकिल्बिषात् ) धर्म आणि पाप यांच्यामुळें ( श्वा अपि ) कुत्रादेखील ( देवः ) देव, आणि ( देवः अपि ) देवसुद्धां ( श्वा ) कुत्रा ( जायते ) होतो ( शरीरिणां ) शरीरधारियांची अर्थात् संसारी जीवांची ( कापि नाम ) खरोखर वाणीला अगोचर अशी ( धर्मात् अन्या ) धर्मापेक्षां दुसरी ( सम्पत् ) संपत्ति ( भवेत् ) आहे कां ?

अर्थः—धर्मानुसार आचरणामुळें पशुयोनींतील कुत्राही स्वर्गलोकीं—देवयोनींत—जन्म घेतो व या उलट पापाचरणाच्या प्रभावामुळें स्वर्गांतील देवालाही पशुयोनींत व कुत्र्याच्या जातींत—जन्म घ्यावा लागतो. प्राणिमात्राला धर्माचरणाच्या बळावर अतर्क्य असें ऐश्वर्य व मुक्ति-लक्ष्मी मिळतें. मिथ्या-त्वामुळें दुसऱ्या स्वर्गापर्यंतच्या देवांना एकेंद्रिय जीवयोनींत व त्यापुढील स्वर्गांतील देवांना पंचेंद्रिय योनींत जन्म घ्यावा लागतो.

श्लोक संख्या २८।२९ मध्यें खरें सुख धर्माचरणानें वागल्यामुळें मिळतें. जातीचा व कुलाचा अभिमान धरूं नये असें आचार्यांनीं सांगितलें आहे. वैदिक धर्मानेंहि तंतोतंत याच विचारसरणीचें अवलंबन केलें आहे. गीतेंतील यासंबंधींचे विचार पुढीलप्रमाणें आहेत. कृष्ण अर्जुनाला सांगतात कीं—

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ९३२ ॥

भावार्थः—ज्यांनीं माझा आश्रय केला, जे मला अनन्यभावानें शरण आले, ते नीच कुलांत जन्मलेले असोत, ते वैश्य असोत, शूद्र असोत अथवा ते कोणीही असोत, ते परम गतीला पोहोंचतात.

तात्पर्य—जाति, कुल, लिंग भेदादि मी पहात नाहीं. ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांना आपल्या उद्धाराचा मार्ग मोकळा आहे; शर्त मात्र ही कीं, मृत्युलोक अनित्य व दुःखदायक आहे हें जाणून चित्तीं वैराग्य धारण केलें पाहिजे.

वरील भावार्थांत जाड अक्षरानें जे शब्द दाखविले आहेत त्यापैकीं **माझा** या शब्दाऐवजी **धर्माचा**, **मला** या ऐवजी **धर्माला** व **मी** या ऐवजी **धर्म** असें वाचल्यास गीतेच्या व श्रावकाचाराच्या विचारसरणींत तंतोतंत मतैक्य असल्याचें दिसून येईल.

गीतेंतील नववा अध्याय अत्यंत महत्वाचा आहे. या अध्यायांत भक्ति व ज्ञान यांची एकरूपता केलेली आहे. अध्याय ९ श्लोक २६ मध्यें शुद्ध-चित्तानें व भक्तिभावानें पान, फूल किंवा नुसतें पाणी जरी देवाला अर्पण केलें तरी त्याचा उद्धार होतो, असें सांगितले आहे व अध्याय ९ श्लोक संख्या ३० यांत पापाचें प्रायश्चित घेऊन धर्माचरणानें वागणाऱ्याची साधूंत गणना केली आहे. एकवार पातकी अगर पतित झाला तर तो आजन्म पतितच झाला असें कोणताही धर्म मानीत नाहीं.

भगवद्गीतेंतील वर ज्या तीन श्लोकांचा सार दिला आहे, यावरून 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टम्' म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असें चार प्रकारचें वर्णभेद मानणाऱ्या गीतेंतही जातीला, कुलाला व धंद्याला महत्व न देतां, ज्याच्या त्याच्या कृत्याला-गुणाला-महत्व दिलें आहे. 'गुणाः पूजा स्थानम् गुणिषु नच लिंगम् नच वयः' या सर्वश्रुत सुभाषितांत गुणालाच मान दिला आहे. वयाकडे, वेषाकडे व पेशाकडे पाहिलेले नाहीं. सत्कर्मानें व धर्माचरणानें वागणाऱ्यास मोक्षाचें दार खुलें ठेविलें आहे, मग तो कोण-त्याही जातीचा अगर धंद्याचा असो. संसार असार आहे, दुःखमय आहे व नश्वर आहे, अशी वैराग्य भावना धरून धर्माला शरण गेल्यानें मुक्ति मिळतें, असें सांगितलें आहे. जैनधर्म तरी याहून निराळें तें काय सांगतो ?

वेद, श्रुति, भगवद्गीता, भागवत अगर अलिकडील ज्ञानदेव तुकारा-मादि साधुसंतांचें लिखाण यांतील महत्वाचें तत्वज्ञान व जैनधर्मीय तत्वज्ञान यांतील समान विचारांचें व आचाराचें वेंचे एकत्रित करून विचारी जनतेपुढें ठेविल्यास केवढी क्रांति होईल ? धर्माबद्दलचा दुराभिमान नष्ट होऊन समता प्रस्थापित होण्यास यामुळें खास मोठी मदत होईल.

भगवान महावीरांना क्रांतिकारक मानण्यांत ज्या अनेक बाबींचा आम्ही अभिमानानें उल्लेख करितो, त्यांतच भगवानांच्या 'मनुष्यजातिरेकैव' या क्रांतिकारक उपदेशाला अग्रस्थान देतो. भगवानांच्या स्याद्वाद नयालाही अत्यंत मोठें महत्वाचें स्थान देतो. या नयाचा आश्रय घेऊन विचार केल्या-सही वरीलच अनुमान दृढ होईल. भगवानांच्या विचारसरणींचा प्राण या श्लोकांत भरलेला आहे.

सम्यग्दर्शनाचे अतिचार अथवा सम्यग्दृष्टींनीं कुदेवादिकांना विनय कां दाखवूं नये ?

**भयाशास्नेहलोभाच्च कुदेवागमलिंगिनाम्**
**प्रणामं विनयं चैव न कुर्युः शुद्धदृष्टयः ॥३०॥**

**अन्वयार्थः**—( शुद्धदृष्टयः ) ज्यांची दृष्टी अर्थात् सम्यग्दर्शन शुद्ध आहे अशा जीवांनीं ( भयाशास्नेहलोभात् ) भय, आशा, स्नेह किंवा लोभ यांच्यामुळें ( कुदेवागमलिंगिनाम् ) कुदेव, कुशास्त्र व कुगुरु यांना ( प्रणाम ) नमस्कार (च) आणि ( विनयं एव ) विनय देखील ( न कुर्युः ) करूं नये.

**अर्थः**—सम्यग्दृष्टींनीं भयानें अगर भीतिनें राजे आदि लोकांना अगर भावि कालांत धनप्राप्ति आदिंचा लाभ व्हावा ह्मणून, मित्रप्रेमामुळें अगर तात्काळ कांहीं फायदा होतो ह्मणून कुदेव, कुशास्त्र व कुगुरु यांना **वंद्य मानून** त्यांना नमस्कार करूं नये.

या श्लोकांत हेतूला प्राधान्य दिलें आहे. विशिष्ट हेतू मनांत धरून कुदेव, कुशास्त्र व कुगुरु यांना वंद्य मानण्याच्या अगर भीतीनें राजादिकांना नमस्कार करण्याच्या कृत्यांचा निषेध केला आहे. यावरून जबरदस्तीनें नम-स्कार करावयास लाविलें, व नमस्कार केला अगर केवळ व्यवहार सांभा-ळण्यासाठीं इतर धर्मियांना नमस्कार केला तर तो नमस्कार निषेधार्ह होणार नाहीं. कारण अशा नमस्कारांत स्वार्थी हेतूचा अभाव असतो. पैशासाठीं,

मानमरातबासाठीं, भीतीमुळें अगर अशीच अन्य स्वार्थ साधण्याच्या हेतुमुळें नमस्कार केलेला नसतो.

नमस्काराचे दोन भेद आहेत. एक व्यवहार नमस्कार व दुसरा निश्चय नमस्कार. शरीरादि बाह्य गोष्टींची प्रशंसा व स्तुती करणें याला व्यवहार नमस्कार म्हणतात. व्यवहार सांभाळण्यासाठीं इतरांना केलेला नमस्कार हा व्यवहार नमस्कार. आत्म्याच्या गुणांची जेव्हां स्तुती करितो, तेव्हां तो निश्चय नमस्कार या सदराखालीं येतो. अरहंत प्रभूंच्या कायोत्सर्ग वा पद्मासन मूर्तीना नमस्कार करणें हा व्यवहार नमस्कार होईल व असाच नमस्कार प्रायः घडतो; परंतु हा नमस्कार खरा नमस्कार नव्हे. अरहंत प्रभूंना नमस्कार करितांना आपल्यासमोर त्यांची प्रतिमा असते; व स्तोत्र म्हणत ज्यावेळीं आपण नमस्कार करितो, त्यावेळीं तो निश्चय नमस्कार होतो. निश्चय नमस्काराचेवेळीं आपण अरहंत प्रभूंच्या ठिकाणीं जें गुण असतात त्या गुणांचें वर्णन स्तोत्रांत असतें व स्तोत्र म्हणत असतां त्या गुणांचें स्मरण होतें व त्या गुणांना आपण नमस्कार करितो. तें गुण आपल्यासमोर असलेल्या प्रतिमेंत आहेत असें समजून या गुणांचें जें दृश्य प्रतीक त्या प्रतिकाला नमस्कार करितो, दगडाच्या मूर्तीला करीत नाहीं.

## अरहंत सिद्धादि पंचपरमेष्टीला तेवढा नमस्कार कां ?

याचें उत्तर थोडक्यांत असें आहे कीं, या पंचपरमेष्टीला नमस्कार सर्वच शुद्धात्म्यासाठीं असतो. पंचपरमेष्टी हे कित्त्यादाखल आहेत. सर्वच शुद्धात्म्यांचे ते प्रतिनिधी आहेत. यामुळें त्यांना केलेला नमस्कार सर्व शुद्धात्म्यांना पोहोंचतो. (१) अरहंत (२) सिद्ध (३) आचार्य (४) उपाध्याय व (५) सर्वसाधू हें पंचपरमेष्टी होत. अरहंतांना नमस्कार असो असें म्हणतांना वर्तमान, भूत व भविष्यकाळाच्या अशा सर्व ७२ अरहंताचा या नमस्कारांत समावेश होतो. अरहंताबद्दल जो विचार तोच विचार इतर परमेष्टीबद्दलही करावयाचा आहे. सर्व हें संख्यावाचक विशेषण साधुपुरतेच नसून तें इतरही

परमेष्ठींना अनुलक्षून आहे असें समजल्यासही वरील विचारसरणी सार्थ आहे असें दिसून येईल. श्लो. नं. १४ खालीं जी शंका प्रदर्शित केली आहे, त्या शंकेचें निरसन वरील विवेचनावरून होईल अशी आशा आहे.

## सम्यग्दृष्टि भित्रा व भिरु असतो? नाहीं.

श्लोक संख्या ३० च्या सुरवातीस आचार्यांनीं भय हा शब्द योजिला आहे. भयाचे प्रकार अगर भेद सात आहेत व सातहि प्रकारच्या भीतीची बाधा सम्यग्दर्शन्याला होत नसते.

(१) इहलोकभयः—याचे दोन अर्थ केले जातात. (अ) लोक-समाज-मानवजात-यांची भीति (ब) इहलोकांतील भीति. कोणताही अर्थ मान्य केला तरी सम्यग्दृष्टीनें निर्भय राहणें जरूर आहे. संसारांत संकटाचे व दुःखाचे अनेक प्रसंग येतात, त्यावेळीं सम्यग्दृष्टी कर्तव्यच्युत होऊन संकटांना शरण जात नाहीं. आपत्तीला तोंड देऊन त्यावर विजय मिळविण्याचा प्रयत्न करितो; तसें न होईल तर कुदेव, कुगुरु व कुशास्त्र यांच्या आहारीं जाण्याचा दृढ संभव असतो. इष्ट वियोगामुळें व अनिष्ट संयोगामुळें आपत्ति व संकटें येतात. ती कर्माधीन आहेत. भोग भोगल्याशिवाय सरत नाहीं, याबद्दल तो निःशंक असतो. प्रयत्नशील व्हा, निराशावादी होऊं नका अशी धर्माज्ञा आहे.

(२) परलोकभयः—सम्यग्दृष्टीचें जीवन पवित्र असतें. मृत्युनंतर नरकवासाच्या यातना भोगाव्या लागतील, ही कल्पनाही त्याच्या मनाला स्पर्श करूं शकत नाहीं. परलोक याचा दुसराही अर्थ संभवतो. मानव जातीखेरीज इतरांची भीति. उदाहरणार्थ सर्पदंशादि.

(३) वेदनाभय—रोग जडेल ही भीति अगर जडलेल्या रोगाची भीति यापासून तो अलिप्त असतो.

(४) मृत्युभय—मरणाची भीति. मरणाला भिऊन तो कर्तव्यच्युत होत नाहीं.

(५) अगुप्तिभय—सम्यग्दृष्टी चोरांची भीति बाळगीत नाहीं. नोकरी जाईल ह्मणून धन्याचीही भीति तो बाळगीत नाहीं. सम्यदृष्टी स्वावलंबी असतो. तो गुलामगिरी पतकरीत नाहीं.

(६) अश्लोकभय—मानमान्यता जाईल ही भीति त्याला नसते. आजचे निंदक उद्याला स्तुतिपाठक होतील असें तो मानितो.

(७) अकस्मात् भय—कोणतेंही कारण नसतां अगर पूर्वसूचना नसतां आलेलें संकट.

जैन हा **वीर** असतो हें ऐतिहासिकदृष्टयाही सिद्ध झालें आहे. (१) **ऐतिहासिक जैन वीर** व (२) **दक्षिणभारत जैन व जैनधर्म** यांचा इतिहास हे यांची साक्ष देण्यास पुरे आहेत.

## सम्यग्दर्शनी भीरूही असतो–पण कोठें ?

सम्यद्दर्शनी पापभीरु असतो. खरा देव, खरा गुरु व खरें शास्त्र यांच्यावर अविश्वास ठेवण्यास तो भितो. सम्यद्दर्शनी सत्याचा चाहता असतो; ह्मणून तो असत्याला भितो. तो सद्दर्शनी असतो; ह्मणून सर्व पदार्थांकडे विकृत दृष्टीनें पाहण्यास भितो.

वर ज्या सात प्रकारच्या भयाची सम्यग्दर्शनी पर्वा बाळगीत नाहीं असें लिहिलें आहे; त्याचें कारण असें कीं हें सर्व कर्मांचें फळ आहे व तें भोगल्या विना सुटत नाहीं, अशी त्याची दृढ समजूत असल्यानें कर्मफळ भोगण्याचें त्यास धैर्य येतें. कर्म भोगल्याविना फिटत नाहीं हें कळल्यानें इहजन्मीं नवीन दुष्कृत्यें केल्यास व अधर्मानें वागल्यास त्यांचीं कटु फळें फिरून भोगावीं लागणारच, ह्मणून तो पापभीरू असतो.

**गांधी विचार दोहन** या पुस्तकांत पान १६ वर अभय या विषयावरील विचार मननीय आहेत ते:—(१) जो आपल्या मनांतील विकारांची भीति न बाळगतां इतर आपत्तींचें भय बाळगतो, त्याच्याकडून अहिंसेचें पालन होणार नाहीं; कारण दैवी संपत्तींत अभय हा श्रेष्ठ गुण आहे.

(२) मरण, धननाश, मानहानी, लोकनिंदा, हालअपेष्टा व इतर दुःखें यांची भीति सदैव असते. भयभीताला धर्माधर्मांचा खोल विचार करण्याची हिंमतच राहणार नाहीं. (३) भित्रा मनुष्य सत्याचा शोध करूं शकणार नाहीं. व सत्याचा शोध लागल्यास त्यास चिकटून राहूंहि शकणार नाहीं. (४) भिण्या-सारखीं एकच वस्तु व ती ह्मणजे स्वतःचें विकारी व पापी चित्त (५) अध-र्मांची, पातकाची व मनोविकाराची भीति धरावी. कारण विकार नसल्यास अधर्म होणार नाहीं व अधर्म झाला नाहीं तर ईश्वराचीही भीति नाहीं मग इतरांची काय कथा ?

या दोन्ही विचारसरणीतील साम्य पटविण्याची यातायात करण्याची जरूरीच नाहीं.

हस्तलिखित तपासीत असतां पं. सुमेरचंद जैन-न्यायतीर्थ यांचा महाकवी वादीभसिंह व त्यांचें **क्षत्रचूडामणि** महाकाव्य संबंधीचा अनेकान्त मधील मननीय लेख वाचावयास मिळाला. त्या लेखांत ' विपत्ति और उसका प्रतिकार ' या मथळ्या खालील महाकवींच्या कांहीं वचनांची वाचकांना ओळख करून देत आहों. महाकवी ह्मणतात—

**विपदः परिहाराय शोकः किं कल्पते नृणाम् ।**
**पावको नहि पातः स्यात्, आतप-क्लेश-शान्तये ॥ १-३० ॥**

**भावार्थः**—संकट निवारण करण्यासाठीं दुःख करीत बसणें उचित नाहीं. दुःख मानत बसल्यानें संकट निवारण होत नाहीं. संकटसमयीं दुःख करीत बसणें ह्मणजे ' आगींतून उठून फोंफाट्यांत पडण्यासारखेंच ' आहे. सूर्याचा ताप लागूं नये ह्मणून अग्नींत उडी टाकणें हें जसें मूर्खपणाचें आहे, त्याचप्रमाणें संकट टाळण्यासाठीं दुःख करणें, हें मूर्खपणाचें आहे.

## प्रतिकारसमर्थ कोण ?

**ततो व्यापत्प्रतीकारं धर्ममेव विनिश्चितु ।**
**प्रदीपैर्दीपिते देशे न ह्यस्ति तमसो गतिः ॥ १-३१ ॥**

**भावार्थः**—संकटांचा प्रतिकार करण्यास धर्म हाच समर्थ आहे. आपल्या खोलींत दिवा आला ह्मणजे अन्धःकार तेथून पळून जातो. जेथें प्रकाश आहे, तेथें अंधःकार राहात नाहीं. तद्वतच ज्याच्या हृदयांत धर्माचा प्रकाश आहे तेथें संकट राहात नाहीं. ह्मणून धर्म हाच संकट दूर करण्याचा खरा व एकमेव उपाय आहे. महाकवी आणखीही ह्मणतात कीं—विपत्तु प्रतीकारो निर्भयत्वं न शोकिता-निर्भय राहण्यानेंच संकट दूर होतें. निर्भय राहणें हा संकट प्रतिकाराचा खराखुरा व एकमेव उपाय आहे.

## संकटाला भितो कोण ?

विपदेपि हि तद्भीतिर्मूढानां हन्त बाधका—विपत्ति व विपत्तिमुळें होणारें दुःख अगर विपत्तीच्या दुःखाची कल्पना, ही मूर्ख लोकांना त्रास देते. प्रतिकाराच्या खऱ्या उपायांचें भान न राहिल्यानें, मूर्ख मनुष्य संकटाच्या भीतीनें जिवंतपणींच अनेकवार मरतो. वीरपुरुष आयुष्यांतीं एकदाच मरतो. भित्रा मात्र आयुष्यांत अनेकवार मरतो. Cowards die many a times befoie their deaths, Valiant taste of death but once ?

## तत्वज्ञानाचें फळ-वा त्याचा परिणाम.

दुःखार्थेपि सुखार्थोहि तत्वज्ञानधने सति ॥३-२१॥

सारांशः—तत्वज्ञानाची संपत्ती जवळ असली ह्मणजे दुःखद प्रसंग अगर संकटें हींच सुखाला कारणीभूत होतात. यावरून सम्यग्दर्शनी भीरु व भित्रा कां नसतो याची कल्पना येईल. ' कर्माधीनं जगत् ' या वचनावर विश्वास ठेवून कर्मफळ भोगण्यास तो तोंड देतो, संकटाकडे तो आपली पाठ फिरवीत नाहीं.

## सम्यग्दर्शनाचे अतिचार.

आचार्य अमितगति यांनीं सम्यग्दर्शनाचे पांच अतिचार खालील श्लोकांत दिले आहेत.

## परिशिष्ट ( २ )

सम्यग्दर्शनाचे पंचवीस दोष
मद ८
मूढता
अनायतन
शंकादिक
लोक देव गुरु
९ १० ११
कुगुरु, कुदेव, कुधर्म, कुगुरुसेवक, कुदेवसेवक, कुधर्मसेवक
१२ १३ १४ १५ १६ १७
ज्ञान, पूजा, कुल, जाति, बल, ऋद्धि, तप, शरीर.
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८
शंका, कांक्षा, विचिकित्सा, अमूढदृष्टि, अनुपगूहन, अस्थितिकरण, अवात्सल्य, अप्रभावना.
१८ १९ २० २१ २२ २३ २४ २५

**शंका कांक्षानिंदा परशंसा संस्तवा मला पंच ।**
**परिहर्तव्याः सद्भिः सम्यक्त्वविशोधिभिः सततम् ॥१६॥**

सारांश:—(१) जिनवचनाबद्दल शंका घेणें (२) भोगाची इच्छा धरणें (३) धर्मात्म्यांची निंदा करणें (४) मिथ्यादृष्टी यांची प्रशंसा करणें व (५) मिथ्यादृष्टी यांची व कुदेवांची स्तुति करणें.

आचार्य समंतभद्र यांनीं श्लोकसंख्या ३० मध्यें सम्यग्दर्शनाचे जे अतिचार दिले आहेत, त्यांच्याशीं वरील अतिचारांची तुलना करितां चिकित्सक वाचकांना यांत थोडाफार फरक दिसेल. तसेंच धर्म-तत्व योग्यरीतीनें समजून घेण्यासाठीं योग्य शंकाही काढूं नयेत असें ह्मणणें बुद्धिवाद्यांना परवडणार नाहीं. ही बौद्धिक गुलामगिरी नाहीं ? जैनधर्म तर बुद्धिवाद्यांचा धर्म आहे. जिनवचनावर नितांत श्रद्धा ठेवूनहि शंका काढण्यानें अतीचार कां व्हावा ?

खरा देव, गुरु व शास्त्र यांचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्या लक्षणाबद्दलच शंका घेणें, याला उद्देशून आचार्य अमितगतींचें हें लिखाण आहे. वाटेल तें वचन जिनवचनच आहे व त्यावर श्रद्धा न ठेविल्यास अतिचार घडतो, असें ह्मणण्याचा त्यांचा आशय नसावा. समंतभद्रांची विचारसरणी विचारांत घेतां सम्यग्दर्शनाला अतिचारच संभवत नाहींत. सम्यग्दर्शनाच्या व्याख्येचें काळजीपूर्वक निरीक्षण केल्यानें या ह्मणण्याची सत्यता पटेल. सप्तम परिच्छेद—श्लोकसंख्या १७ मध्यें अमितगतींनीं अतिचारांची वट्ट संख्या ७० दिली आहे. (१) अहिंसा (२) सत्य (३) अचौर्य (४) परस्त्रीत्याग (५) परिग्रहपरिमाण (६) दिग्व्रत (७) देशविरती (८) अनर्थदंड (९) सामायिक (१०) प्रोषधोपवास (११) भोगोपभोग (१२) दान (१३) सल्लेखना आणि (१४) सम्यग्दर्शन. यापैकीं प्रत्येकाचे पांच अतीचार मानले असल्यानें अतीचारांची वट्ट संख्या १४×५=७० मानण्यांत आली आहे.

यापुढील ११ श्लोकांत सम्यग्दर्शनाचें श्रेष्ठत्व अगर मोक्षप्राप्तीच्या मार्गांत सम्यग्दर्शनाची प्रामुख्यता कां आहे, याचें वर्णन केलें आहे.

**दर्शनं ज्ञानचारित्रात्साधिमानमुपाश्नुते ।**
**दर्शनं कर्णधारं तन्मोक्षमार्गे प्रचक्ष्यते ॥३१॥**

**अन्वयार्थः**—(दर्शनं) सम्यग्दर्शन (ज्ञानचारित्रात्) सम्यग्ज्ञान आणि सम्यग्चारित्र यापेक्षां (साधिमानं) उत्कृष्टपणाला (उपाश्नुते) प्राप्त होतें (तत्) म्हणून (दर्शनं) सम्यग्दर्शन (मोक्षमार्गे) मोक्षमार्गामध्यें (कर्णधारं) कर्णधार अर्थात् प्रधान (प्रचक्ष्यते) सांगितलें गेलें आहे.

**अर्थः**—रत्नत्रयांत सम्यग्दर्शन हें श्रेष्ठ आहे. आचार्यांनीं सम्यग्दर्शनाला सुकाणु धरणाऱ्या नावाड्याची सार्थ उपमा दिली आहे. समुद्राच्या पैलतीरावर नेण्यास उत्कृष्ट नावाड्याची जरूरी असते, त्याचप्रमाणें संसाररूपी समुद्र तरुन जाऊन मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या मार्गांत-ज्ञान व चारित्र-यांत सम्यग्दर्शन हें कर्णधार-सुकाणु-धरणाऱ्या नावाड्याप्रमाणें महत्वाचा मार्गदर्शक आहे. सुकाणू धरणाऱ्या निपुण नावाड्याच्या अभावी समुद्र तरून जाणें जसें अशक्य, तद्वतच सम्यग्दर्शनाच्या अभावीं हा भव-संसार-समुद्र तरून जाणें अशक्य आहे. उमास्वामीनीं 'सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः' असें तत्वार्थसूत्रांत म्हणतांना सम्यग्दर्शनाला प्रथम-श्रेष्ठ-स्थान दिलें आहे. दर्शन, ज्ञान व चारित्र हे तीन मोक्षप्राप्तिचे मार्ग होत. यापुढील श्लोकांत सम्यग्दर्शन हाच मोक्षप्राप्तीचा श्रेष्ठ मार्ग कां याचा खुलासा आचार्यांनीं केला आहे.

सम्यग्दर्शन हें सम्यग्ज्ञान व चारित्र यांचें कारण आहे. सम्यग्ज्ञान व चारित्र हे सम्यग्दर्शनाचे परिणाम आहेत. आचार्य पद्मनंदि आपल्या श्रावकाचाराच्या श्लोक संख्या ३ मध्यें 'त्रितयं मुक्तेः पंथाः' म्हणजे रत्नत्रय हाच मुक्तिमार्ग आहे, असें म्हणतात. श्लोकसंख्या २८ मध्यें सावधान राहून

रत्नत्रयाचें पालन करावें असें सांगतांना पुढील भवांतही या रत्नत्रय धर्माची उत्तरोत्तर प्रगतीच होत जाईल. पूर्वजन्मीच्या संस्काराची कल्पना या श्लोकांत दिसते.

## मोक्षमार्गांत सम्यग्दर्शनच श्रेष्ठ कां ?

**विद्यावृत्तस्य संभूतिस्थितिवृद्धिफलोदयाः ।**
**न सन्त्यसति सम्यक्त्वे बीजाभावे तरोरिव ॥ ३२ ॥**

**अन्वयार्थः**—( बीजाभावे ) बीजाच्या अभावीं ( तरोः इव ) झाडाप्रमाणें ( सम्यक्त्वे ) सम्यक्त्व ( असति ) नसतांना ( विद्यावृत्तस्य ) ज्ञान व चारित्राची ( संभूतिस्थितिवृद्धिफलोदयाः ) उत्पत्ति, स्थिती, वृद्धि व फलप्राप्ति ( न सन्ति ) होत नाहीं.

**अर्थः**—बीज नाहीं तर झाड नाहीं. झाड नसेल तर झाडाची वृद्धी नाहीं व फळही नाहीं; तद्वतच सम्यग्दर्शनाच्या अभावीं सम्यग्ज्ञान व चारित्रही शक्य नाहीं; ह्मणजे ज्ञान व चारित्र्य यांची उत्पत्ती, वृद्धि व फलोदयही सम्यग्दर्शनाच्या अभावीं होत नाहींत. सम्यग्दर्शन हें बीजाप्रमाणें आहे. बीज नसेल तर झाडही व झाड नसल्यास फळ तरी कसें येणार ? सम्यग्दर्शन नसेल तर ज्ञान व चारित्रहीं प्राप्त होणार नाहींत. सम्यग्दर्शनाशिवाय असलेलें ज्ञान हें मिथ्या अगर कुज्ञान आहे. तसेंच सम्यग्दर्शनाशिवाय असलेलें चारित्र हें कुचारित्र आहे. सम्यग्ज्ञान व चारित्र यांचें फळ ह्मणजे परमात्मपद प्राप्ति; परंतु सम्यग्दर्शन नसेल तर सत्ज्ञान व चारित्रहीं संभवत नाहींत. अर्थातच परमात्मपदप्राप्तिही अशक्य आहे.

हाच आशय श्री गुणभद्राचार्यांनीं आपल्या **आत्मानुशासन** ग्रंथांत प्रतिपादिला आहे. ते ह्मणतात कीं, जगतीतलावर अनेक प्रकारचे दगड-पाषाण आहेत; परंतु त्यांच्या अंगची कांती-तेज-यावरून त्यांची किंमत होते. पद्मराग अगर वज्रमणी हेहीं दगडांच्या जातीपैकींच आहेत; परंतु असले मणी व

पाषाण यांची तुलनाच अशक्य. गुंज अगर मासाभर वजनाच्या मण्याच्या लाभानें जन्मोजन्मीचें दारिद्य नष्ट होतें. इतरामुळें एका वेळच्या अन्नाची ददातही नष्ट होत नाहीं.

सम्यग्दर्शन रहित असलेलें ज्ञान व चारित्र सर्वस्वी व्यर्थ आहे असें मात्र नाहीं. कारण ज्ञान व चारित्रामुळें भवनवासी व कल्पवासी व्यंतरादि देवयोनींत जन्म मिळेल परंतु त्यामुळें जन्ममरणाचा फेरा चुकवितां येणार नाहीं; त्यांना परमात्मपद-मोक्षप्राप्ति-होणार नाहीं. श्रद्धा विरहित ज्ञान व चारित्र ही संपूर्ण फलदायी नाहींत. ज्ञानमार्ग अगर भक्तिमार्ग अगर हे दोन्हीही मार्ग श्रद्धेविना-सम्यग्दर्शनाविना-पंगू आहेत.

## चारित्र्यवान् मुनी व सम्यग्दर्शनी श्रावक यांची तुलना. यांत श्रेष्ठ कोण ?

**गृहस्थो मोक्षमार्गस्थो निर्मोहो नैव मोहवान् ।**
**अनगारो गृही श्रेयान् निर्मोहो मोहिनो मुनेः ॥३३॥**

**अन्वयार्थः**—( निर्मोहः ) मोहरहित ( गृहस्थः ) श्रावक ( मोक्ष-मार्गस्थः ) मोक्षमार्गांत स्थिर आहे परंतु ( मोहवान् ) मोहसहित असणारा ( अनगारः एव ) मुनि देखील ( न ) मोक्षमार्गांत स्थिर होणार नाहीं. म्हणून ( मोहिनः ) मोही ( मुनेः ) मुनीपेक्षां ( निर्मोहः ) निर्मोही ( गृही ) गृहस्थ ( श्रेयान् ) श्रेष्ठ आहे.

**अर्थः**—दर्शन मोहनीय-कर्म हें सम्यक्त्वाचा घात करणारें आहे. दर्शनमोहनीय कर्माचा ज्यानें नाश केला आहे, असा श्रावक-गृहस्थी-मोक्ष-मार्गामध्यें स्थिर असतो. परंतु दर्शनमोहनीय-कर्माचा नाश न केलेले, परंतु घरादाराचा त्याग करणारे मुनी हे मोक्षमार्गस्थ होत नाहींत.

सारांश ज्यांनीं सम्यग्दर्शनाचा लाभ करून घेतला नाहीं त्यांना अनंत कालपर्यंत निर्वाणपदप्राप्ती होणार नाहीं. परंतु जे सम्यग्दर्शनी आहेत, परंतु

चारित्रभ्रष्ट आहेत, त्यांना तिसऱ्या भवांत तरी निर्वाणप्राप्ती होते. यामुळें सम्यग्दर्शन हें रत्नत्रयांत श्रेष्ठ मानिलें आहे व ज्ञान व चारित्र यांना दुय्यम स्थान—गौणत्व—दिलें आहे.

**उपकारक सम्यग्दर्शन व अपकारक मिथ्यात्वः—**

**न सम्यक्त्वसमं किंचित्त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ।**
**श्रेयोऽश्रेयश्च मिथ्यात्वसमं नान्यत्तनुभृताम् ॥ ३४ ॥**

**अन्वयार्थः**—( त्रैकाल्ये ) तीनही कालामध्यें ( त्रिजगत्यपि ) तीनही जगांत देखील ( तनुभृतां ) जीवांना (सम्यक्त्वसमं) सम्यक्त्वासारखे ( अन्यत् न ) दुसरे ( किंचित् ) कांहीं ही ( श्रेयः न ) उपकारक किंवा श्रेष्ठ नाहीं. ( च ) आणि ( मिथ्यात्वसमं ) मिथ्यात्वासारखें ( अश्रेय ) अपकारक ( न ) नाहीं.

**अर्थः**—भूत, भविष्य व वर्तमान अशा तीन्ही कालांत व स्वर्ग, नरक व मृत्यु अशा तीनही लोकांत, सम्यग्दर्शनासारखा अपायकारक व हितकारी मित्र नाहीं व मिथ्यात्वासारखा अपायकारक व अहितकारी शत्रू नाहीं. सम्यग्दर्शनाचें महत्व यापूर्वी निरनिराळीं उदाहरणें देऊन सिद्ध केलें आहेच.

**सारांशः**—जीवाचा सर्वकाली व सर्वठिकाणीं खरा-मित्र-हितकर्ता-एक सम्यग्दर्शनच आहे व खरा वैरी व अहित करणारा कोणी असेल तर तें मिथ्यात्वच आहे. म्हणून खऱ्या मित्राला व हितकर्त्याला आपलासा करा. तोच जीवाचा तारक व उद्धारक आहे. नारक योनींतील जीवही सम्यग्दर्शनी होणें शक्य आहे; असें या श्लोकावरून दिसतें. नारकी जीवांचाही उद्धारक जैनधर्म आहे; मग मृत्युलोकांतील पतितांना तो पावन कां करून घेणार नाहीं?

**सम्यग्दर्शनी जीवाला कोणकोणत्या अवस्था प्राप्त होत नाहींत, याबद्दलचें विवेचन.**

**सम्यग्दर्शनशुद्धा नारकतिर्यङ्नपुंसकस्त्रीत्वानि ।**
**दुष्कुलविकृताल्पायुर्दरिद्रतां च व्रजन्ति नाप्यव्रतिकाः ॥३५॥**

**अन्वयार्थः**—( सम्यग्दर्शनशुद्धाः ) निर्मल सम्यग्दर्शनधारी जीव ( अव्रतिकाः अपि ) अव्रती असूनदेखील ( नारकतिर्यङ्नपुंसक-स्त्रीत्वानि ) नरकायु, तिर्यंचायु, नपुंसकत्व, स्त्रीत्व ( दुष्कुलविकृताल्पायुः दरिद्रतां च ) नीच कुलांत जन्म, व्यंगी अल्पायुष्य आणि दारिद्र्य इत्यादि ( न व्रजन्ति ) प्राप्त होत नाहींत.

**अर्थः**—निर्मल व शुद्ध सम्यग्दर्शनी परंतु अव्रतीजीवास नरकायु, तिर्यंचायु, नपुंसकत्व, स्त्रीत्व, नीच कुलीं जन्म, व्यंगता, अल्पायुष्य आणि दारिद्र्य हीं प्राप्त होत नाहींत; परंतु मिथ्यात्वी जीवाला मात्र एकेचाळीस तऱ्हेच्या कर्मांचा बंध होतो. अर्थात् वरील सांगितलेल्या आपात्ति मिथ्यात्वी यास भोगाव्या लागतात. या श्लोकाचा उलट अर्थ करून कोणी ह्मणेल कीं, स्वरूपवान्, दीर्घायुषी व श्रीमंत हे सम्यग्दर्शनीं असलेच पाहिजेत. हा युक्तिवाद योग्य नाहीं. पुढील भवांतील सुखदुःखाची कल्पना या श्लोकांत दिली आहे.

**दुसऱ्या-पुढील-भवांतील फल.**

**ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ।**
**महाकुला महार्था मानवतिलका भवन्ति दर्शनपूताः ॥३६॥**

**अन्वयार्थः**—( दर्शनपूताः ) सम्यग्दर्शनानें पवित्र झालेले जीव, ( ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ) उत्साह, कांति, विद्या, शक्ति, कीर्ति, अभ्युदय, विजय आणि वैभव यांनीं युक्त असणारे (महाकुलाः)

उच्च कुलांत जन्म घेणारे ( महार्थाः ) महान् पुरुषार्थी व ( मानवतिलकाः ) मनुष्यामध्यें अग्रेसर असे ( भवन्ति ) होतात.

**अर्थः**—सम्यग्दर्शनी जीव मृत्युनंतर भावी भवांत उत्साही, कीर्तिमान्, विद्यावान्, शक्तिवान्, कीर्तिवान्, अभ्युदयी, विजयी व वैभवसंपन्न होतो. उच्च कुलांत जन्म होऊन त्यास अग्रेसरत्व प्राप्त होतें, तो लोकमान्य, लोकनायक व जनतेचा पुढारी होतो. सारांश इहजन्मी सम्यग्दर्शनाचें पालन केल्यानें भावी जन्मांत ओज, तेज, विद्या, वीर्य, विजय व विभव इत्यादि गुणांचें स्वामित्व प्राप्त होतें.

श्लोकसंख्या चौतीस मध्यें सम्यग्दर्शन्यांना कोणकोणती आपत्ती भोगावी लागत नाहीं, हें सांगण्यांत आलें व या श्लोकांत त्यांना कोणकोणत्या इप्सितांचा लाभ होतो, हें विशद केलें आहे.

### सम्यग्दर्शनाच्या प्रभावाचें फळ-इंद्रपदादि.

**अष्टगुणपुष्टितुष्टा दृष्टिविशिष्टा प्रकृष्टशोभाजुष्टाः ।**
**अमराप्सरसां परिषदि चिरं रमन्ते जिनेन्द्रभक्ताः स्वर्गे ॥३७॥**

**अन्वयार्थः**—( दृष्टिविशिष्टाः ) ज्यांची दृष्टी अर्थात् सम्यग्दर्शन विशिष्ट अर्थात् विशेष निर्मल आहे असे ( जिनेंद्रभक्ताः ) जिनेंद्र देवांची भक्ति करणारे भव्य जीव ( अष्टगुणपुष्टितुष्टाः ) अणिमा, महिमा इत्यादिक आठ गुणांच्या व अवयवांच्या परिपूर्णतेनें संतुष्ट होऊन व ( प्रकृष्टशोभाजुष्टा. ) अत्युत्कृष्ट शोभेनें युक्त होऊन ( अमराप्सरसां ) देवदेवांगनांच्या ( परिषदि ) सभेमध्यें ( चिरं ) दीर्घकालपर्यंत ( रमन्ते ) क्रीडा करितात.

**अर्थः**—सम्यग्दर्शनी जिनदेव भक्ताला इंद्रपद मिळून तो अनंतकाळ अप्सरांच्या समूहांत रममाण होतो. अनिमा, महिमादि आठ गुणांची त्यांना प्राप्ति होते, शिवाय सर्वांगसुंदर अवयवांची प्राप्ति होते. सम्यग्दर्शनी जीव देवगतींत जन्म घेतो त्या ठिकाणीं (१) अनिमा (२) महिमा (३) लघिमा

(४) प्राप्ति (५) प्राकाम्य (६) ईशित्व (७) वशित्व व (८) कामरूपित्व या आठ गुणांची प्राप्ति होते. तेजःपुंज, कांतिमान व वयोपूर्ण देहाची प्राप्ति होते. इतर देवापेक्षां श्रेष्ठपद-इंद्रपद-प्राप्त होते व दीर्घकालपर्यंत देव-देवांगनांचा सहवास त्यास घडतो.

मागील श्लोकांत इहलोकीच्या व या श्लोकात स्वर्गलोकीच्या वैभवांची व सुखाची कल्पना दिली आहे.

स्वर्गाची संख्या १६ मानिली आहे. व्यसनांची संख्या सात व नरकांची संख्याही सातच मानिली आहे.

स्वर्ग म्हणून एका विशिष्ट योनीच्यांचें-देवयोनींच्यांचें-निवासस्थान आहे. तेथें सर्वप्रकारच्या सुखोपभोगाची सोय असते. स्वर्गाचें सुंदर व रम्य चित्र अनेकांनीं रेखाटलें आहे. स्वर्ग नांवचें वसतिस्थान अस्तित्वांत असो वा नसो; एक गोष्ट स्पष्ट आहे कीं आजवर त्याचें अस्तित्व मानण्यांत आलें आहे. शिवाय पापाचरणापासून परावृत्त होऊन सदाचरण प्रवृत्त होण्यास नरकाची भीति व स्वर्गाचा मोह यासारखा दुसरा उपाय नाहीं. स्वर्गाची लालूच नसती तर सत्प्रवृत्तांची संख्या खास घटली असती. निष्काम सत्प्रवृत्त होणारे महाभाग फारच विरळा !!

### सम्यग्दृष्टी चक्रवर्ति होतात.

**नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः सर्वभूमिपतयश्चक्रम् ।**
**वर्तयितुं प्रभवन्ति स्पष्टदृशाः क्षत्रमौलिशेखरचरणाः ॥३८॥**

**अन्वयार्थः**—(स्पष्टदृशाः) ज्यांचें सम्यक्त्व निर्मल आहे असे जीव (नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः) नऊ निधि व चौदा रत्नें यांचे अधिपति (सर्वभूमिपतयः) अखिल खंडाचे स्वामी व (क्षत्रमौलिशेखरचरणाः) क्षत्रीय राजांच्या मस्तकांचीं मुकुटें ज्यांच्या चरणावर झुकलेलीं आहेत असे होत्साते (चक्र) चक्र (वर्तयितुं) चालविण्यास (प्रभवन्ति) समर्थ होतात.

**अर्थः**—सम्यग्दर्शनाच्या प्रभावामुळे सम्यग्दर्शनी जीव मनुष्य भवांत चक्रवर्तिपदाला पोहोंचतो. त्याला नऊ निधी व चौदा रत्नांचा लाभ होतो. षट्खंड पृथ्वीला जिंकून त्याचा स्वामी होतो. अनेक क्षत्रिय राजे त्यांच्या चरणकमलाला आपल्या मुकुटाचा स्पर्श करितात. ह्मणजे त्याच्यापुढें नमतात वा शरण येतात.

श्लोक नं. ३७ मध्यें सम्यग्दर्शनी जीवाला इंद्रपदाची व स्वर्गांतील सर्वसुखाची प्राप्ति होते असें वर्णिलें आहे. या श्लोकांत भूतलावरील अधिकांत अधिक ऐश्वर्य-चक्रवर्तिपद-प्राप्त होतें, असें वर्णिलें आहे. पुढील श्लोकांत तो जीव तीर्थंकरपद प्राप्तिला पात्र होतो असें वर्णिलें आहे. तीर्थंकरपद प्राप्ति ह्मणजेच मुक्ति होय.

### तीर्थंकर होण्यास पात्र कोण? सम्यग्दर्शनीच ?

**अमरासुरनरपतिभिर्यमधरपतिभिश्च नूतपादाम्भोजा ः।**
**दृष्ट्वा सुनिश्चितार्था वृषचक्रधरा भवन्ति लोकशरण्याः ॥३९॥**

**अन्वयार्थः**—( दृष्ट्या ) सम्यग्दर्शनामुळें ( अमरासुरनरपतिभिः ) देवेंद्र, असुरेंद्र व चक्रवर्ति यांचेकडून ( च ) आणि ( यमधरपतिभिः ) गणधराकडून ( नूतपादाम्भोजाः ) ज्यांचें चरणकमल स्तविले गेले आहेत असें व ( सुनिश्चतार्थाः ) चारही पुरुषार्थांचें ज्यांनीं पूर्ण रीतीनें साधन केलें आहे असें व ( लोकशरण्याः ) लोकांना शरणभूत असें ( वृषचक्रधाराः ) धर्मचक्राचें धारक अर्थात् तीर्थंकर ( भवन्ति ) होतात.

**अर्थः**—देवेंद्र, चक्रवर्ति, असुरेंद्र-दानवेंद्र, व गणधर यांजकडून कोणाचे चरणकमल पूजिले जाते ? तीर्थंकर प्रभूचें ? तीर्थंकरपद प्राप्तीला पात्र कोण ? तर सम्यग्दर्शनी. धर्म अर्थ कामादि चारही पुरुषार्थांचा लाभ तीर्थंकरानांच होतो. लोकांनीं शरण कोणास जावयाचें ? तीर्थंकरांना. त्यांना शरण गेल्यास त्याचा उद्धार होतो. देवेंद्र, दानवेंद्र, चक्रवर्ति व सारी जनता

ज्यांना पूज्य मानते, ज्यांच्या पायावर आपले मस्तक ठेविते, असें तीर्थंकर महत्पद सम्यग्दृष्टीलाच मिळते; इतरांना नाहीं.

## चार पुरुषार्थ कोणते ?

सम्यग्दर्शनी व्यक्तिला चारही प्रकारचे पुरुषार्थ संपूर्णपणें साध्य होतात, असें वरील श्लोकांत सांगितलें आहे. (१) धर्म (२) अर्थ (३) काम व (४) मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत, हें जैन व हिंदुधर्माला मान्य आहे. हे चारही पुरुषार्थ सम्यग्दर्शनी कसा मिळवूं शकतो ? धनवानाला आपल्या संपत्तीचा गर्व येण्याचा दृढ संभव, कामसेवन करणाऱ्याकडून धर्मपालन होणें जवळजवळ अशक्य, धर्म-पालन करीत असतां द्रव्यार्जन व कामसेवन अशक्य, या त्रिदोषांतून सुटून मोक्षप्राप्ति ती शक्य कशी ?? अशी शंका येणेंसाहजिकच आहे. हें जाणूनच महाकवी वादिभसिंह यांनीं क्षत्रचूडामणी काव्यामध्यें हा बिकट प्रश्न सोडविला आहे. ते म्हणतात कीं:—

परस्पराविरोधेन त्रिवर्गो यदि सेव्यते ।
अनर्गलमतः सौख्यमपवर्गोऽप्युनुक्रमात् ॥ १-१६.

**सारांशः**—धर्म, अर्थ व काम यांच्या साधनांत परस्परांचा विरोध होणार नाहीं, अशा धोरणानें वागावें, या तीन्ही पुरुषार्थांचें साधन करीत असतां त्यांच्यांत संघर्ष उत्पन्न न होईल असें वर्तावें; म्हणजे निष्कंटक सुखप्राप्ति होऊन क्रमाक्रमानें मुक्तिचाही लाभ होईल. संपत्ती धर्ममार्गानें मिळवावी, अशी संपत्ति मिळविण्याचा प्रयत्न यशस्वी झाल्यास धर्म व अर्थ या दोन्ही पुरुषार्थांचा लाभ होतो. काम पुरुषार्थाचें मूलकारण धर्म व अर्थ पुरुषार्थ आहेत. पहिल्या दोन पुरुषार्थांचे संरक्षण करीत काम पुरुषार्थ साधावा. असें केल्यानें विरोध व संघर्ष नष्ट होईल.

आज जर्मनी, इटली, इंग्लंड व अमेरिका या देशांत अर्थपुरुषाला प्राधान्य दिलें जात आहे. यामुळें सोशियालिझम्, इंपिरियालिझम् इत्यादि

अनेक वाद उत्पन्न होऊन जगांत पाशवी शक्ति थैमान घालीत आहे. भूमाता आपल्या लाडक्या पुत्राच्या रक्तानें न्हाली जात आहे. धर्मपुरुषार्थाची जोड अर्थ पुरुषार्थाला मिळती तर हें संकट टाळितां आलें असतें.

रामरावण व कौरवपांडव कालांतहि या पुरुषार्थ साधनांच्या मार्गांत विरोध उत्पन्न झाला व त्याच्या पोटीं रामायण व महाभारत आणि गीता यांचा जन्म झाला. सीतेचा लोभ रावणानें धरिला नसतां—कामपुरुषार्थाला महत्व दिलें नसतें—अगर कौरवांनीं पांडवांच्या राज्याचा-अर्थपुरुषार्थ लोभ धरला नसतां तर रामरावण व कौरवपांडव युद्धेंच झालीं नसतीं. पहिल्या तीन पुरुषार्थ साधनांच्या मार्गांतील परस्पर विरोध व संघर्ष टळला नाहीं.

पहिल्या तीन पुरुषार्थ साधण्याच्या मार्गांतील विरोध टाळणें व संघर्ष येऊं न देणें हें सम्यग्दर्शनी यास शक्य कसें ?

खरा देव, गुरु व शास्त्र यावर नितांत श्रद्धा, निःशंकितांगादि आठ अंगाचें पालन, तीन प्रकारच्या मूढतेचा व आठ प्रकारच्या गर्वाचा त्याग हीं सम्यग्दर्शनाचीं लक्षणें; या गुणापैकीं कोणत्या गुणामुळें अगर गुणसमुच्चयामुळें सम्यग्दर्शनी हा संघर्ष टाळूं शकतो ? खरा देवपणा अंगीं आणण्यास त्या विभूतींनीं काय केलें ? संघर्ष येऊं नये म्हणून धर्म, अर्थ व काम पुरुषार्थ कसे साधावेत व साधले गेले यांचें ज्ञान देणारीं शास्त्रें आहेत. गुरुपदास पोहोंचणाऱ्यांच्या आचारांचें व आचारांच्या प्रगतीचें मूर्तिमंत चित्रच गुरुंच्या रूपानें डोळ्यासमोर असतें. संपत्तीच्या व कुलादिकांच्या अभिमानाचा त्यागी, सम्यग्दर्शनी असतो. सम्यग्दर्शनी पापभीरु असतो. इत्यादि कारणामुळें त्याला संघर्ष टाळतां येतो.

## पुरुषार्थ म्हणजे काय ?

पुरुषानें—मानवी प्राण्यानें प्रयत्न करून मिळविण्याच्या वस्तु संपत्ति मिळवूं नका, असा जैनधर्म सांगत नाहीं. संपत्ति मिळवा पण सन्मार्गानें मिळवा, सत्कार्यीं ती लावा व मिळवितांना आपल्या मनाला मर्यादा घाला,

असें जैनधर्म ह्मणतो. काम पुरुषार्थ सर्वांना तो वर्ज्य करण्यास सांगत नाहीं; स्वदार संतोषाची मर्यादा घालतो. फार काय त्यांतील कांहीं बाबी अतिचारांत काढतो. काम ह्मणजे केवळ रतिसुख नव्हे तर भोग, उपभोग व सुखोपभोग यांचाही काम पुरुषार्थ या सदरांत समावेश होईल. काम ह्मणजे पंचेंद्रिय सुखासक्ति. स्वस्त्रीशीं विषयभोग घेतानांही अनेक मर्यादा घातल्या आहेत व त्या मर्यादा पाळण्यांतही धर्म आहे.

अर्थ व काम धर्मानें नियंत्रित केलें आहेत. व त्यामुळेंच पुरुषार्थांच्या मालिकेंत धर्माला प्रथमस्थान दिलें आहे. मोक्ष पुरुषार्थाला हात घालण्यापूर्वी पहिल्या तीन पुरुषार्थांतून गेल्यास या पुरुषार्थांचें वैफल्य कळून येतें व मोक्ष पुरुषार्थ हाच खरा पुरुषार्थ आहे, याची जाणीव होते.

## मोक्षास कोण जातो ? सम्यग्दृष्टीच ?

**शिवमजरमरुजमक्षयमव्याबाधं विशोकभयशंकम् ।**
**काष्ठागतसुखविद्याविभवं विमलं भजंति दर्शनशरणाः ॥४०॥**

**अन्वयार्थः**—( दर्शनशरणाः ) सम्यग्दर्शन हेंच आहे कारण ज्यांना असें जीव ( अजरं ) म्हातारपणानें रहित ( अरुजं ) रोगानें रहित ( अक्षयं ) नाशानें रहित ( अव्याबाधं ) बाधा रहित ( काष्ठागतसुखविद्याविभवं ) उत्कृष्ट प्रकारच्या सुख, ज्ञान आणि वैभव यांनीं सहित व ( विमलं ) कर्ममलानें रहित अशा ( शिवं ) मोक्षाचा ( भजन्ति ) आश्रय करितात.

**अर्थः**—जेथें वृद्धावस्था-म्हातारपण-नाहीं, रोगादिकांची बाधा व भीति नाहीं, जेथें अखंड सुख आहे, उत्कृष्ट सुख, ज्ञान व वैभव आहे असें मोक्ष सम्यग्दृष्टि यांनाच मिळते. अनंतज्ञान, अनंतवीर्य व अनंतसुखादि पारिभाषिक शब्दाने ज्या स्थितीची कल्पना दिली जाते, तीच कल्पना वरील श्लोकांत दिली आहे.

उपसंहार-

देवेन्द्रचक्रमहिमानममेयमानं
राजेन्द्रचक्रमवनीन्द्रशिरोर्चनीयम् ।
धर्मेन्द्रचक्रमधरीकृतसर्वलोकं
लब्ध्वा शिवं च जिनभक्तिरुपैति भव्यः ॥४१॥

**अन्वयार्थः**—( जिनभक्तिः भव्यः ) जिनेंद्राची भक्ति करणारा भव्य जीव ( अमेयमानं ) अपरिमित ( देवेंद्रचक्रमहिमानं ) देवेंद्राच्या विभूतीला ( अवनींद्रशिरोर्चनीयम् ) राजे लोकांच्या मस्तकांकडून पूजनीय अशा ( राजेंद्रचक्रं ) चक्रवर्तीच्या चक्ररत्नाला ( च ) आणि ( अधरीकृतसर्वलोकं ) ज्यांनीं अखिल जगाला नमविलें आहे अशा ( धर्मेंद्रचक्रं ) तीर्थकरांच्या धर्मचक्राला ( लब्ध्वा ) प्राप्त करून घेऊन ( शिवं ) मोक्षाला ( उपैति ) मिळविती. ( भव्यः ) निर्वाणपद मिळविण्यास समर्थ असणारा.

**अर्थः**—सम्यग्दर्शनी, जिनेंद्रभक्त देवगतींत देवेंद्र-इंद्रपदाला पोहोंचतो, मनुष्यगतींत चक्रवर्तिपदाला पोहोंचतो व तीन्ही लोकांत उत्कृष्ट व इच्छित अशा तीर्थंकरपदाला पोहोंचतो व नंतर मोक्षलक्ष्मी त्याला वरिते ह्मणजे मोक्षास जातो.

### सम्यग्दर्शनाचे परिणाम.

यावरून सम्यग्दर्शनी जीव या संसारांत कोणास आपला शत्रू असा मानीत नाहीं. इतरांनीं त्याचा हेवादावा धरिल्यास 'जशास तसें' या न्यायानें न वागतां केवळ हें आपल्या पूर्वजन्मीच्या कर्माचें फळ ह्मणून तो कर्माला दोष देतो, शत्रूला दोष देत नाहीं. यामुळें संसार सुखावह होण्यास मोठीच मदत होते. आठही गर्वांचा ज्याच्या मनाला स्पर्श होणार नाहीं तो संसारी असतांनाही त्याचा वैरी कोण होईल ? या व्रतपालनामुळें संसार-त्याग

करण्याची जरूरी मुळींच नाहीं. सदाचरणानें रहावें, देव, गुरु व शास्त्र यावर नितांत श्रद्धा ठेवावी असाच प्रवृत्तिमार्गाचा उपदेश आहे. निवृत्ति-संन्यास-मार्गाचा उपदेश नाहीं. संसार असार आहे, इत्यादि बोध केला आहे तो फक्त संसारांत आसक्ति न ठेवण्यापुरतांच आहे. संन्यास न घेतांहि संन्यास धर्माचें फल सल्लेखना-व्रतामुळें मिळणार आहे.

येथवर सम्यग्दर्शन ह्मणजे काय व त्याचें फळ काय, इत्यादि चर्चा केली आहे. मिथ्यादर्शनाचें फळ काय, हें ओघानेंच सांगावें लागणार. मिथ्यादर्शनामुळें जीव हा संसार-चक्रांत सांपडतो. मिथ्यात्व हें संसाराचें मूळ आहे.

योगसार टीकेंत ह्मटलें आहे कीं—

कालु अणाइ अणाइ जीउ भवसायरु जि अणंतु ।
मिच्छादंसणमोहियउ ण वि सुह दुक्ख जि पत्तु ॥ ४ ॥

**भावार्थः**—काल अनादि आहे, प्रत्येक मिनिटाच्या दृष्टीनें भूत, वर्तमान व भविष्यकाल ठरविला जातो. काल नाहीं असा संभव अगर परिस्थिती मुळींच उत्पन्न होत नाहीं. यामुळें कालाला सुरवात—पहिली घटी—अशी कधींच नाहीं. कालाला आदि नाहीं व अंतही नाहीं. यामुळें काल अनादि आहे.

काल अनादि मानल्यावर त्यांत राहणारे जीवही अनादिच आहेत हें उघड आहे. नवीन जीव उत्पन्न होत नाहींत.

जीव व अजीवादि द्रव्यें व कालद्रव्य अशा सहा द्रव्यांच्या समुदायाच्या दृश्य स्वरूपाला जग असें ह्मणतात. हें जग या सहा द्रव्यांचें बनलेलें आहे; व हीं द्रव्यें अनादि असल्यानें जगतूही अनादिच आहे.

संसारी जीव अनादि कालापासून पाप-पुण्याचें फल भोगीत भ्रमण करीत राहिला आहे. संसारी जीव एकवार शुद्ध होता व फिरून तो अशुद्ध

झाला असें होतच नाहीं. मिथ्यादर्शन नांवाच्या कर्माच्या उदयामुळें संसारी जीव आपल्या आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाला ओळखूंच शकत नाहीं. आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाची त्याला कल्पनाच येत नाहीं. यामुळें खऱ्या सुखाची त्याला प्राप्तीच होत नाहीं. इंद्रियजनित सुख हें खरें व शाश्वत सुख नव्हे. पुण्याहून मुंबईस जातांना खंडाळ्याजवळील वनश्री पाहून होणारें सुख खरें सुख नाहीं. आगगाडी पांच सात मैल पुढें गेली कीं, तें सुख नाहींसें होतें, व अल्प काळच सुख मिळाल्यावर त्या सुखामागून दुःख येतें. उत्तम गाणें ऐकून कान तृप्त होतात व मिष्टान्न खाऊन तोंड गोड होतें, परंतु क्षणार्धात तें सुख नष्ट होतें. यामुळें इंद्रियामार्फत मिळणारें सुख हें खरें सुख नसून तें दुःख-रूपी आहे.

दर्शनमोहनीय व चारित्रमोहनीय असें मोहनीय कर्माचें दोन भेद आहेत. तसेंच मिथ्यादर्शनाचें (१) अग्रहित व (२) अधिगमज असें दोन भेद आहेत. अग्रहित ह्मणजे नैसर्गिक. दुसऱ्याच्या उपदेशाशिवाय अगर सांगण्या-शिवायही केवळ मिथ्यात्वकर्माच्या उदयामुळें जीव-अजीवादि तत्वावर श्रद्धा न राहणें.

अधिगमज ह्मणजे दुसऱ्याच्या सांगण्यावरून व शिकवणीमुळें जीवादि-तत्वावर श्रद्धा न ठेवणें.

सम्यक्त्वेन ही युक्तस्य ध्रुवं निर्वाणसंगमः ।
मिथ्यादृशोऽस्य जीवस्य संसारे भ्रमणं सदा ॥

**सारांशः**—सम्यग्दृष्टि जीवाला निर्वाणपदप्राप्ति ही अवश्य होणारच व मिथ्यादृष्टी जीव सदा सर्वकाल संसारांत भ्रमण करीत राहणार. यासाठीं मिथ्यात्वाचा त्याग व सम्यक्त्वाचा स्वीकार करावा; व जन्मजरादिकांच्या तावडींतून सुटका करून घ्यावी.

---

# अध्याय दुसरा.

## सम्यग्ज्ञानाचें स्वरूप.

**अन्यूनमनतिरिक्तं याथातथ्यं विना च विपरीतात् ।**
**निःसंदेहं वेद यदाहुस्तज्ज्ञानमागमिनः ॥ ४२ ॥**

**अन्वयार्थः**—( यत् ) जे ( अन्यूनं ) कमीपणाचें नव्हे (अनतिरिक्तं) अधिकतेनें रहित ( विपरीतात् विना ) उलटेपणानें रहित ( याथातथ्यं ) जसें असेल तसें ( निःसंदेहं ) निःसंशय रीतीनें ( वेद ) जाणतें ( तत् ) त्याला ( आगमिनः ) शास्त्रज्ञ ( ज्ञानं ) ज्ञान असें ( आहुः ) ह्मणतात.

**अर्थः**—आगमाचें पूर्णज्ञान श्रुतकेवली व गणधर देवांना असतें. न्यूनता, अधिकता, विपरीतता व संशय या चार दोषांनीं रहित असें जें ज्ञान तें सम्यग्ज्ञान होय. आत्मा अनंतज्ञानस्वरूपी आहे. असें असतां तो तसा नाहीं असें मानणें हें मिथ्याज्ञान होय. पुद्गल रूप, रस, गंधादिकांनीं युक्त आहे, असें मानणें ह्मणजे ज्याचें जें स्वरूप आहे त्यापेक्षां त्यात अधिक आहे असें मानणेंही मिथ्याज्ञान होय.

दहाला पांचानें गुणिलें असतां पन्नास ही संख्या येते व तसें मानणें हें सम्यग्ज्ञान होय. त्याऐवजी ही संख्या ४८ भरते असें मानण्यानें न्यूनतेचा दोष येतो. ती संख्या ५२ भरते, असें मानण्यानें अधिकतेचा दोष येतो. पन्नासाच्या ऐवजी दहा अगर पांच समजण्यानें विपरीततेचा दोष येतो. तसेंच ही संख्या पन्नास भरते, आठेचाळीस भरते कीं बावन्न भरते असा संशय धरण्यानें संशय दोष घडतो. दहाला पांचानें गुणिले तर पन्नास संख्या भरते असें निश्चयानें मानणें ह्मणजेच सम्यग्ज्ञान होय. ज्याला संख्येची मोजणी करितां येत नाहीं त्यानें अज्ञानानें वर लिहिल्याप्रमाणें चुकीचा हिशोब करण्यानें

सम्यग्ज्ञानाला बाध येणार नाहीं. मात्र समजून उमजून व हेतूपुरस्सर चुकीचा हिशोब करणारा मिथ्याज्ञानी होईल. यापुढें याबद्दलचा अधिक खुलासा केला आहे. विषय-प्रवेश करण्यास सुलभ जावें ह्मणून वरील उदाहरणें दिलीं आहेत.

वर सम्यग्ज्ञानाचें स्वरूप-लक्षण- व त्याचा अर्थ दिला आहे, परंतु याहीपेक्षां थोडासा अधिक खुलासा होणें जरूर आहे, असें वाटल्यानें तसा यथामति प्रयत्न केला आहे.

सम्यग्ज्ञान ह्मणजे सरळ, खरेंखुरें अगर वस्तुस्थितिनिदर्शक जें ज्ञान-तें सम्यग्ज्ञान. जी वस्तु अगर जो पदार्थ जसा आहे तशाच स्वरूपांत त्याला जाणणें, तो तसाच आहे, असें समजणें, याला सम्यग्ज्ञान असें व्यावहारिक भाषेंत ह्मणतो; परंतु धर्मशास्त्राच्या दृष्टीनें विचार करितां या शब्दाचा थोडासा निराळा अर्थ आहे.

चतुर्थ अगर चौथ्या गुणस्थानापासूनचें पुढील ज्ञान हें सम्यग्ज्ञान आहे. त्यापूर्वीच्या गुणस्थानाला मतिज्ञान अगर श्रुतज्ञान असें ह्मणतात. अशीही परिस्थिती शक्य आहे कीं जेथें सम्यग्दर्शन व मिथ्यादर्शन यांचें मिश्रण असतें, तद्वत सम्यग्ज्ञान व मिथ्याज्ञान यांचेंही मिश्रण शक्य आहे. पं. दरबारीलाल यांनीं जैनधर्म मीमांसा भाग २ यांत पान २ वर खालील उदाहरण दिलें आहे:—कोणी एक गृहस्थ सम्यग्दृष्टी आहे, परंतु दृष्टीमंदतेमुळें वा पुऱ्या उजेडाच्या अभावामुळें तो दोरीला साप असें ह्मणतो, अगर समजतो. दोरीला साप समजणें व्यावहारिक दृष्ट्या खोटें आहे, परंतु धर्मदृष्ट्या तो सम्यग्ज्ञानीच आहे. याचें कारण असें कीं, अशा गैर-समजुतीमुळें त्याचा जो कल्याणाचा मार्ग-धर्म-यांत बाधा येत नाहीं, अगर त्यामुळें धर्महानी होत नाहीं.

वरील अगर अशाच तऱ्हेची गूढ उदाहरणें सोडून दिलीं व इतिहास, भूगोल, अर्थशास्त्रादि अनेक शास्त्रांचें व विषयांचें सम्यग्दृष्टीला अगदीं थोडे-

तेंही ज्ञान नाहीं, सम्यग्दृष्टी त्या शास्त्रांत अगर त्रिषयांत अज्ञानी आहे, अगर त्या शास्त्राबद्दल व विषयाबद्दल त्याचीं मतें भलतींच आहेत तथापि त्यामुळें तो सम्यग्ज्ञानी नाहीं, असें ह्मणतां येणार नाहीं.

असें कां? असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होईल. ज्या ज्ञानामुळें आत्म्याला सुखाचा लाभ होणार आहे व जें ज्ञान खऱ्या सुखाची प्राप्ति करून देणार आहे, तेंच ज्ञान सम्यग्ज्ञान होय. आपल्या शरीराच्या कुठल्या भागांत अन्नाशय आहे व फुफुसें कोठल्या भागांत आहेत, याबद्दलचें अज्ञान अनेक सम्यग्ज्ञान्यांनाहीं आहे, त्यामुळें त्यास मिथ्याज्ञानी असें ह्मणतां येणार नाहीं; कारण शरीरशास्त्राच्या अज्ञानामुळें आत्म्याला चिरंतन सुख प्राप्ति करून देणारें जें ज्ञान त्या ज्ञानांत कमीपणा अगर वैगुण्य येत नाहीं. शारीरिक, वैद्यक वगैरें शास्त्राचें ज्ञान असो वा नसो त्यामुळें धर्मानें ज्या ज्ञानाची आवश्यकता प्रतिपादिली आहे, त्यांत अशा इतर शास्त्रज्ञानांचा समावेश केलेला नाहीं.

सर्वज्ञ अगर सर्वज्ञता या शब्दाच्या अर्थाच्या व्याप्तिबद्दलही असाच गैरसमज होण्याचा संभव आहे, तथापि त्याबद्दलची चर्चा प्रस्तुत अप्रस्तुत आहे; तथापि जरूर तेवढा उल्लेख प्रसंगोपात् केला आहे.

तत्वार्थसूत्र अध्याय १ सूत्रसंख्या ९ मध्यें सम्यग्ज्ञानाचें स्वरूप व त्याचे भेद दिले आहेत. ते (१) मतिज्ञान (२) श्रुतज्ञान (३) अवधिज्ञान (४) मन:पर्यायज्ञान (५) केवलज्ञान, असे पांच प्रकारचे आहेत.

(१) **मतिज्ञान**—पांच इंद्रियें व मन यांच्या साह्यानें होणारें ज्ञान.

(२) **श्रुतज्ञान**—पंचेंद्रियें व मन ह्यामुळें झालेल्या मतिज्ञानाचें व अधिक स्पष्टतर होणारें ज्ञान.

(३) **अवधिज्ञान**—पंचेंद्रियाच्या मदती शिवाय परंतु द्रव्य, क्षेत्र व कालादिकांच्या मर्यादेत राहून ज्या पदार्थांना रूप आहे, त्यांचें एकदेश ज्ञान,

रूपयुक्त पदार्थांचें स्थूल मानानें परंतु इंद्रियांच्या मदतीशिवाय झालेलें ज्ञान व द्रव्य, क्षेत्र इत्यादिमुळे विवक्षित मर्यादेत असलेलें ज्ञान.

(४) **मनःपर्याय**—पंचेंद्रियांच्या अगर दुसऱ्यांच्या कोणत्याही मदती शिवाय इतरांच्या मनांतील अरूपी पदार्थांचें विशेष ज्ञान. अवधिज्ञानापेक्षां या ज्ञानांत रूपयुक्त पदार्थांचें विशेष ज्ञान होतें.

(५) **केवलज्ञान**—सर्व द्रव्य व त्यांचें पर्याय यांचें सर्व प्रकारचें ज्ञान. यापैकीं पहिल्या चार भेदाचे अनेक पोटभेद मानिले आहेत. उदाहरणार्थ मतिज्ञानाचें ३३६ पोटभेद मानिले आहेत.

मति व श्रुतज्ञान हें इंद्रिय व मन यांच्या साहाय्यानें होत असल्यानें त्यास परोक्षज्ञान व बाकीच्यांना प्रत्यक्ष ज्ञान असें म्हटलें आहे. यासंबंधीं अधिक माहितीसाठीं जिज्ञासूनीं तत्वार्थसूत्राचें अध्ययन करावें.

सम्यग्ज्ञानाचे (१) प्रत्यक्ष व (२) परोक्ष असे दोन भेद-प्रकार मानिले आहेत. या पोटभेदाचे अनेक पोटभेद आहेत. यासंबंधीची अधिक चर्चा अन्यत्र होईल.

(१) प्रथमानुयोग (२) करणानुयोग (३) चरणानुयोग (४) द्रव्यानुयोग अशा चार प्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान सम्यग्ज्ञान्यांत असते. महापुराण, पद्मपुराण, महावीर चरित्, प्रद्युम्नचरित् अशा ग्रथांचा प्रथमानुयोगांत समावेश होतो. गोमटसार, त्रिलोकसार व आत्मानुशासनादि ग्रंथांचा समावेश करणानुयोगांत होतो. मूलाचार, अनगार-धर्मामृत, रत्नकरंड श्रावकाचार (समंतभद्रकृत) अमितगति व वसुनंदी-श्रावकाचारादि आचार-ग्रंथांचा समावेश चरणानुयोगांत होतो. द्रव्यसंग्रह, पंचास्तिकाय, मोक्षशास्त्र इत्यादिकांचा द्रव्यानुयोगांत समावेश होतो.

आजच्या वैज्ञानिक जगांत व युगांत या चारही प्रकारच्या अनुयोगांतील सर्वच लिखावट तीर्थंकर प्रणीतच आहे व ती लिखावट शंका न घेतां

खरीच माना असा आग्रह धरणें हास्यास्पद होईल. वाचकांच्या व श्रोत्यांच्या मनावर धर्मतत्वें बिंबविण्यासाठीं पुराणांचा हेतू आहे व तत्वें प्रतिपादन करीत असतां जी इतर हकीगत सांगितली जाते, तीही खरी मानणें या वैज्ञानिक काळांत पटणार नाहीं. साररूपानेंच त्याचा बोध घ्यावा. असें झाल्यास तत्वावर श्रद्धा ठेविली नाहीं असें ह्मणतां येणार नाहीं. बुद्धिवान् लोक सार लक्षांत घेतील, पण तें सार ग्रहण करितांना सांगितलेल्या कथेतील अक्षरन् अक्षर खरें मानण्यास ते तयार होणार नाहींत.

### १ प्रथमानुयोगाचें स्वरूप.

**प्रथमानुयोगमर्थाख्यानं चरितं पुराणमपि पुण्यम् ।**
**बोधिसमाधिनिधानं बोधति बोधः समीचीनः ॥४३॥**

**अन्वयार्थः**—( समीचीनः बोधः ) सम्यग्ज्ञान ( अर्थाख्यानं ) धर्मादि चार पुरुषार्थांचें ज्यांत निरूपण आहे अशा ( चरितं ) चरित्राला ( पुराणं ) पुराणाला ( अपि ) तसेंच ( पुण्यं ) पुण्यदायक व ( बोधिसमाधिनिधानं ) रत्नत्रय आणि धर्मशुक्लध्यान यांचें माहेरघर अशा ( प्रथमानुयोगं ) प्रथमानुयोगशास्त्राला ( बोधति ) जाणतें.

**अर्थः**—धर्म, अर्थ, काम व मोक्ष या पुरुषार्थांचें ज्यांत वर्णन आहे; तसेंच ज्यांत एक अथवा अनेक चारही अर्थ साध्य करणाऱ्यांचें चरित्र-त्रिषष्टिशलाका पुरुषांचें पुराण-दिलें आहे, सम्यग्दर्शनादिक रत्नत्रय प्राप्तिचे मार्ग ज्यांत दाखविले आहेत, सम्यग्दर्शनादिक रत्नत्रयाचा लाभ झालेल्यांचें ज्यांत वर्णन आहे; असे जे ग्रंथ, त्या ग्रंथांना-आगमानां-प्रथमानुयोगशास्त्र ह्मणतात.

**सारांशः**—ज्या ग्रंथामध्यें धर्माचें वर्णन दिलें आहे, संसाराच्या फेऱ्यांतून मुक्त होण्याचा उपदेश केला आहे, एका पुरुषाचें चरित्र वर्णिलें आहे,

अनेक-त्रिषष्टिशलाका पुरुषांचें-चरित्र वर्णिलें आहे व ज्यांत चार आराधनांची पुरुषार्थांची प्राप्ति व पूर्तता होण्याचा उपदेश केला आहे, अशा शास्त्रांना प्रथमानुयोग ह्मणतात.

या वरून असें दिसेल कीं प्रथमानुयोगांत धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे पुरुषार्थ कोणकोणत्या महात्म्यानीं मिळविले, हे कथारूपानें सांगितलेलें आहे. अशा कथांत गुणाला प्राधान्य देऊन चरित्र रूपानें धर्मतत्वें बिंबविण्याचा व इतरांना सत्प्रवृत्त करण्याचा यशस्वी प्रयत्न झालेला असतो. सामान्य लोकांची धर्माभिरुचि वाढविण्याचें प्रथमानुयोग हें अमोघ साधन आहे.

## करणानुयोगाचें स्वरूप.

**लोकालोकविभक्तेर्युगपरिवृत्तेश्चतुर्गतीनां च ।**
**आदर्शमिव तथामतिरवैति करणानुयोगं च ॥ ४४ ॥**

**अन्वयार्थः**—( तथा ) त्याचप्रमाणें ( मतिः ) सम्यग्ज्ञान ( लोकालोकविभक्तेः ) लोक व अलोक यांच्या भेदाला ( युगपरिवृत्तेः ) षट्कालांच्या परिवर्तनाला व ( चतुर्गतीनां ) चार गतींना ( आदर्श इव ) दर्पणाप्रमाणें स्पष्ट करणाऱ्या ( करणानुयोगं ) करणानुयोग शास्त्राला ( अवैति ) जाणतें.

**अर्थः**—लोक व अलोक यांचे विभाग, उत्सर्पिणी व अवसर्पिणी यांचें प्रत्येकी सहा काल व त्यांचे परिवर्तन; देव-नरकादि चार गतींचें परिभ्रमण यांचें यथार्थ वर्णन ज्यांत आहे, त्या ग्रंथास करणानुयोग ह्मणतात. आरशांत जसें आपलें अगर इतर वस्तूंचें हुबेहुब प्रतिबिंब दिसतें तसें लोक व अलोक यांच्या विभागाचें, उत्सर्पिणी व अवसर्पिणी कालाच्या परिवर्तनाचें, चार गतींच्या परिभ्रमणाचें प्रतिबिंब करणानुयोगांत पहावयास मिळतें. षट्द्रव्य समुदायाला लोक व आकाश द्रव्यच फक्त जेथें आहे त्यास अलोक असें ह्मटलें आहे. पृथ्वी गोलाकार आहे कीं मनुष्याकार आहे, सूर्य चल आहे

कीं पृथ्वी चल अगर अचल आहे, तारें व नक्षत्रें ही शाश्वत आहेत कीं अशाश्वत आहेत इत्यादिकांबद्दल आजच्या वैज्ञानिकांचीं मतें जैनधर्म वाङ्मयांतील वर्णनाहून भिन्न आहेत. गणित शास्त्राचा या अंगांत समावेश होतो.

### ३ चरणानुयोगाचें स्वरूप.

**गृहमेध्यनगाराणां चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षांगम् ।**
**चरणानुयोगसमयं सम्यग्ज्ञानं विजानाति ॥ ४५ ॥**

**अन्वयार्थः**—( सम्यग्ज्ञानं ) सम्यग्ज्ञान ( गृहमेध्यनगाराणां ) गृहस्थ आणि मुनींच्या ( चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षांगम् ) चारित्रांची उत्पत्ती, वृद्धि व रक्षण यांना कारणीभूत अशा ( चरणानुयोगं ) चरणानुयोग ( समयं ) शास्त्राला ( विजानाति ) जाणतें.

**अर्थः**—ज्या ग्रंथामध्यें श्रावक, श्राविका, मुनि व आर्जिका यांचें चरित्र-आचार-यांची उत्पत्ति, वृद्धि व त्याचें रक्षण यांचें वर्णन आहे, अशा ग्रंथांना चरणानुयोग शास्त्र ह्मणतात.

### ४ द्रव्यानुयोगाचें स्वरूप.

**जीवाजीवसुतत्वे पुण्यापुण्ये च बंधमोक्षौ च ।**
**द्रव्यानुयोगदीपः श्रुतविद्यालोकमातनुते ॥ ४६ ॥**

**अन्वयार्थ**—( द्रव्यानुयोगदीपः ) द्रव्यानुयोगरूपी दिवा ( जीवाजीवसुतत्वे ) जीव व अजीव या खऱ्या तत्वांना ( पुण्यापुण्ये ) पुण्य व पापाला (च) आणि ( बंधमोक्षौ ) बंध व मोक्षाला ( श्रुतविद्यालोकं ) भावश्रुत ज्ञानरूप प्रकाश जेणेंकरून आत्म्यांत उत्पन्न होईल अशा रीतीनें ( आतनुते ) विस्तार करतो.

**अर्थः**—ज्या ग्रंथांमध्यें जीव-अजीवादि तत्वांचें व पाप, पुण्य, बंध आणि मोक्ष यांचें वर्णन केलें आहे, त्या ग्रंथांना द्रव्यानुयोगशास्त्र ह्मणतात.

सारांश ४२ व्या श्लोकांत सम्यग्ज्ञानाचें स्वरूप सांगितलें आहे, व पुढील चार श्लोकांत प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग व द्रव्यानुयोगाचें स्वरूप सांगितलें. चारी प्रकारच्या शास्त्रांना जाणणारें जें ज्ञान, तें सम्यग्ज्ञान होय.

## या चार प्रकारचे शास्त्र-ज्ञान-ग्रंथ अस्तित्वांत कसे आले ?

समवशरणांत तीर्थंकर प्रभू आपल्या दिव्य ध्वनींनीं उपदेश देत. तो ध्वनी, विशिष्ट अशा कोणत्याहि भाषेंत नसे. सर्व चराचर प्राण्यांना उद्देशून हा उपदेश असे. ती दिव्यध्वनीच द्वादश अंगाचें व चारही अनुयोगांचें मूल-स्थान आहे. हा उपदेश लक्षांत ठेवून गणधरादिक मुनी द्वादश अंगाची रचना करितात. दिव्यध्वनीचें गणधरादिकांकडून झालेलें स्पष्टीकरण विचारांत घेऊन दुसरे आचार्य ग्रंथरचना करितात. अशा ग्रंथांचे वर लिहिल्याप्रमाणें चार विभाग पाडिले जातात.

गणधरादि मुनींनीं वर्णिलेले द्वादशांग ग्रंथ आज उपलब्ध नाहींत. ते नष्ट झाले. त्यांचा पुनरुद्धार करण्याकरितां व ते नष्ट झाल्यावर जे ग्रंथ निरनिराळ्या आचार्यांनीं लिहिले होते, त्यांत दिसणारा गैरमेळ दुरुस्त कर-ण्याकरितां त्या त्या वेळच्या धर्मज्ञ व नामवंत आचार्यांच्या समिति-कमिटी-नेमिल्या जात व सुसंबद्ध ग्रंथरचना होई.

आज अधिकांत अधिक जुना धर्मग्रंथ सुमारें २००० तें २१०० वर्षांपूर्वी रचलेला मिळतो. भगवान महावीरांनीं आपल्या दिव्यध्वनीनें दिलेल्या उपदेशाचें श्रीगौतम गणधरांनीं विवेचन केलेला ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. त्या काळाचे ग्रंथ नष्ट झाल्यानंतर अगर तो उपदेश स्मृतींतून गेल्यानंतर ज्या समिती नेमल्या गेल्या त्याचें फळ आजचे ग्रंथ आहेत.

या चारही प्रकारच्या अनुयोगांच्या अभ्यासाच्या फलाचें सार म्हणजे आपण आपल्या आत्म्याला परमात्मा असें समजावें असा आहे. ज्याला

आपल्या आत्म्याला परमात्मपदप्राप्ति करून देण्याची व आत्म्याचें खरें स्वरूप समजून घेण्याची इच्छा आहे, त्याला या चारही अनुयोगांच्या ग्रंथांचें जिज्ञासापूर्वक व मर्म समजून घेऊन अभ्यास करण्याची जरूरी आहे. अशा अभ्यासामुळें त्याला आपल्या आत्म्याचें खरें स्वरूप काय आहे व त्याला परमात्मपदास पोहोंचविण्यास कोणकोणच्या उपायांची योजना करणें जरूर आहे, याचें सम्यग्ज्ञान होईल.

समयसारामध्यें ह्मटलें आहे कीं—

> जो हि सुदेणाभिगच्छन्दि अप्पाणमिणं तु केवलं सुद्धं ।
> तं सुदकेवलिमिसिणो भणंति लोगप्पदीवियरा ॥ ९ ॥

**भावार्थः**—आपल्या आत्म्यासभोंवतीं रागद्वेषादि कर्माचें जें किटन चिकटलेलें असतें तें द्वादशांग वाणीच्या अभ्यासामुळें धुवून जाऊन आत्मा शुद्ध स्वरूपांत–मूल स्वरूपांत–दिसूं लागतो. कपटभाव सोडून, मी परमात्मा आहे असें समजून घेण्यास सर्वप्रकारें मदत द्वादशांग वाणीच्या अभ्यासानेंच होतो.

सर्वज्ञ व केवलज्ञानी या शब्दांच्या अर्थाबद्दल भाविकपणाची जी कल्पना आहे, त्या अर्थानें हे शब्द उपयोगांत आणिले नसावेत. हिटलर या नांवाचा मनुष्य जर्मनींत जन्मास येईल व तो हल्लींचें महायुद्ध अमूक तारखेस पुकारील इत्यादि इत्यादिकांचें ज्ञान तीर्थंकरप्रभू व सर्वज्ञ यांना होतें, असें भाविकपणानें मानणारें मानोत !!

## ज्ञान व ज्ञानाचे भेद.

आध्यात्मिक व वैज्ञानिक-आधिभौतिक असें ज्ञानाचें दोन भेद मानिले आहेत. या भेदानांच कोणी विद्या व अविद्या असेंही ह्मणतात. अविद्या ह्मणजे कुविद्याज्ञान असें ह्मणणारे कांहीं सनातनी आहेत. धर्म शिक्षण-आध्यात्मिक शिक्षणावर सनातनी जोर देतात व क्वचित प्रसंगीं वैज्ञानिक

ज्ञानाची व सुसंस्काराची जोड असावी, असें नाइलाजानें म्हणतात. संसार चक्राचीं स्त्री व पुरुष हीं जशीं दोन चाकें आहेत व तीं दोन्हीं चांगलीं असल्याखेरीज सुखाचा संसार होत नाहीं, कोणतेंही कर्म चांगलें होण्यास दोन्ही हाताची जरूरी आहे, तद्वतच आध्यात्मिक व वैज्ञानिक या दोन्ही प्रकारच्या ज्ञानाची जरूरी आहे.

अध्यात्मविद्येलाच आधिभौतिक व विज्ञान विद्येला भौतिक विद्या असेंही म्हटलें जात आहे. ज्ञानाच्या या दोन्ही प्रकारचा सुखद संयोग होणें जरूर आहे. एक दुसऱ्यांवाचून पंगु आहे. शरीराला दोन पायाची, दोन हाताची व दोन डोळ्याची जरूरी आहे. तद्वत ज्ञानाची पूर्तता होण्यास या दोन्ही प्रकारच्या ज्ञानाची जरूरी आहे. एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं.

विद्यां च अविद्यांच यस्तद्वेद उभयं सह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृत्तमश्नुते ॥

**सारांशः**—भौतिक व वैज्ञानिक ज्ञानाच्या जोरावर आपण हा मृत्यु-लोक तरतो. संसारांतील दुःखें निवारण करितो, रोग परिहार करितो. अर्थ-शास्त्र समजतो. आधिभौतिक अगर आध्यात्मिक ज्ञानाच्या साहाय्यानें अम-रत्व-मोक्षपद-मिळतें.

पाश्चिमात्य लोकांची सारी भिस्त वैज्ञानिकज्ञानवृद्धिकडे आहे. अध्यात्म विद्येकडे त्यांचे असावें तितकें लक्ष नाहीं; यामुळेंच हल्लीं सारखीं युद्धें वारंवार उत्पन्न होत आहेत. सारांश या दोन्ही प्रकारच्या ज्ञानाच्या सुखद संयोगाची राष्ट्रोद्धारासाठीं व आत्मोद्धारासाठीं जरूरी आहे. एक ज्ञान दुसऱ्या ज्ञानाच्या अभावीं पंगु आहे. आपल्या पूर्वाचार्यांपैकीं अनेकांनीं वैद्यक, गणित, अर्थशास्त्र, राजनीति, पशुरोगचिकित्सा, ज्योतिष, वनस्पतिधर्म व शिल्प इत्यादि अनेक विषयावर आजच्या विद्वानांनाही मान्य असे ग्रंथ लिहिले आहेत. ही अविद्या आहे व यांचा विचारही अस्पृश्य आहे असें

त्यांनीं मानिलें नाहीं; कारणें उघड आहेत व तीं हीं कीं, मनुष्य व इतर प्राणिमात्रांच्या सुखासाठीं, अभ्युदयासाठीं व उत्कर्ष इत्यादिसाठीं यथाशक्ति व अविश्रांत झटणें, हा धर्म आहे.

## विद्या व अविद्या.

'सा विद्या या विमुक्तये' असें एक वचन आहे. मुनि लोकांच्या उपदेशाच्या वेळीं इंग्रजी शिकू नका अगर धर्मशास्त्राच्या अभ्यासाशिवाय इतर अभ्यास अगर विद्या, ही अविद्या आहे, असें सतत सांगण्यांत येते. या वचनांतील 'विमुक्तये' या शब्दाचा बोध न झाल्यानें मुनीजनांनीं मनमानेल तो अर्थ सांगावा व अंधभक्तांनीं तो ऐकावा, अशा परिपाठच होऊन बसला आहे. 'गांधी विचार-दोहन' या पुस्तकांत पान १७२ वर या वचनाच्या अर्थाचा विचार करितांना जी विचारसरणी अवलंबिली आहे, तिचा परिचय करून दिल्यानें विद्या व अविद्या ह्मणजे काय? याचा बोध होण्यास मदत होईल अशी आशा आहे. त्यांत लिहिलें आहे कीं "जी चित्ताची शुद्धि करीत नाहीं, जी मनाला आणि इंद्रियांना वश ठेवण्याला शिकवीत नाहीं, जिच्या योगें निर्भयपणा आणि स्वावलंबन उत्पन्न होत नाहीं, जी निर्वाहाचें साधन दाखवीत नाहीं, आणि गुलामगिरींतून (मग ती मानसिक असो वा इतर प्रकारची असो) सुटण्याची आणि मुक्त राहण्याची तळमळ व शक्ति उत्पन्न करीत नाहीं, अशा विद्येंत कितीहि माहितीचा खजिना, तार्किक कुशलता आणि भाषा-पांडित्य भरलेलें असलें तरी ती विद्या नव्हे अगर असली तरी ती अपुरी विद्या आहे."

या वरून विद्या, ज्ञान अगर सम्यग्ज्ञान यांत कोणकोणत्या गोष्टींचा समावेश केला जातो, याची स्थूल मानानें तरी कल्पना येईल. आमचे मुनि व उपदेशक गुलामगिरींतून मुक्त होण्याचा उपदेश तर करीतच नाहींत उलट मानसिक गुलामगिरीचा साखळदंड माने भोंवती व मनावर, इतका आवळून

चरितात कीं विद्या या शब्दाचा व्यापक अर्थ करणाऱ्यास घड श्वासोच्छ्वास करणेंहि अवघड होऊन जातें, मग आपले विचार बोलून दाखविण्यास संधि ती कोठून !!

चारी अनुयोगाच्या ज्ञानामुळें मनुष्यप्राण्याला मुक्तीचा मार्ग दिसेल व मुक्तीचा मार्ग चालू लागण्यापूर्वी तो सम्यग्दर्शनी झाला असल्यानें निर्भय असतो. उत्कृष्ट संसार करितो. आपला, आपल्या देशाचा व आपल्या धर्माचा उद्धार कसा होईल, यांचें ज्ञान तें सम्यग्ज्ञान. तीच खरी विद्या. केवळ संसाराकडे पाठ फिरविण्यास सांगणारें तेंच खरें ज्ञान व तीच खरी विद्या, असा, ज्ञान आणि विद्या याचा अर्थ करणें योग्य नाहीं.

---

# अध्याय ३ रा.

## चारित्र कां धारण करावें ?

**मोहतिमिरापहरणे दर्शनलाभादवाप्तसंज्ञानः**
**रागद्वेषनिवृत्त्यै चरणं प्रतिपद्यते साधुः ॥४७॥**

**अन्वयार्थः**—( मोहतिमिरापहरणें ) दर्शनमोहरूपी अंधःकाराचा नाश झाला असतां ( दर्शनलाभादवाप्तसंज्ञानः ) सम्यग्दर्शनाच्या लाभामुळें प्राप्त झालेलें आहे, सम्यग्ज्ञान ज्याला असा ( साधुः ) भव्यपुरुष ( रागद्वेषनिवृत्त्यै ) रागद्वेषांची निवृत्ति होण्यासाठीं ( चरणं ) चारित्राला ( प्रतिपद्यते ) स्वीकार करतो.

**अर्थः**—अंधकार अगर वादळ नाहींसें झाल्यानंतर ज्याप्रमाणें प्रकाश व ऊन हें दोन्ही अनुभवावयास मिळतात, त्याचप्रमाणें दर्शन मोहनीय

कर्मांचा-मिथ्यात्वाचा उपशम-क्षय अथवा क्षयोपशम झाल्यानें सम्यग्दर्शन व सम्यग्ज्ञान हें एकदम उत्पन्न होतात. या दोहोंचा लाभ झाल्यानें रागद्वेषादिक षड्रिपूंचा नाश करण्यासाठीं भव्य जीव सम्यग्चारित्राचें अवलंबन करतो. सम्यग्दर्शन व सम्यग्ज्ञान हें एकदम उत्पन्न होतात. यामुळें कित्येक आचार्यांनीं धर्म **रत्नत्रयमय** न मानतां सम्यग्दर्शन व चारित्र हें दोन मिळून मुक्तीचा वा सुखाचा मार्ग आहे असें मानिलें आहे.

अनादि कालापासून दर्शन मोहनीयकर्मानें-मिथ्यात्वानें जीवाला संसारांत गुरफटून टाकिलें आहे. संसार-चक्राच्या भोवऱ्यांतून त्याची सुटका होत नाहीं. परंतु मिथ्यात्वाचा उपशम, क्षय वा क्षयोपशम झाला कीं सम्यग्दर्शनाची प्राप्ति होतें. सम्यग्दर्शनाच्या हातांत हात घालून अगर त्याच्या पाठोपाठ सम्यग्ज्ञान येते. सम्यग्ज्ञानप्राप्तिमुळें खरें, कल्याणकारी व दुःखकारी काय आहे याचें ज्ञान जीवाला होते. राग म्हणजे कोणत्याहि इष्ट पदार्थाबद्दल लोभ, प्रेम वा अनुराग आणि द्वेष म्हणजे कोणत्याहि अनिष्ट पदार्थाबद्दल वैर व अप्रीति होय. लोभ व मोहादि षड्रिपूंचा त्याग केल्याशिवाय खऱ्या व चिरंतन आत्मिक सुखाचा लाभ होणार नाहीं, हें त्याला कळून चुकतें. रागद्वेषादि षड्रिपूंचा नाश करण्यासाठीं तो जीव चारित्र्याचा आश्रय करितो. चारित्रवान होण्याच्या मार्गाला लागतो.

आचार वा चारित्र म्हणजे संयम. मन, वचन व शरीर याची अशुभकृत्याकडे जी प्रवृत्ति होते, त्या प्रवृत्तिला आळा घालणें याला संयम म्हणतात. मन ताब्यांत ठेवणें; सदाचार प्रवृत्त बनणें म्हणजेच संयम. चारित्राच्या या अध्यायांत मन ताब्यांत ठेवण्याचे निरनिराळे उपाय सांगितलेले आहेत व त्या प्रमाणें घडणाऱ्या वर्तनाला आचार वा चारित्र्य असें म्हटलें आहे.

लोकाचार व धर्माचार असें आचाराचें दोन मुख्य भेद आहेत. लोकाचार परिवर्तनक्षम आहे, धर्माचार तसा नाहीं; लोकाचार परिवर्तनक्षम

असल्यानें हा आचार निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या स्वरूपांत दिसतो. लोकाचारालाच अनेकवेळां धर्म असें चुकीनें समजलें जातें. लोकाचार हा परिवर्तनशील वा परिवर्तनक्षम आहे असें जेव्हां समजलें जातें तेव्हां तें धर्माचाराला विरोधी असतां कामा नये. तसें न होईल तर लोकाचाराच्या आड दडून धर्माचाराला धाब्यावर बसविण्याचा अश्लाघ्य प्रयत्न होणारच नाहीं असें नाहीं. खावें, प्यावें व चैन करावी. देह एकवार जळला म्हणजे संपलें, पुनर्जन्म नाहीं. पाप व पुण्य नाहीं, असें मानून चैन करण्याचा आचार हा परिवर्तनशील लोकाचारांत येणार नाहीं.

मात्र प्रत्येक लोकाचार हा धर्माचा पूरक आहे, अशी वृथा समजूत करून घेतल्यानें लोकाचाराचे पलीकडे जाऊन धर्माचाराच्या दारांत जाण्यापूर्वीच आपली सर्व-शक्ति खर्च व्हावयाची.

विश्वधर्म व व्यवहार-धर्म असे धर्माचे दोन भेद पाडिले जातात. धर्माचार व लोकाचार हे व्यवहारधर्माचे दोन भेद होत; व यापैकीं लोकाचार हा परिवर्तनशील आहे. मन, वचन व शरीर यांच्या अशुभ कृत्याकडे होणाऱ्या प्रवृत्तीला आळा घालणें हा धर्माचार आहे. अणुव्रतादिकांचें पालन यांचा समावेश धर्माचारांत होतो. शुचिर्भूतता इत्यादिकांचा समावेश व्यवहारधर्मात होतो.

## रागद्वेषादिकांच्या नाशांत चारित्राचा जन्म.

**रागद्वेषनिवृत्तेर्हिंसादिनिवर्तना कृता भवति।**
**अनपेक्षितार्थवृत्तिः कः पुरुषः सेवते नृपतीन् ॥४८॥**

**अन्वयार्थः**—रागद्वेषांची निवृत्ती झाली असतां (हिंसादिनिवर्तना) हिंसादिक पांच पापांची निवृत्ति (कृता) केल्यासारखी (भवति) होते. (अनपेक्षितार्थवृत्तिः) ज्याला कोणत्याही फलाची इच्छा नाहीं असा (कःपुरुषः) कोणता पुरुष (नृपतीन्) राजाची (सेवते) सेवा करील?

**अर्थः**—सत्ता, संपत्ति व कीर्ति इत्यादिकांबद्दल ज्याला अपेक्षा नाहीं, तो राजेलोकांची नोकरी व सेवा कशाला करील ? त्याचप्रमाणें षड्रिपूंचा क्षयोपशम झाल्यावर तो हिंसादिक पापकर्मे करण्यास उद्युक्त कां होईल ? होणार नाहीं. हिंसादिक पांच पापांचें मूळ कारण रागद्वेषादि षड्रिपूंच्या अस्तित्वांत आहे. तें कारण नष्ट झालें कीं, हिंसादि पातकें घडणार नाहींत. रागद्वेषादि षड्रिपू व हिंसादि पांच पातकें यांचा हा कार्यकारणभाव संबंध आहे. ते परस्परावलंबी आहेत. रागद्वेषादि षड्रिपूंचें अस्तित्व ज्या प्रमाणांत कमी कमी होत जाईल त्या प्रमाणांत हिंसादि पांच पातकांचेंही प्रमाण कमी कमी होत जाईल.

'**अहिंसा परमो धर्मः**' म्हणजे हिंसा न करणें हाच सर्वश्रेष्ठ धर्म आहे. रागद्वेषादि षड्रिपूपासून जितकें जितकें दूर राहतां येईल त्या त्या प्रमाणांत अहिंसादि पांच पातकेंही कमी कमी होत जातील. या पांच पातकांचा अन्योन्य संबंध कसा आहे, हें समजून घेतल्यास यापैकीं अहिंसा धर्मच श्रेष्ठ-धर्म कां ? याचीही कल्पना येण्यास मदत होईल. हिंसा या शब्दाची व्याख्या काय ? याचें यासाठीं प्रथम ज्ञान झालें पाहिजे. केवळ प्राणिमात्रांचा वध एवढाच अर्थ हिंसा या शब्दाचा नाहीं. एखाद्याचें मन दुखेल असें कृत्य केल्यास तें कृत्यही हिंसा या सदराखालीं येतें. आपण ज्या वेळीं एखाद्यावर रागावतो त्यावेळीं त्याचें मन दुखविलें जातें, एखाद्याचा ऐवज चोरतो, तेव्हां आपला ऐवज गेल्याबद्दल त्याला दुःख होतें व त्या दुःखाला चोरीमुळें आप-णच कारणीभूत होतो. जेव्हां दुसऱ्याच्या स्त्रीचा अभिलाष धरितो तेव्हांही तिच्या नवऱ्याला अगर आप्तेष्टांना दुःख होतें व याला कारण ती स्त्री नसून आपला अभिलाषच कारणीभूत आहे. धनदौलत मिळविली, परिग्रह वाढविला कीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष इतराच्या धनाचें हरणच करावें लागतें. या अपहारा-मुळें त्याला दुःख होतें.

वर जी चर्चा केली आहे, तीवरून असें दिसून येईल कीं हिंसादि पांच पातकांतील शेवटच्या चार पातकांपैकीं कोणतेंही पातक घडलें तरी हिंसेचें पातक घडतच असतें. या दृष्टीनें विचार केल्यास अहिंसा धर्मच सर्वश्रेष्ठ धर्म आहे, असें दिसून येईल.

मग इतर अणुव्रतादिकांची जरूरी ती कां ! आचार्य पद्मनंदि यांच्या श्रावकाचारांत याचा खुलासा मिळतो.—

यतीनां श्रावकाणां च व्रतानि सकलान्यपि ।
एकाऽहिंसाप्रसिध्यर्थं कथितानि जिनेश्वरैः ॥ ४० ॥

**सारांशः**—केवळ अहिंसा धर्माच्या सिद्धिसाठीं इतर व्रतें पाळावींत असें जिनप्रभूंनीं सांगितलें आहे. उदाहरणार्थ शक्तिवर्धक औषधांत लोह अधिक प्रमाणांत असतें व त्याला पूरक इतरही द्रव्यें असतात. अशा औषधाला कित्येक वेळां एकच नांव असतें व कित्येक वेळां संमिश्र नांव असतें; मात्र संमिश्र नांवाचा हेतु मुख्य औषधी द्रव्याला प्राधान्य देण्यासाठींच असतो. तद्वतच अहिंसा धर्माबरोबरच सत्यादि धर्मांचा उल्लेख येतो. आचार्य पद्मनंदी यांनीं दिलेलें उदाहरण विचारार्ह आहे. हारांतील प्रत्येक फूल सुंदर व सुगंधयुक्त असतें. त्यांचा सुमनोहार बनवितांना दोरीचा आश्रय घ्यावा लागतो. हार बनविण्यास जशी दोरी तद्वतच अहिंसा धर्माच्या आधाराविना इतरांची अवस्था. अहिंसाधर्माशिवाय इतर धर्म खुलून दिसत नाहींत.

## चारित्राचें लक्षण.

**हिंसानृतचौर्येभ्यो मैथुनसेवापरिग्रहाभ्यां च ।**
**पापप्रणालिकाभ्यो विरतिः संज्ञस्य चारित्रम् ॥४९॥**

**अन्वयार्थः**—(पापप्रणालिकाभ्यो) पापाच्या नलिकेप्रमाणें असणाऱ्या अर्थात् पापाश्रवास कारणीभूत अशा (हिंसानृत्यचौर्येभ्यो) हिंसा, असत्य आणि चोरीपासून (च) तसेंच (मैथुनसेवापरिग्रहाभ्यां) कुशील व परिग्रहा-

पासून ( विरतः ) विरक्त होणें हें ( संज्ञस्य ) सुज्ञ पुरुषाचें ( चारित्रम् ) चारित्र ( अस्ति ) होय.

**अर्थः**—हिंसा, असत्य, चोरी, कुशील-मैथुन सेवन व परिग्रह हीं पापांचीं-अशुभाश्रवांचीं-कारणें आहेत. या पांचही पापांचा एकदेश-अंशतः वा सर्वथा त्याग करण्यानें सम्यग्चारित्राची प्राप्ति होते. ह्मणजे या पातकांच्या त्यागाला सम्यग्चारित्र असें ह्मटलें आहे. हिंसादिक कृत्यामुळें पातक घडतें ह्मणून हिंसादिक पांच कृत्यांनां गटाराची उपमा दिली आहे. गटारांतून जशी घाण वाहत जाते व येते, त्याचप्रमाणें हिंसादि पांच पातकामुळें पाप जडतें.

या पांच पातकांबद्दल वैदिक धर्मातील विचारांची ओळख करून दिल्यास कोणी कोणाची नक्कल केली आहे हें पहावयास मिळेल, अगर दोन विचारी लोकांच्या विचारांत साम्य नेहमींच कसें आढळून येतें हें तरी कळेल. वैदिक धर्मांत **पातंजल योगशास्त्राला** मानाचें स्थान आहे. पातंजल मुनीनें हा ग्रंथ लिहिला असल्यानें त्याला पातंजल योगशास्त्र असें ह्मटलें आहे. या ग्रंथांत चित्तवृत्ति निरोध ह्मणजे योग अशी योगाची व्याख्या केली आहे. चित्तवृत्तीचा निरोध-मन एका विषयावर स्थिर करणें-हें पातंजल योगशास्त्राचें ध्येय आहे. (१) यम (२) नियम (३) आसन (४) प्राणायाम (५) प्रत्याहार, ही योगाचीं पांच बहिरंग साधनें व (१) धारणा (२) ध्यान (३) समाधि अशीं तीन अंतरंग मिळून योगाचीं आठ अंगें सांगितलीं आहेत. यामुळें त्रिविध तापानें तापलेला ( जन्म, जरा व मृत्यु हे त्रिविध ताप ) जीव संसारचक्रांतून सुटतो, व तो कैवल्यपद गांठतो. या कैवल्यपदालाच जैनधर्म परमेष्ठीपद-मोक्ष-असें ह्मणतो.

यमनियमादि हीं योगाचीं पांच बहिरंग साधनें सांगितलीं आहेत. त्याचा थोडासा अधिक खुलासा केल्यास जैनधर्मीतील पांच पातकांशीं त्यांचा संबंध कसा आहे, हें अधिक खुलाशानें कळून येईल; कारण वरील नांवावरून पूर्ण बोध होत नाहीं.

**यमः**—(१) अहिंसा (२) सत्य (३) अस्तेय (४) ब्रह्मचर्य व (५) अपरिग्रह हें पांच यम होत. असें पातंजल योगशास्त्रांत सांगितलें आहे. या पांच पातकांचा उल्लेख वरील श्लोकांत आचार्य समंतभद्र यांनीं केलाच आहे.

**नियमः**—(१) शौच, (२) संतोष, (३) तप, (४) स्वाध्याय व (५) ईश्वरप्राणिधान याही गुणांचा श्रावकाचाराच्या निरनिराळ्या अंगांत समावेश झाला आहे.

वर योगाचे जे आठ गुण सांगितले आहेत, त्यांच्या पालनानें चित्त-वृत्तीचा निरोध होतो. चित्ताची व मनाची एकाग्रता झाली कीं, त्रिविध संसार-तापांतून जीव मुक्त होतो. संसाराच्या फेऱ्यांतून सुटका होणें यालाच मोक्ष किंवा मुक्ति असें जैनधर्मानें मानिलें आहे. सामायिक, सल्लेखना—समाधि ही एकाग्रचित्त होण्याचीं साधनें सांगितलीं आहेत. या तीन अंतरंग साधना-शिवाय हिंसादि पांच पातकांचाहि त्याग मुक्तिसाठींच सांगितला आहे. फरक असेल तर तो अनुक्रम नंबर देण्यांत व त्या गुणांची चर्चा निरनिराळ्या प्रकरणांत करण्यांत आहे. अर्थात् हा फरक विषयाच्या मांडणीवर व ग्रंथ-काराच्या आवडीनिवडीवर आहे.

मनु अ. १० श्लो. ६३

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**एतं सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः ॥**

याज्ञवल्क्य—

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**दानं दया दमः शान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥**

पं. आशाधरांच्या सागारधर्मामृतांत जवळ जवळ वरील प्रकारचाच उपदेश आढळतो. आचार्य समंतभद्र यांची विषयांची मांडणी अधिक सुबोध, शास्त्रीय व पद्धतशीर असल्यानें त्यानीं अहिंसा, सत्य, अस्तेयादिक पांच

अणुव्रतांना स्वतंत्र कल्पून त्यांचें विवेचन केलें आहे. दान वगैरे संबंधीं स्वतंत्र विचार केला आहे. वरील दोन वैदिक धर्मवचनांत भेसळ दिसत असली तरी धर्मांच्या या सर्व प्रकारचा समावेश जैनधर्मीत केला आहे. मनु व याज्ञवल्क्य यांचा काल विचारांत घेऊन कोणी कोणाची नक्कल केली हें ठरवावें अगर विचारी लोकांचें विचार प्राय: सर्वत्र सारखेच असतात, असें मानिल्यासही हरकत नाहीं.

**गांधी दोहन विचार**—पान ६।७।८ वरील विचारांचा सार—(१) अहिंसा ही मनाची वृत्ति आहे. ज्या वृत्तींत कोठेंही द्वेषाचा गंध सुद्धां असणार नाहीं ती अहिंसा (२) अहिंसेची सिद्धी झाल्याखेरीज सत्याची सिद्धी होणें अशक्य. (३) पूर्ण सत्य व पूर्ण अहिंसा यांत फरक नाहीं. (४) सत्य व अहिंसा हीं नाण्याच्या दोन बाजूप्रमाणें एकाच सनातन वस्तूंच्या दोन बाजू आहेत. (५) प्रेमाचें शुद्ध स्वरूप म्हणजे अहिंसा. (६) अहिंसेंत तीव्र कार्यसाधक शक्ति आहे. अहिंसेच्या सान्निध्यांत सर्व वैर शमून जातें. अहिंसेची सिद्धी प्रथम व नंतर सत्याची सिद्धी. पंचाणुव्रतांतही अहिंसेला प्रथम व सत्याला द्वितीय स्थान दिलें आहे.

(मराठी भाषेंतील वेद अशी ज्ञानेश्वरीची ख्याति आहे.) ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांत ज्ञानाचीं लक्षणें बऱ्याच विस्तारानें दिलीं आहेत. त्यांत अहिंसेला प्रमुख स्थान दिलें आहे. मन, वचन, काय, हस्त, पाद, चक्षु इत्यादि कोणत्याही इंद्रियानें दुसऱ्याला दु:ख न देणें अशी अहिंसेची व्याप्ति ज्ञानेश्वरींत केली आहे. जैनधर्माला ही व्याप्ति मान्यच आहे. अव्यभिचारी भक्ति असें ज्ञानाचें दुसरें स्वरूप ज्ञानेश्वरानें सांगितलें आहे. अशी अव्यभिचारी भक्ति म्हणजेच सम्यग्दर्शन. अहिंसेबद्दल ज्ञानेश्वर म्हणतात कीं:—

जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें ॥
राहाटणे ते अहिंसा । रूपजाण ॥ ११४ ॥

अखिल जगाच्या सुखासाठीं हिंसा करूं नका असें ह्मणण्याचा मतितार्थ आहे. याशिवाय अभय, दान, तप, दया, सौजन्य, तेज, क्षमा, धृति, शौच, परोपकार इत्यादि सद्गुणांची ज्ञानामध्यें गणना केली आहे. यावरून वरील गुण ज्याच्या अंगीं आहेत तो खरा ज्ञानी असें ज्ञानेश्वरांचें मत आहे. या उलट अज्ञान किंवा असुर प्रकृतिचीं जीं लक्षणें ज्ञानेश्वरांनीं सांगितलीं आहेत. त्यांत (१) मानित्व-मानसन्मानाची अपेक्षा (२) दांभित्व-स्वस्तुति-दांभिक-पणा (३) अक्षांति-स्तुतीनें फुगणारा (४) अशौच-सत्कर्महीन (५) अहंकार (६) जन्मजरादिकांचें आ भाव-त्रिविध तापांचा विचार न करितां संसारांत रममाण होणें (७) आसक्ति (८) दंभ (९) दर्प (१०) अभिमान (११) क्रोध (१२) पौरुष्य-निष्ठुरता-इत्यादि-कामक्रोधादि षड्रिपू व आठ प्रकारचे मद यांचा ज्ञानेश्वरींत दुर्गुणांत समावेश झाला आहे. शिवाय मद-गर्व यांची संख्या आठच आहे असेंही नाहीं. यावरून आठरा दोष व आठ गर्व हे ज्याच्या अंगीं आहेत त्याला असुर प्रकृतिचा असें ज्ञानेश्वर ह्मणतात.

ज्ञानेश्वरानें जीं स्फुट पद्यें केलीं आहेत, त्यांतील 'आंधळा' या स्फुट विषयांवरील पद खालीं दिलें आहेत.

**पूर्वजन्मीं पाप केलें ते हें बहुत विस्तारलें ।**
**विषयसुख नाशिवंत सेवितां तिमिर कोंदलें ॥**
**चौऱ्यांशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें ।**
**ज्ञानदृष्टी हारपली दोन्ही नेत्र आंधळे ॥**

ज्ञान व अज्ञान यांचा सार या पद्यांत आला आहे. जैनधर्म तरी याशिवाय दुसरें तें काय ह्मणतो ?

श्लोक संख्या ४९ मध्यें व इतरत्र आचार्य समंतभद्र अहिंसाव्रताला प्रथम स्थान देत आले असले तरी अहिंसाव्रतालाच इतरांनीं प्राधान्य दिलेलें आहे, असें मात्र नाहीं.

पद्मनंदी आचार्य श्लोक संख्या ३९ मध्यें लिहितात कीं:—

सर्वे जीवा दयाधारा गुणातिष्ठान्ति मानुषे ।
सूत्रधाराः प्रसूनानां हाराणां च सरा इव ॥ ३९ ॥

**सारांश:**—ज्याप्रमाणें फुलांच्या हारांतील फुलें त्यांना एकात्रित करणाऱ्या दोरीच्या आधारावर असतात, तद्वतच मनुष्याचे इतर गुण जीवदया धर्माच्या आधारावरच अवलंबून आहेत. यावरूनही आचार्य पद्मनंदी हे जविदयेला-अहिंसेलाच-प्राधान्य देतात हें स्पष्ट दिसतें.

थोडासा अधिक विचार केला तर 'अहिंसा परमो धर्मः' ही ह्मण अगर आचार्य पद्मनंदी यांचें मतच अधिक ग्राह्य दिसतें. आचार्य पद्मनंदी इतर व्रताला मानीत नाहींत असें मात्र नाहीं; कारण श्लोक संख्या २४ मध्यें पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें, अशीं श्रावकांचीं बारा अणुव्रतें आहेत असें सांगतात. 'अहिंसा परमो धर्मः' का याबद्दल इतरत्र अधिक खुलासा केला असल्यानें त्याची पुनरुक्ति करण्याचें टाळिलें आहे.

## व्रताचे-चारित्राचे-भेद व त्यांचे पालक.

**सकलं विकलं चरणं तत्सकलं सर्वसङ्ग-विरतानाम् ।**
**अनगाराणां विकलं सागाराणां ससंगानाम् ॥ ५० ॥**

**अन्वयार्थ:**—(तत्) तें (चरणं) चारित्र (सकलं विकलं) सकल आणि विकल रूप आहे (सर्वसङ्गविरतानाम्) सर्व परिग्रहापासून विरक्त असणाऱ्या (अनगाराणां) मुनींचें (सकलं) सकल चारित्र होय (तु) आणि (ससंगानाम्) परिग्रहानें सहित अशा (सागाराणां) गृहस्थांचें (विकलं) विकल चारित्र होय.

**अर्थ:**—सकल व विकल असें चारित्राचें दोन भेद आहेत. सर्व संगत्यागी-मुनी लोकांच्या चारित्राला सकल चारित्र व गृहस्थी लोकांच्या चारित्राला विकल-एकदेश चारित्र असें संबोधिलें आहे. मुनींना चोवीस प्रकारच्या

# चारित्राचे भेद व पोटभेद.

चारित्र

- (१) सकल-सर्वदेश
- (२) विकल-एकदेश
  - (५) अणुव्रतें
    - अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, परिग्रहपरिमाण,
    - १ २ ३ ४ ५
  - (३) गुणव्रतें
    - दिग्व्रत, अनर्थदंडव्रत, भोगोपभोगपरिमाण
    - ६ ७ ८
    - (७) पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति, प्रमादचर्या
    - अ ब क ड इ
  - (४) शिक्षाव्रतें
    - देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास, वैयावृत्य
    - ९ १० ११ १२

परिग्रहाचा त्याग करावा लागतो. चोवीस परिग्रहत्यागामुळें मुनिपदाला मुनी पात्र होतात. मुनी हे महाव्रति सकलचारित्री-असतात व गृहस्थी हे विकल अणुव्रतधारी-असतात. हिंसादि पांच पातकांचा सर्वस्वी जेव्हां त्याग होतो तेव्हां तो महाव्रती होतो. हिंसादि पांच पातकांच्या एकदेश-स्थूल त्यागाला-अणुव्रत असें ह्मणतात.

आचार्य पद्मनंदि यासंबंधीं लिहितात कीं:—

संपूर्णदेशभेदाभ्यां स च धर्मो द्विधा भवेत् ।
आद्ये भेदे च निर्ग्रंथा द्वितीये गृहिणः स्थिताः ॥ ४ ॥

**सारांश:**—रत्नत्रय धर्माचे सकल व एकदेश असे दोन भेद आहेत. सकल हा निर्ग्रंथ मुनीसाठीं व एकदेश हा गृहस्थी लोकांसाठीं सांगितला आहे.

तत्वार्थसूत्र, सूत्र २ मधील सूत्र खालीलप्रमाणें आहे—देशसर्वतोऽणुमहती । या सूत्रांत देश-एकदेश व सर्वतः—सकल—असे धर्माचे दोन भेद आहेत, असें सांगितलें आहे.

## इहलौकिक व पारलौकिक धर्म.

सकल-निर्ग्रंथ व विकल-गृहस्थी असे चारित्राचे जसे दोन भेद केले आहेत त्याचप्रमाणें विकल-गृहस्थी लोकांच्या चारित्राचे इहलौकिक व पारलौकिक असे दोन भेद केले आहेत.

द्वौ हि धर्मौ गृहस्थानां लौकिकः पारलौकिकः ।
लोकाश्रये भवेदाद्यः परः स्यादागमाश्रयः ॥ १ ॥

**अर्थ:**—लौकिक-इहलोकिचा-धर्म त्या त्या काळाच्या परिस्थितीवर-लोकस्थितीवर अवलंबून असतो. अर्थात् देशकाल परिस्थितीप्रमाणें तो निरनिराळ्या स्वरूपाचा होतो. त्यांत बदल होणें अपरिहार्य असतें. पारलौकिक धर्म हा जैनसिद्धांतास अनुसरून असतो. त्याचें स्वरूप कदापि बदलणार नाहीं.

### बदलतो कोणता व बदलत नाहीं असा धर्म कोणता?

**सर्व एव हि जैनानां प्रमाणं लौकिको विधिः ।**
**यत्र सम्यक्त्वहानिर्न यत्र न व्रतदूषणम् ॥ २ ॥**

**अर्थः**—ज्या लौकिक धर्मामुळें सम्यक्त्वाची हानी होत नाहीं; सम्यक्त्वाला बाधा येत नाहीं अगर व्रतभंग होत नाहीं, असे आचार प्रमाणच आहेत. सम्यक्त्वाला व व्रतांना बाधा येत नाहीं अशा आचारांत बदल करण्यास धर्माची आडकाठी नाहीं. उलट असा झालेला बदल धर्माला मान्य आहे असेंच त्यांचें मत आहे. धर्म परिवर्तनशील आहे असें ज्या ज्या वेळीं ह्मटलें जातें, त्यावेळीं लौकिक धर्मास उद्देशूनच असें ह्मटलें जातें, धर्मतत्वें बदला असें ह्मणणें नसतें.

### अणुव्रताचे-विकल चारित्राचे-भेद.

**गृहिणां त्रेधा तिष्ठत्यणुगुणशिक्षाव्रतात्मकं चरणं ।**
**पंचत्रिचतुर्भेदं त्रयं यथासंख्यमाख्यातम् ॥ ५१ ॥**

**अन्वयार्थः**—( गृहिणां ) गृहस्थांचें ( चरण ) चारित्र ( अणुगुणशिक्षाव्रतात्मकं ) अणुव्रत, गुणव्रत आणि शिक्षाव्रतरूप ( त्रेधा ) तीन प्रकारचें ( तिष्ठति ) आहे. ( त्रयं ) या तीहींचें ( यथासंख्यं ) अनुक्रमानें ( पंचत्रिचतुर्भेदं ) पांच तीन आणि चार असे भेद ( आख्यातम् ) सांगितले आहेत.

**अर्थः**—गृहस्थी लोकांच्या चारित्राचें (१) अणुव्रत (२) गुणव्रत व (३) शिक्षाव्रत असे तीन प्रकारचे भेद मानिले आहेत. अणुव्रताचे पांच, गुणव्रताचे तीन व शिक्षाव्रताचे चार असे एकंदर १२ पोटभेद आहेत. यावरून श्रावकांचीं बारा अणुव्रतें आहेत असें समजलें जातें.

या श्लोकांतील गृही या शब्दाचा अर्थ गृहस्थी असा केला आहे. स्व. वा. पंडित निटवे यांनीं पं. आशाधर यांच्या सागारधर्मामृताचें मराठींत केलेल्या भाषांतरांत पान १८६।१८७ वर गृहस्थाश्रमांचे तीन भेद सांगितले

आहेत. पहिल्या सहा व्रतप्रतिमाधारी श्रावक हे जघन्य, त्यानंतरचे तिघे मध्यम व शेवटचे तीन उत्कृष्ट श्रावक होत असें लिहिलें आहे. शेवटच्या दोन श्रावकांना भिक्षुक-असें ह्मटलें आहे. यति हे भिक्षुकापेक्षां श्रेष्ठ असतात.

श्रावकांतही पाक्षिक व नैष्टिक असे भेद मानिले आहेत. येथें अशी शंका येईल कीं, आचार्य समंतभद्रांनीं पाक्षिक व नैष्टिक असे भेद का मानिलें नाहींत ?

## पंचाणुव्रताचें स्वरूप-लक्षण.

**प्राणातिपातवितथव्याहारस्तेयकाममूर्च्छेभ्यः**
**स्थूलेभ्यः पापेभ्यो व्युपरमणमणुव्रतं भवति ॥ ५२ ॥**

**अन्वयार्थः**—( स्थूलेभ्यः ) स्थूल ( प्राणातिपातवितथव्याहारस्तेय-काममूर्च्छेभ्यः ) हिंसा, असत्य, चोरी, कुशील आणि परिग्रह या ( पापेभ्यः ) पापापासून (यत्) जें ( व्युपरमणं ) विरक्त होणें (तत्) तें ( अणुव्रतं ) अणुव्रत ( भवति ) होय.

**अर्थः**—हिंसादि पांच पातकें स्थूलमानानें-एका अंशानें ( एक देश ) न करणें याला अणुव्रत ह्मणतात. गृहस्थी लोकांना स्थूल हिंसा, स्थूल असत्य, स्थूल चोरी, स्थूल कुशील-मैथुन व स्थूल परिग्रह यांचा त्याग करावयाचा असतो. त्रस व स्थावर जीवापैकीं त्रस जीवाच्या हिंसेचा त्याग श्रावकास असतो. परंतु स्थावर जीवाच्या हिंसेचा त्याग नसतो. राजदंडाच्या भीतिनें स्थूल चोरीचा त्याग त्यास करावा लागतो. स्वस्त्रीपासून तो विरक्त झालेला नसतो, तसेंच धन धान्यादि परिग्रहाचें विशिष्ट प्रमाण बांधून त्या प्रमाणापेक्षां अधिक होईल त्या धनधान्याचा तो त्याग करितो. परिग्रहाचा तो सर्वस्वी त्याग करीत नाहीं. त्यामुळें तो अणुव्रती होतो. संसारांत असतां त्यास महाव्रती होतां येत नाहीं.

संसारत्याग हा सर्वांना शक्य नाहीं व इष्टही नाहीं; परंतु तो केवळ संसारी आहे, म्हणून त्याला हिंसादि पांच पातकांची माफी द्यावी हें म्हणणेंही न्याय्य नाहीं. संसारांत असतांनाही त्याच्यावर कांहीं निर्बंध असणें हें जसें धार्मिक दृष्टया जरूर आहे; तद्वतच सामाजिक व व्यावहारिक दृष्टयाही युक्त आहे. शेती व्यापारादि उपजीविकेच्या साधनांत हिंसा ही घडणारच; म्हणूनच स्थावर-जीव-हिंसेचा त्याग त्यास सांगितलेला नाहीं.

शिवाय महाव्रती होण्यापूर्वी एक पायरी म्हणूनही अणुव्रती होणें इष्ट आहे. तें एकप्रकारें शिक्षणच आहे. अणुव्रति झाल्यानें व्यवहारांत अडथळा उत्पन्न होणार नाहीं. या दृष्टीनें विचार करितां तीर्थंकर प्रभूंनीं घालून दिलेले हे नियम सर्वतोपरी कसे हितकर व व्यवहार्य आहेत याची स्पष्ट कल्पना येईल.

निरनिराळ्या आचार्यांनीं व शास्त्री पंडितांनीं मांडलेल्या विचारांचा बारकाईनें विचार करितां त्यांत अनेक ठिकाणीं आचारांत अतिव्याप्ति व अव्याप्ति असे प्रकार आढळतात. पं. निटवे यांनीं प्रसिद्ध केलेल्या सागार-धर्मामृतच्या पान १९९ वर जलगालनव्रताचे अतिचार दिले आहेत. जल-गालन हें एकव्रत आहे, असा उल्लेख आचार्य समंतभद्र व पद्मनंदि यांच्या श्रावकाचारांत आढळ होत नाहीं, समंतभद्रांनीं अतिचारांची वट्ट संख्या ७० दिली आहे. रात्रिभोजन व जलगालन यांचा व्रतांत समावेश केल्यास अति-चारांची संख्या ७० पेक्षां बरीच मोठी होईल. जलगालन व्रताचे अतिचार खालीं दिले आहेत.

१ गाळलेलें पाणी चार घटिकानंतर पुनः न गाळणें. २ मळकट कपड्यानें गाळणें ३ गाळल्यानंतर कपड्यांत उरलेले पाणी मूळच्या पाण्यांत न टाकतां दुसऱ्या ठिकाणच्या पाण्यांत टाकणें ४ जमिनीवर पाणी सांडणें. सारांश या अतिचाराच्या बंधनांतून सुटणें प्रायः अशक्यच दिसते. मुनींच्या स्वयंपाकाला जें पाणी वापरलें जातें तें अतिचाराच्या कक्षेंत येतें कीं नाहीं, हें मात्र जरूर पहावें. अतिव्याप्तिचीं अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. असे

आचार तीर्थंकरप्रणीतच आहेत, असें ह्मणणाऱ्यांचें तोंड धरणार कोण!! अहिंसाणुव्रतपालनासाठीं झोंपाळ्यावर बसूं नये व मौनव्रताच्या उद्यापनासाठीं देवळांत एक घंटा बांधावी इत्यादि अनेक चमत्कारिक गोष्टींचा आशाधरांनीं सागारधर्मामृतांत समावेश केला आहे.

अमितगति श्रावकाचारांत रात्रीं भोजनत्याग यास सहावें अणुव्रत मानिलें आहे. श्रीसमंतभद्र आचार्यांप्रमाणेंच आचार्य उमास्वामीही अणुव्रतांची संख्या पांचच मानतात. रात्रींभोजनत्यागाचा त्यांनीं अणुव्रतांत समावेश केलेला नाहीं.

श्रावकांच्या बारा अणुव्रतांचें स्वरूप अगर लक्षणें व त्यांचे अतिचार याबद्दलची माहिती देण्यापूर्वीं तत्वार्थसूत्रांत पांच अणुव्रतासंबंधीं व्यक्त केलेले विचार उपयुक्त होतील असें वाटल्यानें ते सारांशरूपानें दिले आहेत.

पांच अणुव्रतांमध्यें मनाची स्थिरता उत्पन्न व्हावी व या पांच व्रतांचें पालन दृढ व्हावें, व अशी स्थिरता व दृढता उत्पन्न होण्यासाठीं त्यांचें-व्रतांचें-वारंवार स्मरण व चिंतन करीत जाणें जरूर आहे. यासाठीं प्रत्येक अणुव्रताच्या पांच पांच भावना सांगितल्या आहेत. भावना ह्मणजे एखाद्या गोष्टीचें वारंवार चिंतन करणें.

अहिंसाव्रताच्या भावना:—(१) वाग्गुप्ति, (२) मनोगुप्ति, (३) ईर्यासमिती, (४) आदान-निक्षेपण समिती, (५) आलोकित पान-भोजन.

सत्यव्रताच्या भावना:—(१) क्रोधप्रत्याख्यान, (२) लोभप्रत्याख्यान (३) भीरुत्व-प्रत्याख्यान (४) हास्यप्रत्याख्यान (५) अनुवीचिभाषण.

अचौर्य व्रताच्या भावना:—(१) शून्यागारवास, (२) विमोचितवास, (३) परोपरोधाकरण, (४) भैक्ष्यशुद्धि (५) सधर्मीविसंवाद.

ब्रह्मचर्याणुव्रताच्या भावना:–(१) स्त्रीराग कथाश्रवण त्याग, (२) तन्मनोहरांगनिरीक्षणत्याग (३) पूर्वरतानुस्मरणत्याग, (४) वृष्येष्टरसत्याग, (५) स्वशरीरसंस्कार इत्यादि.

तत्वार्थसूत्रांत ज्या भावनांचा त्याग करण्यास सांगितलें आहे त्यापैकीं कांहींचा आचार्य श्रीसमंतभद्र यांनीं अतिचारांत समावेश केला आहे. सदरचे अतिचार घडूं न दिल्यास व तत्वार्थसूत्रांतील भावनांचा त्याग केल्यास पांच अणुव्रतें निरपवाद पालन करण्यास मदत होईल.

## अणुव्रतें पांच कीं सहा कीं सात ?

**चारित्रसारांत** अणुव्रतांची संख्या ६ मानिली आहे.

**वधादसत्याच्चौर्याच्च कामाद्‌ग्रंथान्निवर्तनम् ।**
**पंचधाऽणुव्रतं राज्यभुक्तिः षष्ठमणुव्रतम् ॥ ४ ॥**

**अर्थः**—(१) हिंसा, (२) लबाडी, (३) चोरी, (४) मैथुन, (५) परिग्रह व (६) रात्रीं न जेवणें अशीं सहा अणुव्रतें होत.

आठ मूलगुण कोणते याबद्दल आचार्य वचनांत एकवाक्यता नाहीं, हें श्लो. सं. ६६ मधील विवेचनावरून दिसून येईल. सामान्यतः अणुव्रतांची संख्या पांचच देण्यांत आली आहे हें खरें असलें तरी अणुव्रतांच्या संख्येंतही एकवाक्यता नाहीं, हेंही तितकेंच खरें आहे. चारित्रसाराप्रमाणेंच आचार्य अमितगति रात्रिभोजनत्यागासह अणुव्रतांची संख्या सहा मानितात.

अणुव्रतांची संख्या ६ आहे, असें मानिल्यास श्रावकांचीं व्रतें बारा अशीं न मानतां तीं तेरा मानावीं लागेल.

## मूळगुण व उत्तरगुण इत्यादि.

तीन 'म' कार व पांच उदुंबर यांचा त्याग करणाऱ्याला मूळगुण धारक असें कांहीं ह्मणतात. तीन 'म' कार व पांच उदुंबर त्याग हे आठ मूळगुण प्रथम धारण करून नंतरच पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें पाळावयाचीं असतात. ह्मणून या बारा व्रतांना 'उत्तर गुण' असें नामाभिधान कांहींनीं दिलें आहे.

मद्यविरति वगैरे आठ गुण हे प्रथमारंभीचे गुण होत; महाव्रतांच्या अपेक्षेनें लघु-कमी-असणारीं व्रतें, तीं अणुव्रतें होत. अणुव्रताला वाढविणारीं-

वाढीस लावणारीं-तीं गुणव्रतें होत. दुर्व्यापारापासून मनाला निवृत्त करणाऱ्या संवयी करितां व शिक्षणाकरितां जीं व्रतें पालन करावयाचीं त्यांना शिक्षाव्रतें ह्मणतात. अणुव्रतें यावज्जीव पाळावयाचीं असतात व शिक्षाव्रताला कालमर्यादा चालते. यामुळें शिक्षाव्रतें हीं अणुव्रताहून भिन्न आहेत असेंही मानिलें जातें.

वरील विवेचनावरून समंतभद्राचार्यांनीं सांगितलेल्या पांच अणुव्रताशिवाय कांहीं आचार्य रात्रीं भोजन त्याग व कांहीं जलगालन याची सहाव्या अणुव्रतांत गणना करितात. रात्रिभोजनत्यागी व जलगालनी जैन प्रायः सर्वत्र दिसतात. रात्रिभोजन त्याग व जलगालन ही स्वतंत्र अणुव्रतें न मानतां, त्यांचा अहिंसाणुव्रतांत समावेश होतो, असें मानणें युक्त होईल; अगर या दोन्हि व्रतासह अणुव्रतें सात मानल्यासहि हरकत येऊं नये.

### अहिंसाणुव्रताचें लक्षण.

**संकल्पात्कृतकारितमननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ।**
**न हिनस्ति यत्तदाहुस्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ५३ ॥**

**अन्वयार्थः**—( योगत्रयस्य ) मन वचन, काया ह्या तीन योगासंबंधीं असलेल्या ( कृतकारितमनात् ) कृत, कारित आणि अनुमोदनरूप ( संकल्पात् ) संकल्पानें ( चरसत्वान् ) त्रस जीवांचा ( न हिनस्ति ) घात न करणें ( तत् ) यास ( निपुणाः ) व्रतांचा विचार करण्यांत दक्ष असलेले पुरुष ( स्थूलवधाद्विरमणं ) स्थूल वधापासून विरक्त होणें, अथवा अहिंसाणुव्रत असें ( आहुः ) ह्मणतात.

**अर्थः**—त्रस जीवांची—ज्या जीवांना दोन, अगर तीन, अगर चार, अगर पांच इंद्रिये आहेत—अशा जीवांची हेतुपुरःसर मनानें, वचनानें व शरीरानें स्वतः हिंसा न करणें, दुसऱ्याकडून न करविणें अगर कोणी करीत असल्यास अनुमति न देणें, यास अहिंसाणुव्रत असें ह्मणतात. एकेंद्रिय

जीवांच्या हिंसेपासून गृहस्थी लोकांना दूर राहतां येणें शक्य नाहीं. मुनी लोकांना एकेंद्रिय जीवाचीही हिंसा त्याज्य मानिली आहे. एकेंद्रिय जीव ह्मणजे भाजीपाला-वनस्पति वगैरे. संसारी लोकांना खालील ९ प्रकारांनीं हिंसेचा त्याग सांगितला आहे. (१) हेतुपुरःसर मनानें स्वतः त्रस जीवाची हिंसा न करणें (२) दुसऱ्यांकडून न करविणें (३) दुसऱ्यांनीं केलेल्या अशा जीवांच्या हिंसेला चांगलें केलें असें न मानणें व ह्मणणें (४) वचनानें स्वतः हिंसा न करणें-मी ठार मारतो इत्यादि (५) वचनानें दुसऱ्यांकडून त्रस-जीवांची हिंसा न करविणें (६) वचनानें त्रस-जीवांच्या हिंसेला अनुमोदन न देणें (७) शरीरानें त्रस जीवांची स्वतः हिंसा न करणें (८) शरीरानें अशी हिंसा दुसऱ्यांकडून न करविणें (९) शरीरानें अशा हिंसेस पुष्टी न देणें.

हिंसा वा अहिंसा याचा विचार करीत असतां हेतूला व उद्देशाला प्रमुख स्थान देण्यांत आलें आहे. हेतुपुरःसर अथवा रागद्वेषादि कषायांच्या आधीन होऊन केलेला जीवघात, हिंसा या सदराखाली येतो. इंडियन् पीनल कोडांत खून या शब्दाच्या व्याख्येतही हेतूला-उद्देशालाच प्राधान्य दिलें आहे. आचार्य उमास्वामींनीं आपल्या तत्वार्थसूत्रांत हिंसेची व्याख्या केली आहे, ती अशी:–'प्रमत्तयोगात्प्राणव्यपरोपणं हिंसा' ह्मणजे रागद्वेषादि कषायांचें आधीन होऊन जीवघात करणें, याला हिंसा ह्मणावी. रागद्वेषादि कषाय तीव्र झाले, ते मलीन झाले व जीवघात झाला कीं तें कृत्य हिंसा या सदराखालीं येईल. अशावेळीं मनाचें धर्मातच बिघाड होतो; ह्मणून हेतूनें केलेला जीवघातच हिंसा या सदराखालीं येईल.

दुसऱ्या धर्म-ग्रंथांतून हिंसेचे चार भेद केले आहेत, व त्या पैकीं संकल्प-हिंसा गृहस्थी लोकांना वर्ज्य मानिली आहे. आचार्य समंतभद्रांच्या या कृतींत या चार भेदांचा स्पष्ट उल्लेख नाहीं. परंतु हे भेद आचार्यांच्या विचार सरणींतच दिसून येतात.

अहिंसा धर्मासंबंधी कांहीं महत्वाचे वेचे 'महावीर वाणी' या पुस्तकांत दिले आहेत. त्यापैकीं यापुढें कांहीं वचनें दिलीं आहेत.

१ आपल्या सारखेंच सर्व प्राणीमात्रांना जगावें व मरूं नये असें वाटतें. यामुळें प्राणिवध करणें महापाप आहे. २ आपला शत्रू असो वा मित्र असो त्याच्याशीं मित्रत्वानें, व समभावानें वागा. सर्व प्रकारची लहानमोठी हिंसा टाळणें महादुष्कर कार्य आहे. ( दुष्कर कार्य करणारेच महात्मे होतात. )

(३) सम्यक्-बोध ज्याला झाला आहे असा ज्ञानी व बुद्धिवान मनुष्य हिंसेमुळें उत्पन्न होणाऱ्या वैरवर्धक व महाभयंकर दुःखाचें ज्ञान झाल्यानें, हिंसेसारख्या पापकर्मापासून आपला बचाव करून घेतो अगर त्यानें बचाव करून घ्यावा.

सारांश आपल्यावरून जगाला ओळखावें. आपणांस कोणी त्रास दिला, मारहाण केली व आपला कोणी द्वेष केला तर आपणांस जसें दुःख होतें, तसेंच दुःख दुसऱ्यांना आपण त्रास दिला, मारहाण केली व इतरांचा द्वेष केला तर त्यांना होतो, याची जाणीव ठेवावी. सुखानें जगण्याचा हक्क जसा आपणांस आहे, तसेंच इतरांनाही सुखानें व विनात्रास जगण्याचा हक्क आहे हें जाणून जगण्याच्या त्यांच्या हक्काच्या आड कोणीही सूज्ञानें येऊं नये. जगण्याचें हें स्वातंत्र्य इतर सर्वांना द्या म्हणजे तुम्हांला त्या स्वातंत्र्याची प्राप्ती आपोआपच होईल. केवळ धार्मिक दृष्टयाच अहिंसाणुव्रताच्या पालनाचें महत्व आहे, असें नाहीं तर त्याच्या पालनामुळें समतेची वाढ, समाजांतील द्वेष, ईर्षा व असूयादिकांना पायबंद आणि व्यवहारांत ऋजुता इत्यादिक अनंत फायदे होऊन स्वर्गच या पृथ्वीवर उतरेल.

या अहिंसाधर्माच्या जोरावरच हिंदुस्थानलाच काय पण अखिल जगांतील प्राणिमात्रांना राजकीय स्वातंत्र्य देण्याची हिय्या म. गांधींनीं धरली नाहीं काय ?

## अहिंसाणुव्रताचे अतिचार.

**छेदनबन्धनपीडनमतिभारारोपणं व्यतीचाराः**
**आहारवारणापि च स्थूलवधाद् व्युपरतेः पञ्च ॥ ५४ ॥**

**अन्वयार्थः**—( छेदनबन्धनपीडनं ) छेदणें, बांधणें, त्रास देणें, ( अतिभारारोपणं ) जास्त ओझें लादणें ( अपि च ) तसेंच ( आहारवारणा ) आहारांचा निरोध करणें ( 'एते' पंच ) हे पांच ( स्थूलवधाद् व्युपरतेः ) स्थूल हिंसेच्या त्यागाचे—अहिंसाणुव्रताचे ( व्यतीचारः ) अतिचार ( सन्ति ) आहेत.

**अर्थः**—अहिंसाणुव्रताचे यापुढील पांच अतिचार आहेत. व्रताला दोष लागणें यास अतिचार ह्मणतात, व व्रत घेऊन त्याचें पालन न करणें यास भंग ह्मणतात. अणुव्रताची प्रतिज्ञा केल्यानंतर अंतर्वृत्तीनें अथवा बहिर्वृत्तीनें जो एक-देशभंग-अंशतःभंग होतो त्याला अतिचार ह्मणतात. संपूर्ण व्रत-भंग होत नाहीं पण त्याचा अंशतः भंग होतो ह्मणून त्यास अतिचार ह्मणतात.

(१) छेदनः—नाक, कान इत्यादि अवयव कापणें-तोडणें, टोचणें इत्यादि. (२) बंधनः—दोरीनें वगैरे बांधणें (३) पीडनः—काठी, चाबूक इत्यादिकांनीं मारणें (४) अतिभारारोपणः—शक्तिपेक्षां-प्रमाणाबाहेर-अधिक ओझें लादणें. (५) आहारवारणाः—अन्न व पाणी वगैरे सर्वस्वी अगर कांहीं काल न देणें.

वरील पांच कृत्यामुळें अहिंसाणुव्रताचा भंग पूर्णपणें होत नाहीं; तथापि अहिंसाणुव्रत निर्दोष रीतीनें व पूर्णपणें पाळिलें असेंही होत नाहीं; ह्मणून या पांच कृत्यांना अहिंसाणुव्रताचे अतिचार असें ह्मटलें आहे.

या पांच अतिचारामुळें त्रस जीवाला त्रास होतो; परंतु त्यांची हिंसा-जीवघात-होत नाहीं. मागील श्लोकांत ज्या ९ प्रकारच्या हिंसात्यागाचा नियम सांगितला आहे, तोच नियम या अतिचाराच्या बाबतींतही मानणें भाग आहे, असें वाटतें.

श्लोक संख्या ४९ खालीं वैदिक धर्मांतील कांहीं सदृश आधार दिले आहेत. अहिंसा धर्म संपूर्णतया पालन करणें अशक्य आहे व यामुळें अहिंसा-धर्म साक्षेप आहे असेंही प्रतिपादन करणारीं वैदिक धर्मांत कांहीं वचनें मिळतात.

महाभारतात:—

सत्वैः सत्वा हि जीवन्ति दुर्बलैर्बलवत्तराः।
तसेंच:— अप्यरण्यसमुत्थस्य एकस्य चरतो मुनेः।

**सारांशः**—तक्रार अशी कीं मोठा मासा लहान माशाला खातो, बलवान निर्बलाला खातो. संसार त्याग करून अरण्यवास पतकरलेल्या मुनी-नांही हिंसेवाचून जगणें शक्य नाहीं. इत्यादि इत्यादि.

तिसरें एक वचन असें आहे कीं—

सूक्ष्मयोनिनिभूतानि तर्कगम्यानि कानिचित्।
पक्ष्मणोऽपि निपातेन येषां स्यात् स्कंधपर्ययः॥

**सारांश**—जगांत असे अनंत सूक्ष्म व नाजुक प्राणी आहेत कीं, केवळ डोळ्याची पापणी हालविली तरी शेंकडों जीवजंतु अर्धमेले होतात.

वर जे आधार दिले आहेत, ते किती भ्रामक आहेत याची सहजीं कल्पना येईल. पापणीच्या हालचालीनें अर्धमेले होण्याइतके सूक्ष्म व नाजूक जीवजंतु आहेत, हें अमान्य नाहीं; परंतु हिंसा ह्मणजे काय? हिंसेची जैन धर्मानें व्याख्या काय केली आहे? याचा विचारच मुळीं झालेला नाहीं.

जीव घ्यावा, या हेतूनें प्रेरित होऊन केलेल्या जीवघातालाच हिंसा ह्मटली आहे. पापणी हालवण्यांत अगर श्वासोच्छ्वास घेण्यांत जी हिंसा होते, त्यांत दुष्ट हेतूचा अभाव आहे, त्यामुळें जीवघात झाला तरी त्यांत हिंसेचा दोष येत नाहीं. मुनींना हिंसेवांचून जगतां येतें, हें जैन मुनींच्या जिवंत उदाहरणाकडे पाहिल्यास कळून येईल; मग उगाच कुतर्क कशाला??

पं. आशाधर यांनीं अहिंसा अणुव्रत विशेष निर्मल ठेवण्याचा विधि म्हणून चवथ्या अध्यायांतील श्लो. सं. २२ मध्यें १५ प्रमाद वर्ज्य करण्यास सांगितलें आहेत. पांडित्याची एक चुणुक म्हणून ते पुढें दिले आहेतः-क्रोध, मान, माया, आणि लोभ हे चार कषाय (५) भक्तकथा (६) स्त्रीकथा (७) राजकथा व (८) देशकथा अशा चार विकथा (९) निद्रा (१०) प्रणय (स्नेह) आणि पांच इंद्रिये मिळून १५ प्रमाद आहेत. यांचा निग्रह करून सर्व जीवावर सतत दया करावी. पं. आशाधरांनीं या अतिचारांत 'वध' या नांवाचा अतिचार सांगितला असून त्याचा ताडन या अतिचारांतील हेतु व अर्थ समाविष्ट केला आहे.

## सत्याणुव्रताचें स्वरूप

**स्थूलमलीकं न वदति न परान् वादयति सत्यमपि विपदि**
**यत्तद्वदन्ति सन्तः स्थूलमृषावादवैरमणम् ॥ ५५ ॥**

**अन्वयार्थः**—(यत्) जें (स्थूलं) स्थूल (अलीकं) खोटें (न वदति) न बोलणें (परान्) दुसऱ्यांना (न वादयति) बोलावयास न लावणें व (विपदे) संकटाचें वेळीं (सत्यं अपि) खरेंदेखील (न वदति) न बोलणें व (परान्) दुसऱ्यास (न वादयति) बोलावयास न लावणें (तत्) तें (सन्तः) थोर पुरुष (स्थूलमृषावादवैरमणं) स्थूल सत्याविरत अर्थात् सत्याणुव्रत आहे असें (वदन्ति) म्हणतात.

**अर्थः**—जो स्वतः स्थूल असत्य बोलत नाहीं, दुसऱ्यांस बोलावयास लावीत नाहीं, तसेंच धर्मावर संकट आलें असतां अगर दुसऱ्याचा प्राणघात अगर इतर हानी होणारी असल्यास खरेंही बोलत नाहीं, त्यास सत्याणुव्रती असें म्हणतात.

क्रोध, मान, माया व लोभादिक विकारांच्या आधीन होऊन दुसऱ्याचा घात होईल, अपमान होईल, हानी होईल असें बोलणें निंद्य आहे.

मनाचा समतोलपणा सुटतो, मनावर संयम-ताबा-राहात नाहीं; व त्यामुळें शुद्ध श्रद्धा राहत नाहीं.

रोग्याला रोगी, नपुंसकाला नपुंसक, कान्याला काना, व पांगळ्याला पांगळा आणि चोराला चोर असें ह्मणणें हें जरी खरें असलें तरी तें अप्रिय आहे, ज्या त्या व्यक्तीला तें दुःख देणारें असल्यानें तसें बोलूं नये, कारण आपलें भाषण हितकारी आणि सत्य असावें, यामुळें या व्रताला स्थूल-सत्याणुव्रत असें ह्मटलें आहे.

येथें अशी शंका येईल कीं कल्पित कादंबरी वा गोष्ट, लघुकथा, राजकीय विषयावरील लेख, राजकारण ( Diplomacy ) वगैरे अगर प्रस्तुत लिखाणासारखें संभवनीय सदोष लिखाण, यामुळें या अणुव्रताचा भंगच होईल काय ? व्रतभंग होणार नाहीं, असेंच उत्तर द्यावें लागेल. खरें बोलण्यानें कित्येक वेळां अनेकावर मोठमोठालीं संकटें येणाचा संभव असतो, ही नित्याच्या व्यवहारांतील अनुभवाचीच गोष्ट आहे. दूर दृष्टीनें विचार करून या अणुव्रताची योजना केली आहे.

वैदिक धर्मात सत्याचे ह्मणून खालील अपवाद दिले आहेत—विवाह मैथुन, प्राणावर बेतल्यावेळीं, सर्वस्व जाण्याच्या प्रसंगीं, विनोद व राष्ट्रहित अशा प्रसंगीं खोटें बोलण्यास हरकत नाहीं असें ह्मटलें आहे. एखाद्याचा विवाह संबंध जमविण्याच्या प्रसंगीं आणि 'रतिसंप्रयोगे' मैथुनाच्या वेळीं खोटें बोलण्यास परवानगी देणारा धर्म सत्याचा पाठिराखा कीं सत्याचा मारकरी, हें वाचकानींच ठरवावें.

वैदिक धर्मात सत्यधर्माची कसोटी खालील वचनांत दिली आहे.

**यद् भूतहितमत्यन्तम् तत्सत्यमिति धारणा ।**

**सारांश:**—अखिल प्राणिमात्राच्या आत्यंतिक-कमालीच्या सुखासाठीं हितासाठीं सत्य आहे. त्याची व्याप्ति वैयक्तिक सुख, हित व उद्धार यासाठींच केवळ नाहीं. यासाठींच 'न हि सत्यात्परो धर्मः' सत्यासारखा उत्कृष्ट कल्याण-

कारी व हितकारी दुसरा धर्म नाहीं असेंही म्हटलें जातें. श्रद्धा व भक्तियुक्त बुद्धीनें व रागद्वेष विरहित अधिकांत अधिक काळ जो विचार टिकतो व त्याप्रमाणें आचार घडतो त्यास सदाचार व सत्कर्म म्हणतात.

## सत्याणुव्रताचे अतिचार.

**परिवादरहोभ्याख्या पैशून्यं कूटलेखकरणं च ।**
**न्यासापहारितापिच व्यतिक्रमाः पंच सत्यस्य ॥ ५६ ॥**

**अन्वयार्थः**—( परिवादरहोभ्याख्यापैशून्यं ) परिवाद, रहोभ्याख्या, पैशून्य ( कूटलेखकरणं ) खोटे लेख करणें किंवा दस्तऐवज करणें ( अपि च ) तसेंच ( न्यासापहारिता ) ठेव गडप करणें ( ' एते ' पंच ) हे पांच (सत्यस्य) सत्याणुव्रताचे ( व्यतिक्रमाः ) अतिचार ( ' सन्ति ' ) आहेत.

**अर्थः**—(१) खोटा-मिथ्या-उपदेश करणें; (२) एकांतांतील गुप्त गोष्टींना वाच्यता देणें (३) चहाडी अगर निंदा करणें (४) खोटा लेख-दस्तऐवज-लिहिणें (५) ठेवींच्या रकमेचा कमी अधिक प्रमाणांत-अंशतः अगर सर्वस्वी अपहार करणें, असे हे सत्याणुव्रताचे पांच अतिचार आहेत. स्वर्ग वा मोक्ष-प्राप्ति होण्यास चारित्र हें कारण आहे. खऱ्या चारित्राचा उपदेश न करितां भलत्याच गोष्टीला चारित्र माना, असें सांगणें हा मिथ्या उपदेश आहे. वरील कृत्यामुळें अतिचाराचा दोष येतो.

या व्रताचे इतरत्र अतिचार कोणकोणते मानिले आहेत, या जिज्ञासेनें पं. आशाधरांच्या सागारधर्मामृतांतील चवथ्या अध्यायांतील ४५ वा श्लोक पाहातां त्यांत अतिचारांची संख्या पांचच दिलेली दिसली; तथापि आचार्य समंतभद्रांनीं दिलेल्या अतिचाराहून कांहींशीं भिन्न दिसल्यानें ती खाली दिली आहेत.

(१) मिथ्यादिश् म्हणजे परिवाद म्हणता येईल.

(२) रहोभाख्या-हा अतिचार दोघांनीही मानला आहे.

(३) कूटलेखकरणं--उभयतांना मान्य आहे.

(४) न्यस्तांशविस्मर्तुनुज्ञान ह्मणजेच न्यासापहार.

समंतभद्रांचा पैशून्य व आशाधरांचा मंत्रभेद हे अतिचार सदृश दिसत नाहींत.

सागारधर्मांतील अतिचार व यशस्तिलक यांतील या व्रताचे अतिचार यांत भिन्नता आहे, याची जाणीव पं. निटवे यांना झाल्यानें मराठी भाषांतरांत या विरोधाचा समन्वय करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. त्यांनीं लिहिलें आहे कीं, ' याचें समाधान असें कीं, यशस्तिलकांत सांगितलेलें अतिचार जरी वरील श्लोकांत ( श्लोक २४५ ) सांगितलेल्या अतिचाराहून निराळे आहेत, ह्मणून यांतील योग्य अतिचार कोणते याबद्दल संशय येतो; तरी पुढें " याहून निराळे अतिचार जे असतील ते आपण तर्कानें जाणावेत." असें ग्रंथकार लिहिणार आहेत, त्यानें या यशस्तिलकांत सांगितलेल्या अतिचारांचा संग्रह होतो असें समजावें.'

या समाधानानें कोणाचें समाधान होईल तें होवो!! परंतु एक गोष्ट स्पष्ट दिसतें कीं, यशस्तिलक, सागारधर्मामृत व श्रावकाचार यांत या व्रताच्या अतिचाराबद्दल भिन्नता आहे हें स्पष्ट आहे. दुसराहि महत्वाचा प्रश्न हा कीं, जिनेश्वरप्रणित वचनांत हा फरक कां ? शिवाय " याहून निराळे अतिचार जे असतील ते आपण तर्कानें जाणावेत " असें सांगण्यानें तर आणखीही दुसरे अतिचार आहेत अशी साधार समजूत होते. यामुळें समन्वय न होतां मतभिन्नतेचे खिंडार मोठेंच होत जातें.

### अचौर्याणुव्रताचें लक्षण.

**निहितं वा पतितं वा सुविस्मृतं वा परस्वमविसृष्टम् ।**
**न हरति यन्न च दत्ते तदकृशचौर्यादुपारमणम् ॥ ५७ ॥**

**अन्वयार्थः**—( यत् ) जें ( निहितं ) ठेवलेले ( पतितं ) पडलेले ( सुविस्मृतं ) विसरलेलें ( वा ) अथवा ( अविसृष्टं ) न दिलेलें ( परस्वं )

दुसऱ्याचें द्रव्य ( न हरति ) हरण न करणें ( च ) आणि ( न दत्ते ) दुसऱ्यास न देणें ( तत् ) तें ( अकृशाचौर्यात ) स्थूल चोरीपासून (उपारमणं) विरक्त होणें अर्थात अचौर्याणुव्रत ('अस्ति') होय.

**अर्थः**—दुसऱ्यानें ठेवलेलें, दुसऱ्याचें पडलेलें, विसरलेलें किंवा दुसऱ्यानें न दिलेलें धन स्वतः न घेणें, अगर तें घेऊन दुसऱ्यास न देणें, याला अचौर्याणुव्रत असें म्हटलें आहे. जमिनींत अगर इमारतींत दुसऱ्यानें धन पुरुन ठेविलें आहे व तें आपल्या हातीं लागलें व तें आपलें समजून घेतलें कीं चोरी केल्याचें पातक पदरीं येतें. रस्त्यांत व इतरत्र दुसऱ्याची कोणतीही चीजवस्तु सांपडली व आपली म्हणून ठेवून घेतली तरी चोरी केल्याचें पातक लागणार आहे. आपल्याजवळ कोणाची ठेव आहे व हिशो-बांत गफलत केली तरी तें कृत्य चोरी या सदराखालींच येणार आहे.

आचार्य अमितगति आपल्या श्रावकाचाराच्या सहाव्या अध्यायांतील ६१ व्या श्लोकांत म्हणतात कीं—

**यो यस्य हरति वित्तं स तस्य जीवस्य जीवितं हरति ।**
**आश्वासकरं बाह्यं जीवानां जीवितं वित्तम् ॥ ६१ ॥**

**सारांश:**—धन हे मनुष्यमात्राचे बाह्य-प्राण आहेत. धनाचें हरण म्हणजे त्यांचे बाह्य-प्राण हरण केल्यासारखें होणार आहे.

या पुढील ६२ व्या श्लोकांत जें आपलें धन आहे, त्यावरच ज्यानें त्यानें संतुष्ट राहणें जरूर आहे, असेंही दुसरें एक कारण आचार्य अमितगति यांनीं दिलें आहे. समाजस्वास्थाच्या दृष्टीनें हीं दोन्हीं कारणें उपयुक्त आहेत, हें उघड आहे. पिनल कोडांत या कृत्यांना गुन्हा या सदराखालीं घातलें आहे. गुप्तधनाची-भूमिगतधनाची-मालकी सरकारची आहे, असें ठरविणारा कायदा अस्तित्वांत आहे.

आचार्य अमितगतिच्या वरील विचारसरणीशीं तंतोतंत जुळणारी विचारसरणी वैदिक ग्रंथांत आढळ होते ती—

जीवितं धर्मकामौ च धने यस्मात् प्रतिष्ठितौ ।
तस्मात् सर्वप्रयत्नेन धनहिंसां विवर्जयेत् ॥
प्राणिहिंसापरो यस्तु धनहिंसा परस्तथा ।
महादुःखमवाप्नोति धनहिंसा परस्तयोः ॥

**सारांशः**—मनुष्याचा जीव घेतला तर एकच हिंसा होते परंतु त्याची संपत्ति चोरल्यास त्याच्या सर्व कुटुंबियांची हिंसा होते; ह्मणून प्राणिहिंसेपेक्षां धनहिंसा ही अधिक क्रूर व पापमूलक आहे.

धनहिंसेचे दूरगामी परिणाम ठळक करून दाखविण्याचा हा प्रयत्न आहे; कारण गेलेलें द्रव्य परत मिळेल अगर अधिकही मिळवितां येईल. प्राणमात्र एकवारच जातो. संपत्ति ही येतेही व जातेही. व्यासपीठावरील वक्ते आपला विषय जसा फुगवून बिंबवण्याचा प्रयत्न करितात, तसाच हा प्रयत्न नव्हे ?

अन्नशुद्धि, शरीरशुद्धि, पात्रशुद्धि व वस्त्रशुद्धि, सोवळें ओवळें इत्यादिकांकडे दुर्लक्ष करावे असें नाहीं, आरोग्यादिकांसाठीं वरील शुद्धतेबद्दल खबरदारी जरूर घ्यावी. परंतु त्याहिंपेक्षां **अर्थशौच** अधिक महत्वाचे आहे. मनूनें ह्मटलें आहे कीं–' सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् ' । सारांश– बेंगलोर सिल्क फॅक्टरीतील रेशमी कपडा वापरला, पवित्र गंगेचें पाणी सातपदरी फडक्यानें गाळून वापरलें, स्वयंपाक करितांना पवित्र चंदनाचें सर्पण वापरलें व ह्मैसूर चंदनाचा साबण वापरून शरीर स्वच्छ ठेविलें पण अन्यायानें, चोरी करून, विश्वासघातानें, लबाडानें व फार काय श्रमाचा गैरवाजवी फायदा घेऊन पैसा मिळविला; पैसा मिळविण्याच्या बाबतींत शुद्धता ठेविली नाहीं, तर वरील सर्व शुद्धता व्यर्थ आहेत. कारण अर्थशौच हा सर्व श्रेष्ठ शौच आहे.

## कार्तिकेयस्वामीनीं अचौर्याणुव्रताचीं खालील लक्षणें सांगितलीं आहेत.

जो बहुमुल्लं वत्थुं अप्पमुल्लेण णेव गिण्हेदि ।
वीसरियं पि ण गिण्हेदि लाहे थूवेहि तूसेदि ॥ ६३५ ॥

**भावार्थ**:—अधिक किंमतीची वस्तु असतां ती कमी किंमतीस विकत घेऊं नये. चार ठिकाणीं जाऊन चौकशी न करितां एखादा मनुष्य एखादी वस्तु विकण्यास आपल्याकडे आला व त्या मालाची योग्य ती किंमत द्या असें ह्मणाला; अशावेळीं पांच रुपये किंमतीचा माल चारच रुपये किंमतीचा आहे, असें सांगून तो चार रुपयास विकत घेतला तर ती चोरी होते. दुस-ऱ्याची विसरलेली अगर पडलेली वस्तु घेणें, हीं चोरी आहे. अज्ञाणी अगर नडलेल्याच इसमाचा अधिक किंमतीचा माल कमी किंमतीस घेणें, हीहि चोरीच आहे.

ज्या कार्तिकेय स्वामींचें वचन वर दिलें आहे, त्या कार्तिकेय स्वामींची जन्मकथा अत्यंत चमत्कारीक आहे. ज्याला व्यावहारिक भाषेंत 'लेकावळा' ह्मणतात तेथें त्याच्या आईबापामध्यें जन्मजात नाते तरी नसते परंतु स्वामी कार्तिकेय यांचे आई व बाप यामधील नाते ह्मणजे कार्तिकेय स्वामींना व त्यांच्या मातेला देणारी व्यक्ति एकच होती. बापानें मुलीशीं जारकर्म केले व त्यांचें फल स्वामी कार्तिकेय अशा संबंधापासून झालेल्या कार्तिकेय स्वामींचें वचन उध्दृत केल्याबद्दल आमच्या धर्ममार्तंडांनीं क्षमा करावी. कार्तिकेय कीर्तिमान होऊन गेले, याला कोणी काय करणार ! अशाला धर्मज्ञांनीं आपला **स्वामी** मानिला !! आजचा मनु मात्र न्याराच आहे.

## अचौर्याणुव्रताचे अतिचार.

**चौरप्रयोगचौरार्थादानविलोपसदृशसन्मिश्राः।**
**हीनाधिकविनिमानं पञ्चास्तेये व्यतीपाताः ॥ ५८ ॥**

**अन्वयार्थः**—( चौरप्रयोगचौरार्थादानविलोपसदृशसन्मिश्राः ) चौर-प्रयोग, चौरार्थादान, विलोप, सदृशसन्मिश्रण ( हीनाधिकविनिमानं ) आणि हीनाधिकविनिमान असे ( अस्तेये ) अचौर्याणुव्रताचे ( पंच ) पांच ( व्यतीपातः ) अतिचार ( सन्ति ) आहेत.

**अर्थः**—(१) चोरी करण्यास अनुमोदन अगर उत्तेजन देणें, (२) चोरीचा माल विकत घेणें (३) भारी किंमतीचा माल कमी किंमतीस विकत घेणें (४) हलक्या किंमतीचा माल भारी किंमतीच्या मालांत भेसळ करून भारी किंमतीचा माल म्हणून विकणें, (५) खोट्या वजनांचा उपयोग करणें, मोठ्या वजनानें माल घेणें व लहान वजनानें माल विकणें; असें हे अचौर्यव्रताचें पांच अतिचार आहेत. अचौर्यव्रताचें परिपूर्ण होण्यासाठीं इतर अणुव्रतांच्या अतिचाराप्रमाणें हेही अतिचार टाळणें जरूर आहे.

सातव्या अध्यायांतील श्लोक ५ मध्यें आचार्य अमितगति यांनीं या अणुव्रताचे अतिचार खालीलप्रमाणें दिले आहेत.

> व्यवहारः कृत्रिमकः स्तेनप्रयोगस्तदाहृता दानम् ।
> ते मानवैपरित्यं विरुद्धराज्यव्यतिक्रमणम् ॥ ५ ॥

(१) कृत्रिम व्यवहार:—खोटें सोनें वगैरे तयार करणें.

(२) स्तेनप्रयोगः—चोरी करण्यास अनुमोदन अगर उत्तेजन देणें.

(३) तदाहृतादानः—चोरीचा माल विकत घेणें.

(४) मानवैपरित्यः—मोठ्या मापानें माल घेणें व लहान मापानें तो विकणें.

(५) राज्यव्यतिक्रमण:—सरकारी नियमांचें उल्लंघन करणें, सरकारी महसूल चोरणें इत्यादि.

आचार्य समंतभद्र व आचार्य अमितगति या आचार्यांनीं अतिचाराची संख्या एकवाक्यतेनें पांच ही दिली आहे, तरी त्यामध्यें थोडीशीं कां होईना भिन्नता आढळून येते, हें तुलनेनें स्पष्ट होणार आहे. केवळ अतिचारांच्या नांवाकडे पाहून आम्हीं हें विधान केलें आहे असें नाहीं. याचा समन्वय करण्याचें काम शास्त्रज्ञांचें आहे.

### ब्रह्मचर्याणुव्रताचें स्वरूप.

**न तु परदारान् गच्छति न परान् गमयति च पापभीतेर्यत्**
**सा परदारनिवृत्तिः स्वदारसन्तोषनामापि ॥ ५९ ॥**

**अन्वयार्थः**—( यत् ) जें ( पापभीतेः) पापाच्या भीतीनें ( परदारान्) दुसऱ्याच्या स्त्रीचें ( न गच्छति ) सेवन न करणें ( च ) आणि ( परान् ) दुसऱ्यांना (न गमयति) सेवन करावयास न लावणें (सा) ते (परदारनिवृत्तिः) परदारनिवृत्ति (अपि) किंवा (स्वदारसंतोषनाम)स्वदारसंतोषनामक अणुव्रत होय.

**अर्थः**—पाप लागणार या भीतीमुळें परस्त्री संग न करणें अगर न करविणें यास ब्रह्मचर्याणुव्रत असें म्हटलें आहे. स्वदारसंतोष व परदारनिवृत्ति अशीं दुसरीं नांवें या व्रताला आहेत. स्वदारसंतोष—आपल्या बायकोंत संतोष मानणें. परदारनिवृत्ति—दुसऱ्याच्या बायकोबद्दल विरक्ति ठेवणें, यालाच परस्त्री-त्याग अणुव्रत असेंही संबोधिलें जातें.

ब्रह्मचर्यधर्म ध्रुव आहे, शाश्वत आहे, नित्य आहे. याधर्माच्या पालनामुळें अनेकांचा पूर्वी उद्धार झाला आहे, आज होत आहे व पुढेंही होणार आहे.

ब्रह्मचर्यव्रताचा हेतु केवळ वीर्यरक्षण व कामजय इतक्या पुरताच मर्यादित नाहीं. इंद्रियावर ताबा व इंद्रियावर संयम हा प्राधान्य हेतु या व्रतांत आहे. इतर इंद्रियाच्या स्वाधीन राहिलों नाहीं तर कामवासनेला फारशी अनुकूलता राहणार नाहीं. उदाहरणार्थ कामोद्दीपक आहार वर्ज्य केला तर कामवासना कमीतरी खास होईल. यामुळें कामवासना कह्यांत आणण्यापूर्वी इतर इंद्रियावर ताबा ठेवणें जरूर आहे.

हिंदुधर्मग्रंथांत स्वदारसंतोषव्रतासारखें व्रत आढळ झालें नाहीं. त्या धर्मांतील ब्रह्मचर्यांत स्वस्त्रीच्या भोगाचाही त्याग सांगितला आहे. जैनधर्मी-इतका या व्रताचा सूक्ष्म विचार हिंदुधर्मांत झालेला दिसत नाहीं.

## ब्रह्मचर्याणुव्रताचे अतिचार.

**अन्यविवाहाकरणानंगक्रीडाविटत्वविपुलतृषः।**
**इत्वरिकागमनं चास्मरस्य पंच व्यतीचाराः ॥६०॥**

**अन्वयार्थः**—(अन्यविवाहाकरणानंगक्रिडाविटत्वविपुलतृषः) परविवाह करणें, अनंगक्रिडा, बीभत्सरूप वचन आणि शरीर यांचा व्यापार, कामासक्ति तीव्र ठेवणें (च) तसेंच (इत्वरिकागमनं) व्यभिचारी स्त्रीशीं गमन करणें ('एते'पंच) हें पांच (अस्मरस्य) ब्रह्मचर्याणुव्रताचे (व्यतीचाराः) अतिचार (सन्ति) आहेत.

**अर्थः**—(१) ज्यांच्याशीं आपला कोणताही संबंध नाहीं, अशा मुलामुलींचीं लग्नें करणें, इतरांचीं लग्नें करून त्यांना संसारी बनविण्यांत पुण्य आहे, असें मानणारे कांहीं धर्म आहेत. जैनधर्माला हें मत मान्य नाहीं. (२) काम सेवनाच्या अंगाशिवाय इतर अवयवाशीं काम सेवन करणें. (३) विटत्व-बीभत्स शब्द बोलणें अगर क्रिया करणें (४) विपुलतृषा-कामवासनाची तीव्र इच्छा धरणें व (५) इत्वरिकागमन-व्यभिचार. स्त्रीशीं अथवा वेश्या यांच्यांशीं अनैतिक संबंध ठेवणें.

आचार्य अमितगति आपल्या श्रावकाचाराच्या सातव्या अध्यायांतील सहाव्या श्लोकांत या अणुव्रताचे अतिचार खालील प्रमाणें देतात.

**आत्तानुपात्तेत्वरिकांगसंगोवानंगसंगो मदनातिसंगः ।**
**परोपयामस्य विधानमेते पंचातिचारा गदिताश्चतुर्थे ॥६॥**

**सारांशः**—विवाहित अगर अविवाहित परंतु व्यभिचारी अशा स्त्रीचा उपभोग घेणें, हस्तादिक-मुष्टिमैथुन, कामासक्ति, दुसऱ्यांचीं लग्नें करणें, इत्यादिक ब्रह्मचर्याणुव्रताचे अतिचार होत.

विधवा, वेश्या व त्यक्ता अशा स्त्रियांशीं अनैतिक संबंध ठेविल्यानें व्रतभंग होतो अगर अतिचार घडतो, यासंबंधीं पं. आशाधरकृत सागारधर्मामृत पहावें. यासंबंधींची चर्चा मुद्दाम टाळिली आहे.

### परिग्रहपरिमाणाणुव्रताचें स्वरूप.

**धनधान्यादिग्रन्थं परिमाय ततोऽधिकेषु निस्पृहता ।**
**परिमितपरिग्रहः स्यादिच्छापरिमाणनामापि ॥६१॥**

**अन्वयार्थः**—( धनधान्यादि ग्रंथं ) धन, धान्य इत्यादि परिग्रहांचें ( परिमाय ) प्रमाण करून (ततः अधिकेषु) त्यापेक्षां अधिकामध्यें (निस्पृहता) इच्छा न ठेवणें हें ( परिमितपरिग्रहः ) परिग्रहपरिमाणानुव्रत होय. यालाच ( इच्छापरिमाणनाम ) इच्छापरिमाणव्रत हें नांव आहे.

**अर्थः**—धन, धान्य, दासदासी, घरदार, वस्त्रप्रावरण इत्यादिक परिग्रहांचें आपल्या मनानें प्रमाण करून-मर्यादा घालून त्यापेक्षां अधिकांचा संग्रह करण्याची इच्छा न धरणें याला परिग्रहपरिमाणाणुव्रत म्हणतात.

ही मर्यादा सारासार विचारानेंच घातली पाहिजे. अगदीं भणंग भिकारी आहे व त्यानें नऊकोटी नारायण होण्याचें प्रमाण घालणें हें व्यर्थ होईल.

संग्रह करण्यांत अंतर्यामीच्या लोभाच्या वासनेला बळी पडावें लागतें. परिमाण केल्यानें संग्रहाच्या निर्बंधाप्रमाणें मोहाला निर्बंध होतो. मोहाला लगाम लागतो. या व्रतांत भोगांत त्याग घडतो.

अस्तेयादि अणुव्रतें—चोरी न करणें, खोटें न बोलणें, ब्रह्मचर्य व परिग्रह अणुव्रतांचें पालन करणें, हीं सर्व अहिंसा व्रताला पूरक आहेत म्हणूनच अहिंसा धर्माला **परमोधर्मः**—सर्वश्रेष्ठधर्म असें ठरविलें आहे.

हीं चार अणुव्रतें अहिंसा धर्माला पोषक व पूरक कशीं आहेत, याची थोडीशी कल्पना येणें जरूर आहे. अहिंसा म्हणजे केवळ प्राणिमात्रांचा वध करणें, एवढाच त्याचा अर्थ नाहीं. मनुष्य असो वा इतर प्राणी असोत, त्यांना कोणत्याही प्रकारचें व अल्पस्वरूपहि कष्ट, त्रास व पीडा न देणें याला अहिंसा म्हणतात. कोणाचा ऐवज चोरला, परस्त्रीचा अभिलाष धरला तर

दुसऱ्याला दुःख होणारच. कष्टानें मिळविलेली संपत्ति गेली म्हणून दुःख न होणें अपरिहार्य आहे. ज्याच्याशीं आपण खोटें बोलतो त्याचें मन दुखावलें जातें. आपल्या भावना दुष्ट होतात. परिग्रह वाढवितांना देखील अनेक वेळ दुसऱ्याच्या परिग्रहाचा अपहार करावा लागतो. 'अ'च्या घरची संपत्ति 'ब'च्या घरीं जाते. अशा कृत्यामुळें दुसऱ्यास कष्ट होतात. यामुळेंच इतर धर्म हें अहिंसा धर्माचें पूरक व पोषक आहेत. अहिंसा धर्म हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे, अशी प्रसिद्धी देण्यास व अहिंसा धर्माचें श्रेष्ठत्व शाबीत करण्यास इतर अणुव्रतें कारणीभुत आहेत.

चौदा अंतरंग परिग्रह–(१) क्रोध, (२) मान, (३) माया, (४) लोभ हें चार कषाय; सहाविकार—(१) हास्य (२) रति (३) अरति (४) शोक (५) भय (६) जुगुप्सा; तीन वेद (१) पुंवद (२) स्त्रीवेद व (३) नपुंसक आणि (४) मिथ्यात्व.

दहा बाह्य परिग्रहः—(१) घर (२) शेत (३) धन (४) धान्य (५) द्विपद (६) चतुष्पद (७) शयन (८) आसन (९) यान (१०) धातु-तांबे वगैरे.

**सारांश**—अस्तेय व परिग्रह यांत फरक फार थोडा आहे.स्वतःला आज जें अवश्यक नाहीं, त्याचा संग्रह भविष्य काळाची चिंता करून संग्रह करणें, हा परिग्रह आहे. परिग्रहाला बंधन कां घालावयाचें ! हें व्रत कां स्वीकारावयाचें ! आपल्या व आपल्या मुलांबाळांच्या उपयोगी पडेल असें समजून जो एखाद्या चिंधीलाही गांठ मारून ठेवितो व दुसऱ्याला त्याची जरूरी असतांही त्याचा उपयोग त्याला करूं देत नाहीं, तो परिग्रही होय. गृहस्थाश्रमांत असणाऱ्यानें आपल्यापाशीं असेल ते रस्त्यावर आणून टाकावे, असें नाहीं. आपल्या जवळच्या ऐवजाचें आपण केवळ रक्षक आहो, विश्वस्त-ट्रस्टी-आहों व ज्या वेळेला दुसऱ्याला त्याची जरूरी लागेल त्यावेळीं त्याला द्यावें. हें थोरपणाचें लक्षण आहे; परंतु तें आचरणांत आणणें सर्वांनाच शक्य होणार

नाहीं म्हणून जैनधर्मानें या उदार वृत्तीचा विकास करण्यासाठीं प्रथम परिग्रहाला मर्यादा घालण्यासाठीं पांचव्या **अणुव्रतांत** जागा दिली. परिग्रह परिमाण स्थूलमानानें केल्यावर त्या मर्यादेपेक्षां अधिक होईल त्या संपत्तीचा मालक आपण नव्हे तर केवळ संरक्षक-विश्वस्त-ट्रस्टी-आहों, असें समजावें असें सांगितलें. मनानें घातलेल्या मर्यादेतील परिग्रहाचा उपभोग कमी करावा असा दंडक नंतर घातला. कारण मर्यादेतील संपत्तीवरील ममत्वाचा व मालकीचा त्यामुळें संकोच होतो. उपभोग कमी करूनही आपल्याजवळ ठेवण्यापेक्षां सत्पात्रीं दान द्यावें, असें सांगितलें. गृहस्थाश्रमाच्या शेवटच्या पायरीला पोहोंचण्यापूर्वी कुटुंबांत असतां व आपल्या संपत्तीचा व्यावहारिक व कायदेशीर दृष्टया मालक असतांही त्या संपत्तीपैकीं आपल्याला जरूर तेवढीच संपत्ति आपल्या उपयोगास लावावी व संन्यासदीक्षा घेतल्यानंतर त्या सर्व संपत्तीवर लाथ मारून लोकाश्रयावर जीवित रक्षण करावें, असें सांगितलें आहे. हाच विकासाचा क्रम. यामुळें सामाजिक स्वास्थ्य व धार्मिक आनंद यांची वृद्धि समाजांत होत राहील.

साधारणतः अशी समजूत आहे कीं जसजशीं संपत्ति वाढत जाते तसतसें संपत्तिमानांचा आनंद व त्याचे सुख यांतही भर पडते; परंतु हा ग्रह चुकीचा आहे. प्रमाण व्यस्त असते. वादीभसिंह म्हणतात—

> धनार्जनादपि क्षेमं क्षेमादपि च तत्क्षये ।
> उत्तरोत्तरवृद्धा हि पीडा नृणामनंतशः ॥ २-६७ ॥

**सारांश**:—संपति मिळविण्यास-परिग्रहाचा संग्रह करण्यास-अत्यंत श्रम व सायास करावें लागतात. संपति मिळविल्यावर त्याचें संरक्षण करण्यास त्याहीपेक्षां असंख्य पटीनें श्रम व सायास घ्यावें लागतात. मिळविलेली व संरक्षण केलेली संपाति जाऊं लागली म्हणजे तर जे श्रम व सायास व दुःख होत, त्यांची कल्पनाही होत नाहीं. यावरून संपत्तीच्या वाढी बरोबर सुख व

शान्ति यांची वाढ होत असावी, ही जी सामान्य समजूत आहे, ती सर्वस्वी चुकीची असून तिच्या वाढीमुळें श्रम, सायास व दुःख यांची परंपरा वाढतच जाते. परिग्रहाला मर्यादा घातली कीं श्रम, सायास व दुःख यांना आपोआपच मर्यादा येते व त्या प्रमाणांत सुख व शांति यांचा लाभ होतो.

### परिग्रहपरिमाणाणुव्रताचें अतिचार.

**अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि ।**
**परिमितपरिग्रहस्य च विक्षेपाः पंच लक्ष्यन्ते ॥६२॥**

**अन्वयार्थः**—( परिमितपरिग्रहस्य ) परिग्रह-प्रमाणाणुव्रताचें ( च ) देखील ( अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि ) अतिवाहन, अति-संग्रह, विस्मय, लोभ व अतिभार-वहन ( 'एते' पंच ) हे पांच ( विक्षेपाः ) अतिचार ( लक्ष्यन्ते ) निश्चित केलें गेलें आहेत.

**अर्थः**—(१) अतिवाहन, (२) अतिसंग्रह, (३) विस्मय, (४) लोभ व (५) अतिभारवाहन असे पांच या व्रताचे अतिचार मानिले आहेत. (१) अतिवाहन ह्मणजे नोकर, बैल इत्यादिकांना लोभामुळें-प्रेमामुळें नव्हे-त्यांच्या शरीरापेक्षां काम घेत अधिक दूरवर नेणें, (२) अतिसंग्रह ह्मणजे आहे याहीपेक्षां अधिक असावे व मिळावें अशी आशा धरणें, (३) अतिविस्मय ह्मणंजे दुसऱ्याचें वैभव पाहून आश्चर्य मानणें, (४) अतिलोभ ह्मणजे झालेल्या लाभांत व फायद्यात संतोष न मानतां अधिक फायद्याची हांव धरणें व (५) अतिभारवाहन ह्मणजे लाभ व लोभाला बळी पडून नोकर-चाकरावर अगर बैल घोडयावर त्यांच्या शक्तिपेक्षां अधिक ओझें लादणें.

पहिल्या अतिचाराला अतिवाहन व शेवटच्या अतिचाराला अतिभार-वाहन अशीं नांवें दिलीं आहेत. अतिवाहनानें लांबी—पल्याचा अर्थ येतो तर शेवटच्या अतिचारांत भार-ओझें-याचा समावेश होतो.

अहिंसाणुव्रताच्या अतिचारांत 'अतिभारारोपण' हा एक अतिचार दाखविला आहे. मग 'अतिभारारोपण' व या अणुव्रतांतील 'अतिभार

वाहन ' हा अतिचार यांत फरक तो कोणता ? अशी शंका येणें साहजिकच आहे; परंतु थोड्याशा विचारांती यांत फरक आहे असें दिसून येईल. अहिंसाणुव्रतामध्यें ' अतिभारारोपणामुळें ' पशूला दुःख देण्याची इच्छा प्रामुख्यानें असते व या परिग्रहपरिमाणाणुव्रताच्या ' अतिभारवाहन ' या अतिचारामधील हेतु दुःख व त्रास देण्याचा नसून लोभ अगर लाभ हा हेतु असतो. बारा मण ओझें न्यावयाचें आहे, त्याकरितां तीन बैलांची जरूरी असतां तें ओझें दोनच बैलावर लादून नेण्यानें एका बैलाच्या भाड्याचा खर्च वाचतो, हा मोह व लाभ या अतिचारांत असतो. या उदाहरणावरून या अतिचारांतील भेद कळून येण्यास मदत होईल अशी आशा आहे.

### अणुव्रतांचें अतिचाररहित पालन केल्यानें मिळणारें फल.

**पंचाणुव्रतनिधयो निरतिक्रमणाः फलन्ति सुरलोकम् ।**
**यत्रावधिरष्टगुणा दिव्यशरीरं च लभ्यन्ते ॥ ६३ ॥**

**अन्वयार्थः**—( निरतिक्रमणाः ) निरतिचार ( पंचाणुव्रतनिधयः ) पंच अणुव्रत हेंच कोणी एक निधि ( सुरलोक ) देवलोकरूप ( फलन्ति ) फल अर्पण करितात. ( यत्र ) ज्या ठिकाणीं ( अवधिः ) अवधिज्ञान ( अष्ट-गुणाः ) अणिमादिक आठ ऋद्धि ( च ) व ( दिव्यशरीरं ) रस, रक्त, मांस इत्यादि सप्त धातूंनीं रहित असें सुंदर शरीर ( लभ्यन्ते ) प्राप्त होतें.

**अर्थः**—अतिचाररहित पांचही अणुव्रतांचें पालन करणारा जीव स्वर्गलोकांत-देवयोनींत-जन्म घेतो. तेथें त्यास जन्मल्याबरोबर अवधिज्ञानाची प्राप्ति होते. तेथें त्यास अणिमा, महिमा, लघिमादि आठ गुणांचा-ऋद्धिचा-लाभ होतो. सप्तधातुरहित अशा दिव्य-वैक्रियिक शरीराचा लाभ होतो.

### पांच अणुव्रतांचें पालन करणारे प्रसिद्ध पुरुष.

**मातंगो धनदेवश्च वारिषेणस्ततः परः ।**
**नीली जयश्च संप्राप्ताः पूजातिशयमुत्तमम् ॥ ६४ ॥**

**अन्वयार्थः**—( मातंगः ) यमपाल चांडाळ ( च ) आणि ( धनदेवः ) धनदेव ( ततः परः ) त्यानंतर ( वारिषेणः ) वारिषेण राजपुत्र ( च ) तसेंच ( नीली ) नीलीकुमार ( च ) आणि (जयः) जयनामक राजपुत्र हे (उत्तमं) उत्तम ( पूजातिशयं ) पूजातिशयाला; अर्थात् पूज्यपदाला ( संप्राप्ताः ) प्राप्त झाले.

**अर्थः**—(१) अहिंसाणुव्रतांत यमपाल चांडाळ, (२) सत्याणुव्रतांत धनदेवशेठ (३) अचौर्याणुव्रतांत श्रेणिकाचा मुलगा वारिषेण (४) ब्रह्मचर्याणुव्रतामध्यें एका वेश्येची मुलगी नीली व (५) परिग्रहपरिमाणाणुव्रतामध्यें राजपुत्र जयकुमार, अशा प्रामुख्यानें प्रसिद्ध व्यक्ति आहेत.

अणुव्रताच्या पालनामुळें ज्यांचें इहलोकीं कल्याण झाले आहे, अशा व्यक्ति अनेक आहेत. पुराणांतरी त्यांच्या नांवाचा उल्लेख मिळतो. केवळ उदाहरणें ह्मणून वर फक्त पाच नांवाचा उल्लेख केला आहे. अणुव्रत व त्यांतील ख्यातनाम व्यक्ति यावरून हीं नांवें पसंत करण्यांतील स्वारस्य सहजी कळणार आहे. वेश्येची मुलगी वेश्याच होणार असा समज साहजिकच असतो, परंतु ती ब्रह्मचर्याणुव्रती झाली, हें वैशिष्ट्य दाखविण्यासाठीं नीलीच्या नांवाचा उल्लेख आचार्यांनीं केला आहे. राजपुत्र असल्यामुळें त्याचा परिग्रह मोठाच असणार व तो तसा ठेवावाही लागणार; तथापि जयकुमारानें आपल्या परिग्रहास मर्यादा घातली, हें वैशिष्ट्य आहे. यमपाल हा जातीनें चांडाळ, हिंसा हा त्याचा धर्म, परंतु त्यानें अहिंसाव्रताचे पालन केलें, हें त्याचें वैशिष्ट्य. व्यापार व खोटें बोलणें, हीं जुळीं भावंडें परंतु धनदेव शेटजी त्याला अपवाद ह्मणून धर्मग्रंथांतही त्याच्या नांवाला जागा आहे. उदाहरणें देऊन विषय बिंबविण्याच्या पद्धतीचें हें एक वैशिष्ट्य आहे.

या व यापुढील श्लोकांतील उदाहरणाकडे दुसऱ्या एका दृष्टीनें पाहणें व त्यांचा भावार्थ विचारांत घेणें हें आपलें आद्य कर्तव्य आहे. ‘ नळी फुंकिली सोनारें व इकडून तिकडे गेले वारे ’ असा हास्यास्पद प्रकार होऊ

नये अशी आशा आहे. आचार्य समंतभद्र यांनीं श्लोक संख्या २५ मध्यें गर्वाचे-मदाचे-आठ प्रकार सांगितले आहेत. श्लोक संख्या २७ मध्यें व श्लोक सं. २८ मध्यें जाति-कुलादिकांचा गर्व व अभिमान धरूं नयें असें सांगितलें आहे. श्लो. सं. २६ मध्यें गर्व वाहणारा पापी कसा ठरतो हें दाखविलें आहे. श्लो. ६४ मध्यें ज्या ख्यात नांवाचा उल्लेख केला आहे, त्याचें कारण त्यांतील व्यक्तिनीं एकाद्या अणुव्रताचें पालन केलें; परंतु याकडे दुसऱ्याही दृष्टीनें पाहतां जैनधर्म उदार आहे, विशाल आहे, सर्वांचा सारखाच उद्धारक आहे, जाति, कुल, गोत्र, धंदा इत्यादिकांकडे तो पहात नाहीं. धर्मानुसार ज्याचा आचार व विचार तो धार्मिक व जैनधर्म धार्मिकांचा उद्धारक आहे. तो जातीनें व जन्मानें ब्राह्मण म्हणून त्याला कवटाळीत नाहीं अगर शूद्र म्हणून त्याला लाथाडीत नाहीं. काळा कीं गोरा, श्रीमंत कीं गरीब हें पहात नाहीं. तो आचाराचा भोक्ता व सर्वांचा उद्धारक आहे. म्हणूनच सार्वधर्म होण्यास तो खचित पात्र आहे.

यमपाल चांडाळाचेंच उदाहरण घेऊं. राजाज्ञेप्रमाणें गुन्हेगारांना फांशी देण्याचें काम यमपाल करीत होता. जातीनें, जन्मानें शूद्र व मांसाहारी होता. तो अस्पृश्य होता व त्याचा पोटापाण्याचा धंदा नीच होता. अहिंसाणुव्रताचा त्यानें स्वीकार केला व पुराणांतरीं त्याचें नांव अजरामर होऊन राहिलें आहे; कारण या व्रतपालनामुळें जैनधर्मानें त्याचा उद्धार केला. आचार्य समंतभद्र यांनीं श्लो. सं. ६४ मध्यें त्याच्या नांवाचा प्रामुख्यानें प्रथम उल्लेख केला आहे. उद्धाराच्या व अहिंसापालनाच्या आड त्याची जात, त्याचें कुल, त्याचा धंदा हीं आलीं नाहींत.

या यमपाल चांडाळाची त्याच्या राजानेंच पूजा केली नाहीं, तर सिंहासनावर बसवून देवांनींही त्याची पूजाअर्चा केली हें पुढील श्लोकावरून कळून येईल.

**तं प्रभावं समालोक्य राजाद्यैः परया मुदा ।**
**अभ्यर्चितःस मातंगो यमपालो गुणोज्वलः ॥२८॥**

**सारांश**—या चांडाळाच्या व्रताचा प्रभाव पाहून राजा व प्रजा यांनीं मोठ्या आनंदानें व सन्मानानें त्या सद्गुणी यमपाल चांडाळाची पूजा केली. जातीनें चांडाळ पण दृढ व्रति झाल्यानें त्याची अस्पृश्यता गेली व तो खुद्द राजाच्याही सन्मानाला पात्र झाला. त्याचा सन्मान येथेंच थांबला नाहीं. देवादिकांनींही त्याची पूजा केली.

तदा तद्व्रतमाहात्म्यात्महानु भवरागतः।
सिंहासने समारोप्य देवताभिः शुभैर्जलैः ॥२६॥
अभिषिच्य प्रहर्षेण दिव्यवस्त्रादिभिः सुधीः।
नानारत्नसुवर्णाद्यैः पूजितः परमादरात् ॥२७॥

**सारांश**—या यमपाल चांडाळाची शुद्ध व शुभ पाण्यानें सिंहासनावर बसवून देवानीं पूजा केली व त्याला आहेर-वस्त्रभूषणें दिलीं. या प्रसंगाला उद्देशून एका आचार्यानें ह्मटलें आहे कीं:—

चांडालोऽपि व्रतोपेतः पूजितः देवतादिभिः।
तस्मादन्यैर्न विप्राद्यैर्जातिगर्वो विधीयते ॥३०॥

**सारांश**—जातीनें चांडाळ परंतु व्रती, याचा सन्मान देवादिकांकडून होतो. सबब मी ब्राह्मण आहे. मी उच्च कुलीन आहे, असा गर्व धरूं नका.

यावरून उच्चनीच हा भेद मानलेला नाहीं, स्पृश्य वा अस्पृश्य हा विचार नाहीं, वर्णभेद नाहीं अगर कुलभेद मानलेला नाहीं. गुणाला, सद्गुणाला व आचाराला मान दिला आहे.

आचार्य अमितगति यांनीं हाच भावार्थ दुसऱ्या शब्दांत व्यक्त केला आहे. ते ह्मणतात कीं:—

शीलवंतो गताः स्वर्गे नीचजातिभवा अपि।
कुलीना नरकं प्राप्ताः शीलसंयमनाशिनः ॥

**सारांश**:—नीच जातींत व हलक्या कुळांत जन्मलेला परंतु शील-वान वा आचारसंपन्न असणारा स्वर्गाला जातो व या उलट आचारहीन पण उच्चकुलीन नरकाला जातो.

वर जी विचारसरणी दिली आहे, त्यांत केवळ नर नारायण होतो, एवढेंच दिसून येतें; परंतु आचार्य शिरोमणी स्वामी समंतभद्र आपल्या श्रावकाचारांतच ह्मणतात—

श्वाऽपि देवोऽपि देवःश्वा जायते धर्मकिल्बिषात् ।

**सारांशः**—धर्माचरणामुळें पशुयोनींतील कुत्रा देवयोनींत जन्मतो व पापाचरणामुळें देवयोनींतील देवाला कुत्र्याच्या योनींत जन्म घ्यावा लागतो. यावरून जाति-कुलादिकाचा गर्व वाहणें हें अधर्म आहे, पाप आहे व धर्म-संमत नाहीं. आचारच उद्धारक आहे.

यापुढील श्लोकांत ( ६५ ) पातकामुळें प्रसिद्ध पावलेल्या व्यक्तींचीं नांवें दिलीं आहेत. त्यांतील धनश्री-हा हिंसक झाला, आईबापांनीं सत्यघोष ह्मणून नांव ठेवलेला असत्य वचनी ठरला, तपस्वी असूनही चोरीचा मोह त्याला आवरतां आला नाहीं. यामुळें त्याची संपत्ति, त्याचें नांव अगर त्याचा पेशा पापाच्या आड आला नाहीं व धर्माच्या दरबारांत ते दोषी ठरविले गेले.

हा काटेकोर न्याय इतर धर्मांत मिळेलच असें नाहीं; ह्मणूनच जैन-धर्म उदार आहे, उद्धारक आहे व तो गुणोपासक आहे अशी त्याची ख्याती आहे. यामुळेंच तो सार्वधर्म होण्यास पात्र आहे.

या व पुढील श्लोकांत ज्या नांवाचा उल्लेख केला आहे, तीं केवळ नमुन्यादाखल आहेत. पुराणांतरीं अशीं उदाहरणें अनेक आहेत. श्लो. सं. ६४ मधील महात्म्यांनीं अणुव्रत पालन केलें व श्लो. सं. ६५ मधील महा-भागांनीं ! पांच पातकांपैकीं एक एक पातक आत्यंतिक प्रमाणांत केलें होतें असें समजणेचें आहे.

कोष्टयाचें काम करणारा कबीर, कुंभाराचें काम करणारा गोरा कुंभार, सावंत माळी, रोहिदास चांभार, सेना न्हावी, तुलाधर वाणी, तुकाराम, दळप करणारी जनाबाई, सजन खाटीक, नामदेव शिंपी व वेश्यापुत्री कान्होपात्रा यांचा

उद्धार झाल्याचें हिंदुधर्मीय मानितात. वरील संत हे आपला धंदा करीत असत, हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

श्लो. सं. ६४ मधील यमपालादि ख्यातनाम व्यक्तीही अशाच नीच धंदा करणाऱ्या होत्या. या उदाहरणांतील साम्य अनेकप्रकारें आहे.

एक एक पातक करण्याचें सोडून दिलें, तेवढ्यापुरतें तरी ते सदाचारी झाले. धर्मानें त्यांना **आपला** मानिला व त्यांचा उद्धार केला. जात, कुळ, गोत्र, वय, वर्ण व त्यांचा धंदा धर्मानें पाहिला नाहीं, सदाचार पाहिला. हिंदुधर्मातील संत-संतीणींची वर जी नामावली दिली आहे, ते सत्पुरुष अगदीं अलिकडच्या काळांतील आहेत. हिंदुधर्मातिल वर्णाश्रमधर्माची पकड कमी झाल्यानंतर व वारकरी सांप्रदायाचें महत्व वाढल्यानंतरचीं हीं उदाहरणें आहेत; हे चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत येईलच.

**हिंसादि पांच पापें केल्यानें प्रसिद्धीस आलेल्या व्यक्ति.**

**धनश्रीसत्यघोषौ च तापसारक्षकावपि ।**

**उपाख्येयास्तथा श्मश्रुनवनीतो यथाक्रमम् ॥ ६५ ॥**

**अन्वयार्थः**—( धनश्रीसत्यघोषौ ) धनश्री, सत्यघोष ( अपिच ) तसेंच ( तापसारक्षकौ ) तापस व कोतवाल ( तथा ) त्याचप्रमाणें ( श्मश्रुनवनीतः ) श्मश्रुनवनीत हे ( यथाक्रमं ) अनुक्रमानें ( उपाख्येयाः ) सांगितले गेले आहेत.

**अर्थः**—(१) हिंसा केल्यामुळें एका व्यापाऱ्याची बायको धनश्री, (२) खोटें बोलण्यानें सत्यघोष-श्रीभूति नांवाचा पुरोहित, (३) चोरी केल्यानें एक तपस्वी (४) मैथुनामुळें यमदंड नायक नांवाचा कोतवाल व (५) परिग्रह पापांमुळें श्मश्रुनवनीत नांवाचा व्यापारी, अशा कुप्रसिद्ध व्यक्ति होऊन गेल्या.

**श्रावकांचे आठ मूलगुण.**

**मद्यमांसमधुत्यागैः सहाणुव्रतपञ्चकम् ।**

**अष्टौ मूलगुणानाहुर्गृहिणां श्रमणोत्तमाः ॥ ६६ ॥**

**अन्वयार्थः**—( श्रमणोत्तमाः ) जिनेंद्र भगवंतानीं ( मद्यमांसमधुत्यागैः

सह अणुव्रतपंचकं ) दारू, मांस, मधु यांच्या त्यागाबरोबर पांच अणुव्रतांचें पालन करणें यास( अष्टौ ) आठ (मुलगुणान्) मूलगुण ( आहुः ) म्हटलें आहे.

**अर्थः**—(१) मद्यत्याग (२) मांसत्याग (३) मधुत्याग (४) हिंसा-त्याग ( अहिंसाणुव्रत ) (५) असत्यत्याग ( सत्याणुव्रत ) (६) चौर्यत्याग ( अचौर्याणुव्रत ) (७) कुशीलत्याग ( ब्रह्मचर्याणुव्रत ) व (८) परिग्रहत्याग ( परिग्रहपरिमाणाणुव्रत ) असे श्रावकांचे आठ मूलगुण मानिले आहेत.

(१) दारु (२) मांस व (३) मधु-मध अशा या तीन वस्तुंचा त्याग करणें म्हणजे ती सेवन न करणें व पांच अणुव्रतांचें पालन करणें, असे श्रावकाचे आठ मूलगुण-मुख्यगुण होत.

श्रावकांच्या मूळ-मुख्य-गुणांची संख्या ८ आहे, याबद्दल निरनिराळ्या आचार्यांच्या वचनांत मतभेद नाहीं. मद्य, मांस व मधु यांच्या त्यागाचा समावेश आठ मूलगुणांत अनेक आचार्यांनीं केला आहे. यावरून या तीन 'म'कार त्यागाबद्दलहीं आचार्य वचनांत फारशी भिन्नता नाहीं. मात्र तीन 'म'कार वजा जातां श्रावकांच्या बाकीच्या पांच मूलगुणांत कोणकोणत्या गुणांचा समावेश होतो, याबद्दल बराच तीव्र मतभेद आचार्य वचनांत दिसून येतो. उदाहरणार्थ सोमदेवांच्या मतें:—

(१) **मद्यमांसमधुत्यागैः सहोदुम्बरपंचकैः ।**
**अष्टावेते गृहस्थानामुक्ता मूलगूणाः श्रुते ॥**

**सारांश**:—मद्य, मांस व मधु यांच्या त्यागाबरोबरच पांच उदुम्बर-उंबर-वडपिंपळादिक प्रकारच्या झाडांच्या-फळाचा समावेश करून आठ संख्येची भरती सोमदेवांनीं केली आहे.

पं. आशाधरांच्या मतें खालील आठ मूलगुण आहेत.

**मद्यपलमधुनिशाशन-पंचफलाविरतिपंचकाप्तनुतीः ।**
**जीवदयाजलगालनमिति च क्वचिदष्ट मूलगुणाः ॥**

अमितगति-श्रावकाचारांत पांचव्या अध्यायांतील पहिला श्लो. खालील-प्रमाणें आहे.

मद्यमांसमधुरात्रिभोजनम् क्षीरवृक्षफलवर्जनं त्रिधा ।
कुर्वते व्रतजिघृक्षया बुध स्तत्र पुष्यति निषेवते व्रतम् ॥ १ ॥

आचार्य अमितगतींनीं मद्यपानाच्या अनिष्ट परिणामासंबंधीं जें विवेचन केलें आहे तें पाहतां आचार्यांच्या सूक्ष्म अवलोकनाची खरीखुरी कल्पना येते. मदिरापानापासून लोकांनीं परावृत्त व्हावें, म्हणून ते श्लोक ४ मध्यें लिहितात कीं, 'मूत्रयन्ति पतितस्य मंडला विस्तृते विवरकांक्षया मुखे'-दारुड्याच्या तोंडांत कुत्राही लघवी करतो. मद्यपानापासून परावृत्त करण्यासाठीं अशी ही कडक भाषा वापरली असावी. व्यासपीठावरून दारुबंदीबद्दल व्याख्यान देणाऱ्या वक्त्याला आचार्य अमितगतींचे हे विचार बरीच नवी दिशा दाखवितील.

आचार्य पद्मनंदि यांच्या श्रावकाचारांतील आठ मूलगुण कोणते याबद्दलचा उल्लेख पुढें दिला आहे.

त्याज्यं मांसं च मद्यं च मधूदुंबरपंचकम् ।
अष्टौ मूलगुणाः प्रोक्ता गृहिणो दृष्टिपूर्वकम् ॥२३॥

**सारांश**—तीन 'म'कार व पांच उदुंबर त्याग ही सम्यग्दर्शन सहित गृहस्थाचे आठ मूलगुण आहेत.

### सप्तव्यसन व आठ मूलगुण.

श्लो. सं. १० मध्यें आचार्य पद्मनंदी यांनीं सप्तव्यसनांची नामावली दिली आहे. ती:—

द्यूतमांससुरावेश्याखोटचौर्यपरांगनाः ।
महापापानि सप्तैव व्यसनानि त्यजेद्बुधः ॥१०॥

**सारांश**—(१) जुगार खेळणें, (२) मांस खाणें, (३) दारू पिणें, (४) वेश्यागमन, (५) शिकार करणें, (६) चोरी करणें, व (७) परस्त्रीभोग अशीं हीं सात व्यसनें आहेत. यावरून आठ मूलगुणांतील तीन मकारापैकीं दोन मकार व पंचाणुव्रतापैकीं (१) हिंसा (२) चोरी (३) खोटें बोलणें व (४) कुशील यांचा समावेश केला आहे.

श्रावकाचारांत या व्यसनांचा समावेश कां केला नाहीं ? आचार्य पद्म-नंदींनीं हीं सात पातकें एकत्रित केलीं आहेत, व आचार्य समंतभद्रांनीं जे आठ मूलगुण मानिले आहेत त्यांत या सप्तव्यसनांचा समावेश झाला आहे. विषयाच्या मांडणींतील हा फरक असावा असें दिसतें.

सागारधर्मामृत अध्याय दुसरा श्लो. सं. २ यांत मूलगुणांची संख्या वाढविलेली दिसते. तीन मकार, पांच उदुंबर याशिवाय लोणी, रात्रीभोजन व अगालित जल-यांचा त्याग, यांचा मूलगुणांत समावेश केला आहे. यांवरून रात्रीं-भोजन-त्याग व्रताचें फार हाल झाल्याचें दिसतें. रात्रीभोजनत्यागाला कांहींनीं अणुव्रतांत, कांहींनीं मूलगुणांत घातले तर आचार्य समंतभद्र यांनीं सहाव्या प्रतिमाव्रतधाऱ्यांना रात्रीभोजनत्याग सांगितला आहे. ( पहा श्लो. सं. १४२ )

श्री जिनसेनाचार्यांच्या मतें पांच अणुव्रतें (६) जुगार (७) मद्य व (८) मांसत्याग असे आठ मूलगुण आहेत.

यावरून आठ मूलगुणात मधु-मद्य-यांचा समावेश श्रीजिनसेनाचार्य करीत नाहींत. रात्रीभोजनत्याग व्रताचाही ते आठ मूलगुणांत समावेश करीत नाहींत. अध्याय दुसरा श्लो. सं. १८ यांत पं. आशाधरांनीं (१) मद्य, (२) मांस, (३) मधु, (४) रात्रिभोजन, (५) पंच उदुंबर यांचा त्याग व (६) त्रिकाल देवदर्शन (७) जीवदया व (८) वस्त्रगाळ पाणी असे आठ मूलगुण सांगितले आहेत.

तीन 'म'कार व पांच अणुव्रतें अशा आठांची मूलगुण व्रतांत गणना आचार्यांनीं केली आहे. या तीन 'म'कार त्यागाची वाढ ती कशी करावयाची ? पांच अणुव्रतांची वाढ करण्याची योजना गुणव्रतांत दिली आहे. शिक्षाव्रतांत याही पुढें विकासाला संधी दिली आहे. 'म'कारत्रयाशिवायच्या इतर मूल-गुणांच्या वाढीची शक्यता आहे परंतु 'म'कार त्रयाच्या त्यागाच्या बाबतींत विचार करूनही शक्यता दिसत नाहीं.

अशास्थितींत आठ मूलगुणांत तीन 'म'कार व पांच उदुंबरत्याग यांचा ज्यांनीं समावेश केला आहे, त्या आचार्यांचें मतच अधिक सयुक्तिक वाटतें. या पुस्तकांत या आठ मूलगुणाबद्दल असलेल्या मतभेदाचें परिशिष्ट दिलें आहे.

यावरून श्रावकाचाराचें (१) तीन 'म'कार व पांच उदुंबर त्याग हा पाहिला पर्याय अगर पहिली पायरी (२) अणुव्रत पाळणाऱ्यांची दुसरी व गुणव्रत व शिक्षाव्रत पाळणाऱ्यांच्या या पुढील पायऱ्या अगर पर्याय आहेत, असें मानणें अधिक सयुक्तिक होईल असें वाटतें. या मतभेदांचा समन्वय कसा करतां येईल हें शास्त्रज्ञांनीं ठरवावें. ( पहा श्लो. सं. ८४ व त्या खालील विवेचन. )

---

# अध्याय ४ था.

## गुणव्रतांचें वर्णन, लक्षण व भेद.

---

**दिग्व्रतमनर्थदण्डव्रतं च भोगोपभोगपरिमाणम् ।**
**अनुबृंहणाद्गुणानामाख्यान्ति गुणव्रतान्यार्याः ॥६७॥**

**अन्वयार्थः**—( आर्याः ) तीर्थंकरादिक ( दिग्व्रतमनर्थदण्डव्रतं ) दिग्व्रत, अनर्थदण्डव्रत ( च ) तसेंच ( भोगोपभोगपरिमाणम् ) भोगोपभोग-परिमाणव्रताला ( गुणानां अनुबृंहणात् ) अष्ट मूलगुण वृद्धिंगत करण्यासाठीं कारणीभूत असल्यामुळें ( गुणव्रतानि ) गुणव्रतें असें ( आख्यान्ति ) म्हणतात.

**अर्थः**—(१) दिग्व्रत (२) अनर्थदण्डव्रत व भोगोपभोगपरिमाण-व्रत असे गुणव्रताचे तीन भेद आहेत. श्रावकांच्या पांच अणुव्रतांची वृद्धि व वाढ होण्यासाठीं गुणव्रताची जरूरी आहे. अणुव्रतें कोणतीं व त्यांचें अतिचार

कोणकोणतं; याचें विवेचन यापूर्वी करण्यांत आलें आहे. गुणव्रत पालन करण्यानें अतिचार हळूं हळूं व क्रमाक्रमानें नष्ट होत जातील, एवढेंच नव्हे तर अतिचार रहित अणुव्रतांचें सूक्ष्म पालनही अधिकाधिक होत जाईल. अणुव्रत पालनामध्यें पांच पातकांचा स्थूल मानानें त्याग होतो; परंतु गुणव्रत धारण केल्यानें सूक्ष्म पातकांचाही मर्यादित त्याग होतो. हा मर्यादित त्याग अगर विकास कसा होतो, हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

### दिग्व्रताचें स्वरूप.

**दिग्वलयं परिगणितं कृत्वातोऽहं बहिर्न यास्यामि ।**
**इति संकल्पो दिग्व्रतमामृत्यणुपापविनिवृत्त्यै ॥ ६८ ॥**

**अन्वयार्थः**—( अणुपापविनिवृत्यै ) सूक्ष्म पापांचें निराकरण होण्याकरितां ( दिग्वलयं परिगणितं कृत्वा ) दिशेच्या सीमा मर्यादित करून ( अतः बहिः ) त्या सीमेच्या बाहेर ( आमृतिं ) मरेपर्यंत ( अहं ) मी ( न यास्यामि ) जाणार नाहीं ( इति संकल्पः ) अशा प्रकारचा जो दृढ निश्चय त्यास ( दिग्व्रत ) दिग्व्रत असें म्हणतात.

**अर्थः**—अमूक-विशिष्ट-मर्यादेपर्यंतच मी जाईन, त्यापुढें मी जाणार नाहीं, अशी आमरण प्रतिज्ञा करणें याला दिग्व्रत असें म्हणतात. दाहि दिशा विचारांत घेऊन त्या त्या दिशेंत कोठपर्यंत जावयाचें हें ठरविणें व त्या मर्यादेच्या पलिकडे जावयाचें नाहीं, असा संकल्प केल्यानें या व्रत घेतल्यानें-त्या मर्यादेच्या पलीकडच्या प्रदेशांतील सूक्ष्म पातकांचाही त्याग होतो. मुंबई अगर कलकत्त्यापर्यंतच्या भागांतच मी व्यवहार करीन, त्या पलीकडच्या शहरांशीं मी व्यापार करणार नाहीं, व्यापारासाठीं प्रवास करणार नाहीं अगर त्यासाठीं दुसऱ्यास पाठविणार नाहीं अगर पत्रव्यवहारानेंही व्यवहार करणार नाहीं; इत्यादि प्रतिज्ञा करणें याला दिग्व्रत असें म्हणतात. या व्रतामुळें लोभावर निर्बंध येतो; हिंसा घडावयाची असली तर ती विवक्षित मर्यादेंतच—हद्दींतच—घडेल. सारांश अणुव्रतांमध्यें दशदिशांची जी मोकळीक

मिळालेली असते त्या मोकळीकीला-स्वातंत्र्याला हळूंहळूं, क्रमाक्रमानें पायबंद घालून पांच पातकांना क्षीणता आणण्याच्या उद्देशानें गुणव्रताची व त्याच्या भेदाची योजना धर्मज्ञांनीं केली आहे. पहिल्या गुणव्रतांमध्यें भौगोलिक मर्यादा घालण्यांत आली आहे. वर व्यापार व व्यवहार यांचें उदाहरण दिलें आहे, परंतु दिग्व्रतामुळें हिंसादि सर्वच पातकें कमी होणार आहेत. घातलेल्या मर्यादेबाहेर न गेल्यानें त्या बाहेरच्या हद्दींत हिंसा घडणार नाहीं, चोरी करणें घडणार नाहीं, परस्त्रीसंगाचें पातक घडणार नाहीं अगर तेथें परिग्रहही वाढवितां येणार नाहीं. पांच प्रकारच्या पातकांपैकीं जीं पातकें घडतील, तीं या संकल्पित भौगोलिक क्षेत्राच्या मर्यादेंतच घडतील. पातकांना अशाप्रकारें क्षेत्रमर्यादा घालण्यांत आली.

### दिग्व्रताच्या मर्यादा.

**मकराकरसरिदटवीगिरिजनपदयोजनानि मर्यादाः ।**
**प्राहुर्दिशां दशानां प्रतिसंहारे प्रसिद्धानि ॥ ६९ ॥**

**अन्वयार्थः**—( दशानां दिशां ) दहाही दिशेंचा ( प्रतिसंहारे ) त्याग करण्याकरितां ( प्रसिद्धानि ) प्रसिद्ध (मकराकरसरिदटवीगिरिजनपदयोजनानि) समुद्र, नदी, वन, पर्वत, देश, योजन ह्या ( मर्यादाः ) सीमा ( प्राहुः ) सांगितल्या आहेत.

**अर्थः**—प्रसिद्ध नदी, नद, वन, पर्वत, देश इत्यादिकांच्या नांवानें मर्यादा ठरवाव्यात. अमूक योजन लांबीच्या-पल्ल्याच्या-बाहेर मी जाणार नाहीं, असेंही ठरवावें. उदाहरणार्थ अरबी समुद्रापलीकडे, सातपुड्यापलीकडे इत्यादि इत्यादि. एक योजन म्हणजे चार कोस. स्थानिक वहिवाटीप्रमाणें एका योजनाचे ६ ते ८ मैल भरतात. आचार्यांच्या काळीं हें मापन होतें व हल्लीं मैलांचे जसे दगड आहेत, तशी योजनांची खूण दाखविणारे दगड-खुणा-त्या काळीं होत्या असें दिसतें.

### दिग्व्रतधारणाचें फल.

**अवधेर्बहिरणुपापप्रतिविरतेर्दिग्व्रतानि धारयताम् ।**
**पंचमहाव्रतपरिणतिमणुव्रतानि प्रपद्यन्ते ॥ ७० ॥**

**अन्वयार्थः**—( अवधेःबहिः ) मर्यादेच्या बाहेर (अणुपापप्रतिविरतेः) सूक्ष्म पापांचा त्याग होत असल्यामुळें ( दिग्व्रतानि ) दिग्व्रतें ( धारयतां ) धारण करणाऱ्यांची ( अणुव्रतानि ) अणुव्रतें ( पंचमहाव्रतपरिणति ) पांच महाव्रताच्या सदृशतेला ( प्रपद्यन्ते ) प्राप्त होतात.

**अर्थः**—ज्यांनीं दिग्व्रत घेतलें, त्याजकडून त्या विशिष्ट क्षेत्रमर्यादेच्या बाहेर सूक्ष्म पातकेंही घडत नाहींत; म्हणून त्या मर्यादेच्या-हद्दीच्या-पलिकडे त्यांचीं अणुव्रतें महाव्रतासारखीं दिसतात. मनानें घालून घेतलेल्या मर्यादेंत भौगोलिक हद्दींत-ते अणुव्रती असतात, व घातलेल्या मर्यादेच्या पलिकडे ते महाव्रती सारखें भासतात. परंतु ते तसें प्रत्यक्ष असत नाहींत, तथापि मर्यादे-बाहेरच्या हद्दींत कोणतेंच पातक त्याजकडून घडून येत नाहीं. व्यवहाराला जितकें क्षेत्र अधिक तितकें पापालाही क्षेत्र अधिक. क्षेत्र मर्यादा घातल्यानें पापालाही आपोआपच मर्यादा बसते. सामान्यतः जेथें आपण हजर नाहीं तेथें आपल्या कडून पातकें घडत नाहींत. सांगलींत मी असतांना मुंबईस माझ्या हातून पातक कसें घडणार ? या व्रतांत पत्रव्यवहारानें अगर अशाच दुसऱ्या संकेतानेंही व्यवहारास मनाई असल्यानें व्रतानें ठरविलेल्या मर्यादेच्या बाहेर अप्रत्यक्षही पातकें घडत नाहींत.

### मर्यादेबाहेर महाव्रती कां होत नाहीं ?

## प्रत्याख्यानतनुत्वान्मन्दतराश्चरणमोहपरिणामाः ।
## सत्त्वेन दुरवधारा महाव्रताय प्रकल्प्यन्ते ।।७१।।

**अन्वयार्थः**—( प्रत्याख्यानतनुत्वात् ) प्रत्याख्यानावरण क्रोध, मान, माया, लोभ हे मंद असल्यामुळें ( मन्दतराः ) अत्यंत मंद झालेले ( चारित्रमोहपरिणामाः ) चारित्रमोहनीयाचे परिणाम ( महाव्रताय प्रकल्प्यन्ते ) महाव्रताची कल्पना उत्पन्न करितात, म्हणजे महाव्रतासारखें दिसतात आणि ( 'तें' ) ते चारित्रमोहनीय ( परिणामाः ) परिणाम ( सत्वेन ) अस्तित्वानें

( दुरवधाराः ) जाण्यास कठीण आहेत अर्थात् ते इतकें सूक्ष्म आहेत कीं त्यांचें अस्तित्वही लवकर लक्षांत येत नाहीं.

**अर्थः**—प्रत्याख्यानावरण-क्रोध, मान, माया व लोभ यांचा क्षयोपशम झाल्यानेंच महाव्रती होतां येते. श्रावक, क्रोध, मान, माया व लोभ या कषायांतून मुक्त झालेला नसतो; परंतु तो दिग्व्रती झाला असल्यानें मर्यादेबाहेरच्या प्रदेशांतही तो सूक्ष्म पापांचाही त्याग करितो. त्यामुळें त्याचें कषाय अत्यंत मंद होतात, म्हणून त्याचीं अणुव्रतें जरी महाव्रतासारखीं दिसत असलीं तरी साक्षात्-प्रत्यक्ष-तीं महाव्रतें होत नाहींत.

क्षेत्रमर्यादेचा संकल्प व त्यामुळें पातकांना बसणारा आळा, हा एक प्रकारचा कृत्रिम उपाय आहे. कामक्रोधादि कषायांतून जीव मुक्त झालेला नसतो. सांगलीबाहेर जावयाचें नाहीं, असें ठरविल्यानें सांगलीबाहेर माझ्या हातून पातक घडणार नाहीं परंतु त्यामुळें माझें मन कामक्रोधादि कषायाच्या तावडींतून सुटलेलें नसतें; म्हणून क्षेत्रमर्यादेबाहेर मी महाव्रती असल्यासारखा दिसतो, तसा प्रत्यक्ष कोठेंच असत नाहीं. क्षेत्राला मर्यादा आली परंतु मनाला ती आली नाहीं.

### महाव्रताचें लक्षण.

**पंचानां पापानां हिंसादीनां मनोवचःकायैः ।**
**कृतकारितानुमोदैस्त्यागस्तु महाव्रतं महताम् ॥७२॥**

**अन्वयार्थः**—( हिंसादीनां ) हिंसादिक ( पंचानाम् ) पांच (पापानां) पापांचा ( मनोवचःकायैः ) मन, वचन, काय यांनीं ( तु ) व ( कृतकारितानुमोदैः ) कृत, कारित, अनुमोदनानें (त्यागः) त्याग करणें हें ( महता ) श्रेष्ठ पुरुषांचें ( महाव्रतं ) महाव्रत होय,

**अर्थः**—हिंसादिक पांच पापांचा मन, वचन व काय यांनीं आणि कृत, कारित व अनुमोदनानें **संपूर्णपणें** त्याग करणें यास महाव्रत असें म्हटलें आहे.

दिग्व्रताचें वा तीनही गुणव्रतांचें विवेचन पुरें होण्यापूर्वीच महाव्रताचें लक्षण सांगण्याचा प्रयत्न कां झाला असावा ? वास्तविक हा श्लोक येथें नको होता, असें वाटतें. दिग्व्रतामुळें मर्यादेबाहेर दिग्व्रती महाव्रत्यासारखा दिसतो, असें मागील श्लोकांत म्हटल्यानें येथें महाव्रताचें लक्षण तर दिलें नसेल ना ?

## दिग्व्रताचें अतिचार.

**ऊर्ध्वाधस्तिर्यग्व्यतिपाताः क्षेत्रवृद्धिरवधीनाम् ।**
**विस्मरणं दिग्विरतेरत्याशाः पंच मन्यन्ते ॥ ७३ ॥**

**अन्वयार्थः**—( ऊर्ध्वाधस्तिर्यग्व्यतिपाताः ) अज्ञानानें किंवा प्रमादानें वरच्या, खालच्या किंवा विदेशाच्या मर्यादेचें उल्लंघन करणें ( क्षेत्रवृद्धिः ) क्षेत्राची मर्यादा वाढविणें व ( अवधीनां विस्मरणं ) मर्यादा विसरून जाणें, ( 'एते' ) हे पांच ( दिग्विरतेः ) दिग्व्रतांचे ( अत्याशाः ) अतिचार ( मन्यन्ते ) मानले गेले आहेत.

**अर्थः**—अज्ञानामुळें, विस्मरणामुळें अगर चुकीनें या व्रतांत जे अतिचार वा प्रमाद उत्पन्न होतात ते अतिचार पांच प्रकारचे आहेत. (१) उर्ध्वभागव्यतिक्रमण-पर्वत अगर वृक्षादिकांच्या शिखरावर चढणें (२) अधोभागव्यतिक्रमण विहीर अगर विहीरीसारख्या जमिनींत खोल गेलेल्या भागांत जाणें (३) तिर्यग्भागव्यतिक्रम-तिरकस रस्ता आहे अगर आकार आहे अशा गुहादि भागांत जाणें, (४) अवधि-केलेल्या मर्यादेचें विस्मरण होणें; म्हणजे अमूक एका दिशेची मर्यादा १०० कोस घातली होती कीं ५० कोस घातली होती याबद्दल संशय आल्यानंतर ५० कोसापुढें जाण्यानें अवधिविस्मरण अतिचार घडतो. परंतु १०० कोसाच्याही पलीकडे जाण्यानें व्रतभंग होतो. (५) क्षेत्रवृद्धि-एका देशची मर्यादा वाढविणें व दुसऱ्या दिशेची मर्यादा कमी करणें. उदाहरणार्थ व्रत घेतांना १०० कोस पूर्वेला व २०० कोस पश्चिमेला, अशी मर्यादा घातली असतां १०० ची मर्यादा १५० करणें

व २०० ची मर्यादा १५० वर आणून ठेवणें. पूर्वेला १०० व पश्चिमेला २०० मिळून ३०० कोसाची मर्यादा होती व दोन्ही दिशेला दीडशे-दीडशेची मर्यादा घातल्यास बिघडतें कोठें ? अशा प्रतिपादनास तक्रार राहणार म्हणून मर्यादेच्या क्षेत्रांत असा बदल केला तरी व्रतांत अतिचार दोष घडतो. संकल्पित मर्यादेचे क्षेत्रफळ विचारांत घेऊन त्या क्षेत्रफळांत फेरफार तर करावयाचा नाहीं. दिशांच्या संकल्पित क्षेत्रांत फेरफार करावयाचा. अशा प्रकारास आळा घालण्याचा हा प्रयत्न आहे.

### अनर्थदंडव्रताचें स्वरूप.

**अभ्यन्तरं दिगवधेरपार्थिकेभ्यः सपापयोगेभ्यः ।**
**विरमणमनर्थदण्डव्रतं विदुर्व्रतधराग्रण्यः ॥ ७४ ॥**

**अन्वयार्थः**—( दिगवधेः ) दिशांच्या मर्यादेच्या ( अभ्यंतरं ) आंत ( अपार्थिकेभ्यः ) प्रयोजन रहित ( सपापयोगेभ्यः ) पापांच्या संबंधापासून अर्थात् पापरूप मन, वचन आणि काय यांच्या प्रवृत्तीपासून ( विरमणं ) विरक्त होणें यांस ( व्रतधराग्रण्यः ) व्रतें धारण करण्यांत अग्रगण्य असणारे अर्थात् तीर्थंकर देवादिक ( अनर्थ दंडव्रतं ) अनर्थ दंडव्रत ( विदुः ) म्हणतात.

**अर्थः**—दिग्व्रतांत घातलेल्या मर्यादेच्या **आंतही** ज्या कृत्यामुळें धर्म यश, सुख व लाभ यापैकीं एक अथवा अधिकाची प्राप्ती होणार नसतांही निष्कारण पापबंध होईल अशीं कृत्यें न करणें याला अनर्थदंडव्रत असें म्हणतात. व्रतांत विशिष्ट मर्यादेच्या बाहेरच्या प्रदेशांत पापोपदेशादिकांचा त्याग होतो, परंतु अनर्थदंडव्रतांत मर्यादेच्या आंतही निष्कारण पापोपदेशिकाचा त्याग सांगितला आहे.

मन, वचन व काया यांची निष्कारण पाप-कारक व परपीडाकारक प्रवृत्ति होते, म्हणून या व्रतास अनर्थदंड असें नांव दिलें आहे. उत्तम, मध्यम, कनिष्ट व जघन्य मानवीप्राणी कोण याची तुलना करितांना एका कवीनें 'जे कां व्यर्थ परार्थ हानि करिती ते कोण कीं दुर्मति' असें म्हटलें आहे. स्वतःचा

लाभ नाहीं परंतु केवळ दुसऱ्याची हानी करण्याची जी मनःप्रवृत्ति, तिजवर बंधन घालण्याचा उपाय ह्मणजे अनर्थ दंडव्रती होणें, हा आहे. दंड ह्मणजे मन, वचन व काया यांची निष्कारण अशुभ-पापजनकप्रवृत्ति. संकल्पित मर्यादेच्या आंतहि आपलें वर्तन कसें असावें, याबद्दलचा उपदेश या श्लोकांत सांगितला आहे.

### अनर्थदंडव्रताचे भेद.

**पापोपदेशहिंसादानापध्यानदुःश्रुतीः पंच ।**
**प्राहुः प्रमादचर्यामनर्थदण्डानदण्डधराः ॥ ७५ ॥**

**अन्वयार्थः**—( अदण्डधराः ) दण्डाला न धरणारे अर्थात गणधरादिक देव ( पापोपदेशहिंसादानापध्यानदुःश्रुतीः ) पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति आणि ( प्रमादचर्या ) प्रमादचर्या ( ' एतान् ' ) यांना ( पंच ) पांच ( अनर्थदण्डान् ) अनर्थ दण्ड असें ( प्राहुः ) ह्मणतात.

**अर्थः**—(१) पापोपदेश (२) हिंसादान (३) अपध्यान (४) दुःश्रुति व (५) प्रमादचर्या असे अनर्थ दण्डव्रताचें पांच भेद वा प्रकार आहेत. या पांच भेदांचें स्वरूप-लक्षण यापुढें क्रमवार दिलें आहे. या पांचही प्रकारच्या अनर्थ दंडव्रतांचा त्याग करणारा अनर्थ दंडव्रती होतो.

### (१) पापोपदेश अनर्थदंडाचें स्वरूप.

**तिर्यक्क्लेशवणिज्याहिंसारम्भप्रलम्भनादीनाम् ।**
**कथाप्रसंगप्रसवः स्मर्तव्यः पाप उपदेशः ॥ ७६ ॥**

**अन्वयार्थः**—( तिर्यक्क्लेशवणिज्याहिंसारम्भप्रलम्भनादीनाम् ) तिर्यंचांना दुःख उत्पन्न करणाऱ्या, तसेंच व्यापार, हिंसा, आरंभ व फसवेगिरी इत्यादिका संबंधीच्या ( कथाप्रसंगप्रसवः ) कथेच्या प्रसंगाला उत्पन्न करणारा ( पापः उपदेशः ) पापोपदेश आहे असें ( स्मर्तव्यः ) जाणावें.

**अर्थः**—तिर्यग्व्यापार, क्लेश, व्यापार, हिंसा, आरंभ व छलादिकांचा उपदेश करणें याला पापोपदेश-अनर्थ-दंड-ह्मणतात. अमूक ठिकाणच्या

बाजारांत अगर अमूक गांवीं गाय, म्हैस, व उंट वगैरे जनावरें खरेदी केल्यास अगर तेथें तीं विकल्यास, त्या व्यवहारांत फायदा होईल, असा उपदेश करणें; क्लेश वाणिज्योपदेश-अमूक ठिकाणीं गुलाम-लोक कमी किंमतीस मिळतात अगर अधिक किंमतीस विकले जातात, तरी असा व्यवहार करा असें सांगणें (३) हिंसोपदेश-हरिण, ससा, रानडुकर आदि पशू अमूक ठिकाणीं मिळतील अशी माहिती शिकारी लोकांना देणें. (४) आरंभोपदेश-बागबगीच्या करण्याचा, घरें बांधण्याचा, विवाह करण्याचा वगैरे उपदेश करणें, सल्ला देणें अथवा गवत जाळिलें असतां त्याची वाढ फार होते इत्यादि माहिती सांगणें. (५) प्रलंभोपदेश-इंद्रजाल, रसायन करण्याचा, सट्टेबाजी करण्याचा उपदेश करणें. अशा प्रकारच्या उपदेशाचा समावेश पापोपदेश अनर्थ दंडांत केला आहे व अशा प्रकारच्या उपदेशांना पापोपदेश म्हटलें आहे. अशा उपदेशाचा त्याग करणें याला पापोपदेश अनर्थदंडव्रत असें म्हटलें आहे. हा श्लोक व पूर्वीचे कांहीं श्लोक यांचा मतितार्थ विचारांत घेतां आचार्यांचे काळीं तरी निदान वजनें, मापें, प्रचारांत होतीं. जनावरांच्या विक्रीचे बाजार होते, गुलामांचा व्यापार प्रचलित होता, गुलामगिरीची पद्धत अनिष्ट आहे, मानवी व्यवहाराला तो कलंक आहे, अशी समजूत होऊन गुलामांचा व्यवहार कायद्यानें बंद होण्यापूर्वी सुमारें १५०० वर्षे अगोदर जैनधर्मियांनीं या व्यापाराचा निषेध केला आहे, ही गोष्ट चटकन् लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं.

श्लो. सं. ७४ खालीं अनर्थदंडव्रत या शब्दांतील **दंड** या शब्दाचा अर्थ खालीं दिला आहे. मन, वचन व काया यांची जी निष्कारण पापप्रवृत्ति असते, त्याला आळा घालण्याच्या स्तुत्य हेतूनें या व्रतांची योजना केली आहे. दिग्व्रत पालनामुळें विशिष्ट-दिग्व्रतांतील मर्यादेबाहेरच्या पापांचा त्याग होतो. त्या मर्यादेबाहेरच्या पातकांना पायबंद घालूनही धर्मज्ञांचें समाधान होणें शक्य नाहीं. पातकांचा सर्वस्वी त्याग झाला पाहिजे हें तर त्यांचें ध्येय. त्या ध्येयाकडे हळूं हळूं नेणें, प्रगतीची एक एक पायरी चढवीत जाणें, हा

श्रावकाचार सांगण्याचा एकमेव उद्देश. हा उद्देश सिद्धीस कसकसा नेला जात आहे हें समजून घेणें जरूर आहे.

दिग्व्रतांमुळें विशिष्ट मर्यादेच्या बाहेरील पातकें बंद केलीं, परंतु ज्या मर्यादेच्या बाहेर व्यवहार करावयाचा नाहीं असें व्रत दिग्व्रतांत घेतलें असलें तरी त्या मर्यादेंत हीं निष्कारण पातकें घडूं द्यावयाचीं नाहींत. पापोपदेशव्रतांत ही योजना केली आहे. पापोपदेशव्रताचा सूक्ष्म विचार केल्यास कृत कारित व अनुमोदित या तीन मार्गांपैकीं शेवटच्या दोन मार्गांनाच प्रतिबंध केला आहे. जनावराच्या बाजाराची माहिती दुसऱ्यास सांगावयाची नाहीं परंतु स्वतःलाच स्वतःच्या जनावराच्या खरेदीविक्रीसाठीं जावयाचें आहे अगर स्वतच्या अशा व्यवहारासाठीं भावाला, मुलाला अगर नोकरचाकरादिकांना पाठवावयाचें आहे. स्वतः गेलो अगर इतरांना पाठविलें तरीही हें व्रत पालनच होईल; कारण यामुळें हा उपदेश निष्कारण होणार नाहीं. स्वतःचा असा व्यवहार वगळून इतरांना उपदेश करण्याचें वर्ज्य केल्यानें तितक्या अंशानें पाप कमी घडेल. अर्थातच त्या क्षेत्र मर्यादेंतही निष्कारण पाप घडणार नाहीं.

### (२) हिंसादान अनर्थदंडाचें स्वरूप.

**परशुकृपाणखनित्रज्वलनायुधशृंगशृंखलादीनाम् ।**
**वधहेतूनां दानं हिंसादानं ब्रुवन्ति बुधाः ॥ ७७ ॥**

**अन्वयार्थः**—(परशुकृपाणखनित्रज्वलनायुधशृंगशृंखलादीनाम्) कुऱ्हाड तलवार, फावडे, अग्नि, शस्त्र, शिंग व सांखळी इत्यादि ( वधहेतूनां ) हिंसेच्या कारणासाठीं ( दानं ) दान देणें यास ( बुधाः ) सूज्ञलोक ( हिंसादानं ) हिंसादान ( ब्रुवन्ति ) ह्मणतात.

**अर्थः**—कुऱ्हाड व तलवार इत्यादि तोडण्याचीं हत्यारें, कुदळ, खोरें इत्यादि उकरण्याचीं साधनें, अग्निआदि जाळण्याची साधनें, विषादि मारण्याचीं साधनें, इतरांना 'वधहेतूनां' दुरुपयोग करण्यासाठीं देणें, याला अनर्थ-

दंड ह्मणतात. जिनमंदिराचा पाया घालण्यासाठीं कुदळ व खोरें दिलें तरी पापच घडेल काय ? अशी शंका घेण्यांत आल्यास त्याचें उत्तर नकारार्थीच द्यावें लागेल. यावेळीं मनाची प्रवृत्ति अशुभ नसते, सद्भावना असते. पापहेतूनें अशा वस्तूंचा पुरवठा करणें त्याज्य मानिलें आहे.

मागील श्लोकांत जी चर्चा केली आहे ती विचारांत घेतां, या श्लोकांत तोडणें अगर उकरणें इत्यादिकांचीं साधनें आपल्या जवळ ठेवणें अगर आपल्या नेहमींच्या व्यवहारांत उपयोग करणें वर्ज्य मानिलेलें नाहीं. ती शेतीभातीच्या अगर अशाच इतर कामासाठीं देण्यास हरकत नाहीं; मात्र ती साधनें ' वधहेतूनां ' ह्मणजे हिंसा अगर पातकें करण्याच्या हेतूनें देऊं नयेत, असा निर्बंध घातला आहे. या उद्देशाकडे दुर्लक्ष झाल्यानें लोखंडाचा व्यापारही करू नये, असें ह्मणणारे पं. आशाधरासारखे अनेक विद्वान दिसून येतात.

### (३) अपध्यान अनर्थदंडाचें स्वरूप.

**वधबंधच्छेदादेर्द्वेषाद्रागाच्च परकलत्रादेः ।**
**आध्यानमपध्यानं शासति जिनशासने विशदाः ॥७८॥**

**अन्वयार्थः**—( द्वेषात् ) द्वेषानें ( वधबंधच्छेदादेः ) नाश, कैद, छेद इत्यादिकांसंबंधीं ( च ) व ( रागात् ) रागानें ( परकलत्रादेः ) दुसऱ्याच्या स्त्रीसंबंधी ( आध्यानं ) चिंतवन करणें यास ( जिनशासने ) जैनशास्त्रांत ( विशदाः ) निपुण असलेले लोक ( अपध्यानं ) अपध्यान असें ( शासति ) ह्मणतात.

**अर्थः**—अमूक इसमाला, त्याच्या मुलाला, बायकोला अगर त्याच्या आप्तेष्टाला मरण यावें, अमक्याला दंड व्हावा, अमक्याचा अपमान व्हावा, त्याची अब्रू खराब व्हावी, त्याची संपत्ति नाहींशी व्हावी, अमक्याची नोकरी जावी, त्याच्या उपजीविकेचा धंदा बसावा, अशा तऱ्हेचें दुसऱ्याबद्दल वाईट चिंतन करणें याला अपध्यान असें ह्मणतात. अशा चिंतनामुळें व विचारामुळें आपला कोणताही कार्यभाग होत नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें या गोष्टी

घडतातच असें नाहीं. ज्याच्या कर्माचें फळ त्यास मिळणारें असतें. अशा तऱ्हेचे कुविचार मनांत येऊं दिल्यानें आपण मात्र निष्कारण पापाचे धनी होतो. सबब अशा विचारांचा स्पर्श मनाला होऊं देऊं नये.

या श्लोकांत विशिष्ट क्षेत्रमर्यादेत असतांही इतरांबद्दल कुविचार वर्ज्य करण्यास सांगितलें आहे. रागद्वेषादि षड्रिपूवर अंशतः तरी ताबा मिळवितां यावा व ध्येय गांठण्याची एक पायरी ओलांडण्याची संवय मनाला लागावी, हा उच्च हेतु या मतांत आहे.

## (४) दुःश्रुति अनर्थदंडाचें स्वरूप.

**आरम्भसङ्गसाहसमिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ।**
**चेतः कलुषयतां श्रुतिरवधीनां दुःश्रुतिर्भवति ॥ ७९ ॥**

**अन्वयार्थः**—( आरम्भसंगसाहसमिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ) आरंभ, परिग्रह, साहस, मिथ्यात्वद्वेष, राग, गर्व व कामविकार यांनीं ( चेतः ) अन्तःकरण ( कलुषयतां ) कलुषित करणाऱ्या ( अवधीनां ) शास्त्रांचें (श्रुतिः) ऐकणें हें ( दुःश्रुतिः ) दुःश्रुति नांवाचा अनर्थदण्ड ( भवति ) होय.

**अर्थः**—आरंभ, साहस, परिग्रह, मिथ्यात्व, राग, द्वेष, मद आणि विषयोपभोग याबद्दलचा वृतांत प्रतिपादन, चर्चा, अगर विवेचन ज्यांत केलें आहे; अशीं पुस्तकें, ग्रंथ अगर शास्त्र वाचणें, वाचून दुसऱ्यांना सांगणें अगर दुसऱ्यांनीं सांगितलेलें ऐकणें, हें त्याज्य मानावें; कारण यामुळें मनाचे धर्म कलुषित होतात. मन मलीन होतें व मनांत कुविचार उत्पन्न होतात. उदाहरणार्थ शेतीविषयक, राजनैतिक, व्यापारविषयक, वीरकथा, अद्वैत शास्त्रें, वशीकरण विद्या, रतिरहस्य, रतिविलास, भामिनीविलास इत्यादि पुस्तकें. अशा पुस्तकांच्या पठनपाठनामुळें, अध्ययन-अध्यापनामुळें मनाचें कषाय बिघडतात. येथें अशी शंका येईल कीं, जगज्जेता नेपोलीयन याचें चरित्र वाचूं नये कीं काय ? कारण त्यानें जग जिंकण्याचें साहस केलें, त्यासाठीं लाखो सैनिक व युद्धसामुग्री जवळ ठेविली. त्याच्या साहसाचें व परिग्रहाचें

अनुकरण करण्यासाठीं वाचूं नये. चरित्रापासून बोध घेण्याचें हेतूनें वाचावें. असें न होईल तर जैन इतिहास तरी वाचनीय कसा होईल ?

## प्रमादचर्या अनर्थदंडाचें स्वरूप.

**क्षितिसलिलदहनपवनारम्भं विफलं वनस्पतिच्छेदम् ।**
**सरणं सारणमपि च प्रमादचर्यां प्रभावन्ते ॥८०॥**

**अन्वयार्थः**—( विफलं ) विनाकारण ( क्षितिसलिलदहनपवनारम्भ ) पृथ्वी, पाणी, अग्नि व वारा यांचा आरंभ करणें ( वनस्पतिच्छेदं ) झाडें तोडणें ( सरणं ) पर्यटन करणें ( च ) आणि ( सारणं अपि ) पर्यटन करविणें यास ( प्रमादचर्यां ) प्रमादचर्या ( प्रभाषन्ते ) ह्मणतात.

**अर्थः**—विनाकारण जमीन खोदणें अगर उकरणें, पाणी निष्कारण वाहूं देणें, विस्तव पेटविणें अगर पेटविलेला निष्कारण जळत राहूं देणें, वनस्पति तोडणें, वारा घालणें, पळणें व पळावयास लावणें इत्यादि कृत्यांना प्रमादचर्या अनर्थदंड, असें ह्मणतात. अनर्थदंडव्रत व त्याचें भेद यांत धर्म, यश, सुख व लाभ यापैकीं एक किंवा अधिकाची प्राप्ति नसतांना ज्या निष्कारण अनेक गोष्टी आपण नेहमीं करितों, त्यांना निर्बंध घातला गेला आहे.

या श्लोकांतील ' विफलम् ' हा शब्द महत्वाचा आहे. शेतकीसाठीं झाड तोडणें अगर स्वयंपाकासाठीं चूल पेटविणें, हीं वर्ज्य मानिली नाहींत. स्वयंपाक झाल्यावर निष्कारण चूल पेटलेली राहूं देणें वर्ज्य मानिलें आहे. ' विफलं '–निष्कारण–ज्याचें फल नाहीं अगर जरूरी नसतांना–वरील क्रिया करूं नयेत हा मतितार्थ आहे.

स्व. वा. हिराचंद नेमचंद दोशी यांनीं प्रसिद्ध केलेल्या या श्रावकाचाराच्या प्रतींत पान १६८ वर अनेक पदार्थांचा व्यापार निंद्य व पापजनक ठरविला आहे, त्यांची बरीच मोठी यादी दिली आहे. लोखंड, नीळ, मेण, मीठ, साबण, लाख, कातडे, लोकर, केश, कुसुंबी, गूळ, साखर, धान्य,

तांदूळ वगैरे व शस्त्र, दारू, शिसें, कांदे, दास, घोडा, उंट, बैल, म्हैस, गाडी, पिंजरा, जाळें, साखळदंड, विटा व चुना वगैरे विकत देणें व घेणें व त्यांचा संचय करणें. कारण यांमध्यें फार हिंसा घडत असते. यामुळें अशा पदार्थांचा व्यापार करणें योग्य नाहीं. यापुढें अपराध्याची चहाडी करणें, वैद्यकीवर आपली उपजीविका चालविणें व द्विदल अन्नाचें दह्याताकाशीं मिश्रण करून खाणें, इत्यादि गोष्टी करणें हें पापजनक आहे. पान १६८ ते १७९ वर वरील पुस्तकांत जें विवेचन केलें आहे व तसें करतांना **वगैरे शब्द** घातला आहे, यावरून या श्लोकाचा भावार्थ त्या टीकाकारांनीं अति व्याप्तीचा मानिला आहे असें निर्विवाद दिसतें. मीठ, तांदूळ, गूळ व साखर इत्यादि पदार्थांचा व्यापार करणेचा झाल्यास त्यांचा संग्रह करावा लागतो व संग्रह केल्यानें त्यांत ऋतुमानाप्रमाणें जीवजंतु उत्पन्न होतात व व्यापाराच्या देवघेवींत ते मरतात, अशा तऱ्हेची ही विचारसरणी आहे. आचार्य समंत-भद्रांना ही विचारसरणी पसंत पडली असती असें आमच्या अल्पबुद्धीला तरी वाटत नाहीं.

आचार्यवचनांची अशी ओढाताण करणारे पंडित उदयास आले व त्यांचें अशा तऱ्हेचें लेखन पाहून जैनधर्म हा अव्यवहार्य धर्म आहे; संसारी लोकांना आचरण्यास अशक्य असा तो आहे, अशी साधार समजूत झाली असल्यास नवल नाहीं.

लोखंड, शिसें व साखळदंड यांचा व्यापार निंद्य कां ? तर त्यांचें हत्यारांत रूपांतर होते व हत्यारामुळें हिंसा घडते !! या यादींत साबणाचा उल्लेख केला आहे. साबण ही वस्तु आचार्यांच्यावेळीं होती तरी काय ? हेतूकडे पाहणाऱ्या धर्माला बाजूस सारून आपली मतें दडपून देण्याचा हा प्रयत्न दिसतो. या श्लोकांतील 'विफलं' या शब्दाकडे दुर्लक्ष झाल्याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

### अनर्थदंडव्रताचे अतिचार.

**कन्दर्पं कौत्कुच्यं मौखर्यमतिप्रसाधनं पञ्च ।**
**असमीक्ष्य चाधिकरणं व्यतीतयोऽनर्थदण्डकृद्विरतेः ॥८१॥**

**अन्वयार्थः**—( कंदर्पं ) रागामुळें हास्यमिश्रित बीभत्स वचन बोलणें, ( कौत्कुच्यं ) बीभत्स वचनानींसहित अशी कुचेष्टा करणें, ( मौखर्यं ) धृष्टतेनें व्यर्थ बडबड करणें ( अतिप्रसाधनं ) जरूरीपेक्षां जास्त भोगोपभोगाची सामुग्री गोळा करणें ( च ) आणि ( असमीक्ष्य अधिकरणं ) विचार न करितां निरर्थक काम करीत राहणें हे ( पंच ) पांच ( अनर्थदण्डकृद्विरतेः ) अनर्थ दंडत्यागव्रताचे ( व्यतीतयः ) अतिचार आहेत.

**अर्थः**—(१) कंदर्प-राग-थट्टेवारी अगर विनोदानें, अश्लील, बीभत्स अगर खोटें बोलणें (२) कौत्कुच्य-शरीराच्या अवयवाची चेष्टा करून बीभत्स क्रिया करून दाखविणें अगर शरीरासंबंधीं बीभत्स बोलणें (३) मौखर्य-धाड-सानें, उतावळेपणानें-फाजील बोलणें (४) अतिप्रसाधनम्-जरूरीपेक्षां भोगोप-भोगाच्या सामुग्रीचा संग्रह करणें (५) असमीक्ष्याधिकरणं--हेतूशिवाय, निष्कारण कोणतेंही कार्य करणें असें अनर्थ दंडव्रताचें पांच अतिचार आहेत.

**सारांशः**—अनर्थदंडव्रताच्या या पांच भेदांत दिग्व्रतांत घेतलेल्या क्षेत्र मर्यादेंतही **निष्कारण** पातकें घडूं नयेत, अशी खबरदारी घेण्यांत आली आहे. हें व्रत घेतल्यानें संसारांतील आपल्या नित्याच्या व्यवहारांत अडथळा मुळींच होत नाहीं. संसारांत असतां ज्या अनेक क्रिया नित्य घड-ण्याचा संभव असतो, त्यापैकीं ज्या क्रिया निष्कारण आहेत, त्या वर्ज्य मानिल्या आहेत.

शेतकीच्या कामाची आपली आऊतें दुसऱ्यास शेतीच्या कामासाठीं देण्यांत पाप नाहीं; मात्र आपली कुऱ्हाड झाड तोडण्यास देऊं नये. लाकूड-फोड्याचा धंदा करणाऱ्यास लाकूड फोडण्यास देण्यास हरकत नाहीं. इतर कृत्याच्या बाबतींतही असाच बोध घेणेचा आहे. हेतूला प्राधान्य दिलें आहे;

कारण जैनधर्म हेतूकडे पाहतो व त्यावरून चांगलें-पुण्य-कोणतें वाईट-पाप कोणतें हें ठरवितो.

## भोगोपभोगपरिमाणव्रताचें स्वरूप.

**अक्षार्थानां परिसंख्यानं भोगोपभोगपरिमाणम् ।**
**अर्थवतामप्यवधौ रागरतीनां तनुकृतये ॥८२॥**

**अन्वयार्थः**—( रागरतीनां ) रागाच्या उदयानें होणाऱ्या विषयाच्या आसक्तीला ( तनूकृतये ) कमी करण्याकरितां ( अवधौ अपि ) 'परिग्रहपरिमाणाणुव्रताच्या' मर्यादेंतदेखील ( अर्थवतां ) प्रयोजनभूत ( अक्षार्थानां ) इंद्रियांच्या विषयांचें ( परिसंख्यानं ) प्रमाण करणें हें ( भोगोपभोगपरिमाण ) भोगोपभोगपरिमाण व्रत होय.

**अर्थः**—परिग्रहपरिमाणाणुव्रतांत जें प्रमाण मनानें घातलेले असतें, त्यांतही संकोच करून तीही मर्यादा कमी कमी करीत आणणें, याला भोगोपभोगपरिमाणव्रत ह्मणतात. ही मर्यादा कांहीं विशिष्ट मुदतीची अगर आमरणाची असते.

परिग्रहावरील आसक्ति कमी कमी करीत जावी, हा यांत हेतू आहे. परिग्रहावरील आसक्ति ज्या प्रमाणांत कमी होईल त्याप्रमाणें कमी अधिक प्रमाणांत पातक कमी होत जाणार; हें उघड आहे. मुनींना सर्वसंग परिग्रहत्यागी व्हावें लागतें; त्या तयारीची ही पूर्व तयारी आहे. परिग्रह परिमाण, त्यानंतर भोगोपभोग परिमाण व त्यानंतर सर्वसंग-परिग्रह-त्याग अशी ही प्रगतीची परंपरा आहे.

परिग्रहपरिमाणव्रताची पुढील पायरी ह्मणून या व्रताची योजना आहे. आचरणांत विकास करण्याची ही योजना आहे. भोगांत त्याग व भोगत्यागानंतर दान, त्यागांत जें सुख आहे, त्यापेक्षां शतपटीनें अधिक सुख दानांत आहे. भोगांतील त्याग वैयक्तिक व दानाचें क्षेत्र विस्तृत. स्वतःचें मन

मारून स्वतःवरच त्यागांत उपकार होतो व दानांत दुसऱ्यावर उपकार होतो. यामुळें त्यागापेक्षां दानाचें महत्व विशेष आहे.

### भोग व उपभोग यांचें स्वरूप.

**भुक्त्वा परिहर्तव्यो भोगो भुक्त्वा पुनश्च भोक्तव्यः।**
**उपभोगोऽशनवसनप्रभृति पंचेन्द्रियो विषयः ॥ ८३ ॥**

**अन्वयार्थः**—( अशन वसन प्रभृति ) भोजन, वस्त्र इत्यादिक ( पंचेन्द्रियः विषयः ) पंचेंद्रियांचें विषय ( भुक्त्वा ) भोगून ( परिहर्तव्यः ) सोडून देणें हा ( भोगः ) भोग होय, ( च ) आणि ( भुक्त्वा ) भोगून ( पुनः ) पुन्हा ( भोक्तव्यः ) भोगणें हा ( उपभोगः ) उपभोग होय.

**अर्थः**—ज्या एका पदार्थाचे अनेकवार भोग घेतां येतात त्यास उपभोग ह्मणतात; उदाहरणार्थ दागिने, कपडे, घरदार इत्यादि एकवार भोग घेतल्यानंतर फिरून भोग घेतां येत नाहीं; अशाला भोग ह्मणतात; उदाहरणार्थ अन्न, गंध इत्यादि.

एक कपडा दहा वेळ वापरतां येतो. घराचा उपभोग अनेक वर्षें घेतां येतो. उगाळलेला गंध व शिजवलेलें अन्न एकच वेळ उपयोगांत आणतां येते. वरील खुलाशावरून भोग व उपभोग यामधील अर्थाचा फरक कळेल.

### भोगोपभोग परिमाणांत त्याज्य गोष्टी.

**त्रसहतिपरिहरणार्थं क्षौद्रं पिशितं प्रमादपरिहृतये।**
**मद्यं च वर्जनीयं जिनचरणौ शरणमुपयातैः ॥८४॥**

**अन्वयार्थः**—( जिनचरणौ शरणं उपायतैः ) जिनेंद्र भगवंताच्या चरणाला शरण जाणाऱ्या पुरुषाकडून ( त्रसहतिपरिहरणार्थं ) त्रस जीवांच्या हिंसेच्या निवारणार्थ ( क्षौद्रं ) मधु व ( पिशितं ) मांस ( च ) आणि ( प्रमादपरिहृतये ) प्रमादाचा नाश करण्याकरितां ( मद्यं ) दारू ( वर्जनीयं ) सोडण्यास योग्य आहेत.

**अर्थः**—मधु व मांस खाण्यानें त्रस जीवांची हिंसा होते व दारू प्याल्यानें त्रस-हिंसा होऊन मनावर, बुद्धीवर व मेंदूत मोह उत्पन्न होतो.

सारासार विचारही नष्ट होतो. यामुळें भोगोपभोग परिमाणव्रत धारण करणाऱ्यांनीं या तीन प्रकाराचा संपूर्ण त्याग केला पाहिजे.

इतर वस्तूंचें परिमाण करण्याबद्दल सांगितलें आहे, परंतु मद्य, मांस व मधु यांचा सर्वथा त्याग सांगितला आहे. या 'म'कारत्रयाच्या बाबतींत परिमाण-मर्यादा यांची अपेक्षा धरण्यांत आलेली नाहीं. 'म'कारत्रयाच्या सेवनामुळें होणारी हानि व जडणारीं पातकें व घडणारे परिणाम यांचा विचार करून या मकारत्रयाबद्दल कडक निर्बंध घातला आहे. श्रावकांचें मूलगुण-मुख्य अगर प्राथमिक-आठ मूलगुणांत या मकारत्रयाचा समावेश केलेला असतां येथें पुनः निर्बंध घालण्याची जरूरी अनावश्यक वाटते. आठ मूल-गुणांत या 'म'काराचा संपूर्णता त्याग सांगितला नसेल तर हा निर्बंध येथें आवश्यक होईल. याशिवाय दुसरा कोणता हेतू असल्यास न कळे !!

या व्रताचा गुणव्रतांत समावेश करण्यांत आला आहे. अणुव्रतांची वाढ करणारी जी व्रतें ती गुणव्रतें होत. आचार्य समंतभद्रांनीं श्लो. सं. ६६ मध्यें आठ मूलगुण सांगतांना 'म'कारत्रयाचा त्यांत समावेश केला आहे. या आठमूलगुणांपैकीं अहिंसादि अणुव्रतांची वाढ करण्यास गुणव्रतांत भरपूर अवधि दिला आहे. शिक्षाव्रतांत याहीपुढें मजल मारण्यास सांगितलें आहे. अहिंसादि पांचही स्थूल अणुव्रतेंच असल्यानें व अंशतः अगर स्थूलमानानें पाळावयाची असल्यानें त्यांच्या वाढीला व विकासाला जागा आहे. परंतु मद्य, मांस व मधु यांचें अणु म्हणजे अंशतः स्वीकार व अंशतः वर्ज्य ही परिस्थिती शक्य तरी कशी ? अंशतः त्यागच शक्य नाहीं. ती घ्यावयाची नाहीं असें म्हटलें कीं प्रश्नच मिटला, मग त्या वर्ज्यांचा विकास व वृद्धि ती कशी करावयाची ?

आचार्य वचनाबद्दल वा आगमाबद्दल ही शंका घेतल्याबद्दलच्या दोषाची धास्ती बाळगीत नाहीं असें नाहीं. दारू, मांस व मद हे वर्ज्यम्याचें पर्यायपात्रन्या दिसत नसल्यानें थोड्याश्या अधिक विस्तारानें हे विचार मांडिले आहेत.

अनर्थदंड, पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुश्रुति व प्रमादचर्या या व्रतांच्या पालनामुळें आध्यात्मिक उन्नतिबरोबरच परोपकाराची मर्यादा वाढत जाते. ' अहिंसा परमो धर्मः' अगर 'नहि सत्यात् परो धर्मः' याचप्रमाणें परोपकाराचाही महिमा वर्णिला आहे. ' परोपकाराय सतां विभूतयः ' ही ह्मण सुप्रसिद्ध असली तरी व्यास मुनींचें वचन अविस्मरणीय आहे. ते ह्मणतात अष्टादशपुराणानां सारं सारं समुद्धृतम् । परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥ सारांश-आठराही पुराणांचें सार काढिलें-ह्मणजे सर्व धर्मग्रंथांचा सार काढिला तर हेंच निष्पन्न होते कीं, दुसऱ्याला पीडा करण्यासारखें दुसरें पातक नाहीं व परोपकारासारखें दुसरें कोणतेही पुण्यकर्म नाहीं. वरील व्रतांच्या पालनामुळें परोपकार पराकोटीला पोंचेल, यांत संशय नाहीं.

( पहा श्लो. सं. ६६ व त्याखालील विवेचन. )

## भोगोपभोगपरिमाणव्रतांत दुसऱ्या त्याज्य गोष्टी.

**अल्पफलबहुविघातान्मूलकमार्द्राणि शृंगबेराणि ।**
**नवनीतनिंबकुसुमं कैतकमित्येवमवहेयम् ॥ ८५ ॥**

**अन्वयार्थः**—( अल्पफलबहुविघातात् ) थोडासा फायदा होतो परंतु पुष्कळ जीवांचा घात होत असल्यामुळें ( आर्द्राणि ) ओली ( शृंगबेराणि ), सुंठ अर्थात् आलें ( मूलक ) मुळा ( नवनीतनिंबकुसुमं ) लोणीं, निंबाचीं फुलें ( कैतकं ) केवडा ( इति एवं ) इत्यादि सर्व ( अवहेयं ) सोडण्यास योग्य आहेत.

**अर्थः**—ज्या पदार्थांच्या खाण्यानें व सेवनानें फायदा थोडा परंतु त्रस जीवांची हिंसा फार होतें, असें पदार्थः-उदाहरणार्थ आलें, मुळा, लोणीं, फुलें इत्यादि पदार्थांचाहीं त्याग करावा–असलें पदार्थ खाऊं नयेत. मकारत्रया-प्रमाणें याही वस्तूबद्दल परिमाणाचा निर्बंध न घालतां, कांहीं सवलत न देतां, ती सर्वस्वीं अभक्ष्य अशी मानिली आहेत.

येथें अशी शंका येते कीं परिग्रहपरिमाणअणुव्रत्याला अगर इतर अणुव्रत पालकांना आलें, मुळा, कांदा इत्यादि पदार्थ वर्ज्य मानिलें नाहींत काय ? परिग्रह-परिमाणाणुव्रत्याला आले, कांदा इत्यादि पदार्थ वर्ज्य मानिले असतें तर भोगोपभोग-परिमाणव्रतांत हे पदार्थ वर्ज्य मानावेत असें कां सांगितलें असावें ? दोन प्रहरानंतरचें लोणी इतर श्रावकाचारांत वर्ज्य मानिलें आहे. या श्लोकांत मात्र कालमर्यादा घातलेली नाहीं. भोगांतहि त्याग, हें या व्रताचें वैशिष्टय आहे.

### व्रताचें स्वरूप-लक्षण-व्रत कशाला ह्मणावें ?

**यदनिष्टं तद्व्रतयेद्यच्चानुपसेव्यमेतदपि जह्यात् ।**
**अभिसन्धिकृता विरतिर्विषयाद्योग्यात् व्रतं भवति ॥८६॥**

**अन्वयार्थः**—( यत् अनिष्टं ) जें अनिष्ट आहे ( तत् ) तें (व्रतयेत्) -सोडणें (च) तसेंच ( यत् ) जें ( अनुपसेव्यं ) अनुपसेव्य आहे ( एतदपि ) तें देखील ( जह्यात् ) सोडणें कारण ( योग्यात् विषयात् ) योग्य विषयापासून ( अभिसन्धिकृता ) अभिप्रायपूर्वक केलेला ( विरतिः ) त्याग याला ( व्रतं ) व्रत ( भवति ) व्रत ह्मणतात.

**अर्थः**—अभिप्राय, संकल्प, प्रतिज्ञा वा हेतुपुरस्सर त्याग करणें याला व्रत ह्मणतात. त्याज्य व अभक्ष्य पदार्थांचा त्याग केला आहे, परंतु तो त्याग प्रतिज्ञापूर्वक अथवा हेतुपुरस्सर केलेला नसेल, तर त्या त्यागाला व्रत असें ह्मणतां येत नाहीं. क्रिया व सदाचरण हेतुपुरस्सर झाली पाहिजेत. अहेतुक घडलेल्या क्रियेला महत्त्व नाहीं. व्रत घेतलें कीं, त्याच्या अतिचाराबद्दल व अनाचाराबद्दल आस्था व दक्षता ठेवावी लागते. व्रत घेतले नसल्यास त्याज्य पदार्थ वाटले तर खातां येतील. या उलट प्रकृतीला मानवत नाहीं अगर त्याची अडचणच नाहीं ह्मणून वरील जिन्नस आजन्मही कोणी न खाईल. तथापि तें करणें संकल्पानें व हेतूपुरस्सर झालेलें नसतें, त्याबद्दल नियम घातलेला नसतो; यामुळें असें पदार्थ वर्ज्य केलें तरी त्यास व्रत ह्मणतां येणार नाहीं.

तसेंच भोगोपभोग परिमाणव्रत ज्यांनीं स्वीकारलें आहे, त्यांनीं अनिष्ट, अहितकारी सेवन करण्यास अयोग्य अशा पदार्थांचाही त्याग करणें जरूर आहे. प्रकृतीला अपायकारक रोग उत्पन्न करणारे पदार्थ व जें पदार्थ चांगलें लोक सेवन करीत नाहींत, उदाहरणार्थ गोमूत्रादि अशा पदार्थांचा या व्रत-धारींनीं त्याग करावा.

या श्लोकांत प्रतिज्ञा करून केलेल्या त्यागालाच व्रत असें कां म्हटलें आहे ? जिनपूजा, स्वाध्याय इत्यादि गोष्टी करावयाच्या असतात. त्या **करीन** अशी प्रतिज्ञा केली जाते. अशांत त्याग नसतो; मग **करीन** अशा प्रतिज्ञेला व्रत कां म्हणूं नये ? प्रतिज्ञापूर्वक **त्यागालाच** व्रत कां म्हणावें ? अव्याप्तीचा दोष तरी या श्लोकांत राहिलेला नाहीं ना ?

## व्रत म्हणजे काय ?

श्रावकाचारांत अणुव्रतें, गुणव्रतें व शिक्षाव्रतें मिळून जीं बाराव्रतें सांगितलीं आहेत, त्याशिवाय व्रत या नांवाखालीं अनेक बाबींचा समावेश करून त्यांना व्रत असें म्हटलें जात आहे. आदितवारव्रत, कोहाळेव्रत व वाल-व्रत हीं त्यापैकीं आहेत. सात वारांपैकीं एक वार, फळांपैकीं एक फळ, धान्या-पैकीं एक धान्य म्हणून हीं वरील उदाहरणें दिलीं आहेत. याबाबत चिकित्सा करणाऱ्यांची धर्मखंडांत गणना केली जाते. व्रतें घेतांना अदृष्ट, भविष्यकालीन व पारलौकिक सुखाकडेच पाहण्यांत यावें असें नाहीं. व्रतामुळें मनःशांति, निग्रह, संयम, इत्यादिकांचा प्रादुर्भाव होईल, स्वाभिमान व स्वधर्माभिमान वाढेल अशी व्रतें असावीत. धर्मवृद्धीसाठीं मी ५०० पुस्तकें छापवीन, मुनी-जनांच्या संरक्षणासाठीं मी माझ्या सर्व संपत्तीवर तुळसीपत्र ठेवीन, स्वातंत्र्या-साठीं जीव देईन, इत्यादि अनेक व्रतें कां घेऊं नयेत ? व्रतांचा हेतू काय ? मन, वचन व काय यांची शुद्धी, मन शांत व निर्मल ठेवणें. गणपतीला वाहिल्याखेरीज ऊस खाणार नाहीं, भौमि-भूमि-पौर्णिमा झाल्या खेरीज नवें पीक खाणार नाहीं. अशा व्रतांतही आत्मसंयमन आहे, परंतु आत्मसंयमन या

परिणामाकडे दृष्टी नसते, तर फक्त तुळशीची अगर भूमीची पूजा करणें हेंच ध्येय ठरते व त्यामुळें व्रताचा खरा अर्थ व हेतू बाजूस राहतो.

अशा या व्रतांचा उपक्रम कोणीही केला असो, त्याच्या हेतूचा विपर्यास होतो, ही अनुभवसिद्ध गोष्ट विसरून चालणार नाहीं; म्हणून चिकित्सा करून व्रताच्या हेतूकडे पाहणें जरूर आहे. व्रत कवायती असूं नये, एवढेंच.

सारांश जें आचरण सत्य विचाराला पटतें त्या आचरणाला दृढपणें चिकटून राहणें व तें पाळीत असतां येतील त्या अडचणींना तोंड देऊन त्या अडचणी सहन करणें, अडचण आली म्हणजे या आचरणाकडे पाठ न फिरविणें. व्रत म्हणजे आपल्या मनाला आपण होऊन स्वखुशीनें घातलेली बेडी आहे. यामुळें घेतलेल्या व्रतांत स्थिर राहण्याची शिकवण मिळत जाते.

### यम व नियम यांचें लक्षण.

**नियमो यमश्च विहितौ द्वेधा भोगोपभोगसंहारे ।**
**नियमः परिमितकालो यावज्जीवं यमो ध्रियते ॥८७॥**

**अन्वयार्थः**—( भोगोपभोगसंहारे ) भोगोपभोगाच्या त्यागामध्यें ( नियमः ) नियम (च) व (यमः) यम असें (द्वेधा) दोन प्रकार (विहितौ) सांगितलें आहेत. ( परिमितकालः ) ज्या त्यागामध्यें कालाची मर्यादा असते तो ( नियमः ) नियम होय, व जो त्याग ( यावज्जीवं ) मरेपर्यंत ( ध्रियते ) धारण केला जातो तो (यमः) यम होय.

**अर्थः**—भोगोपभोग परिमाणव्रताच्या त्यागाचे (१) यम व (२) नियम असें दोन भेद आहेत. कांहीं विशिष्ट कालमर्यादा घालून जेव्हां त्याग केलेला असतो, त्यास नियम म्हणतात. जेव्हां यावज्जीव त्यागाचें व्रत घेतलें जातें तेव्हां, त्यास यम असें म्हणतात. कालमर्यादा घालून व्रतपालन झेपते, असा आत्मविश्वास उत्पन्न झाला कीं, यावज्जीव त्यागाचें व्रत घेण्यास उत्साह येईल. यामुळें 'नियम' ही 'यमाची' पहिली पायरी आहे, पूर्वतयारी आहे.

## या व्रतांत नियम करण्याचा विधि.

**भोजनवाहनशयनस्नानपवित्रांगरागकुसुमेषु ।**
**ताम्बूलवसनभूषणमन्मथसंगतिगीतेषु ॥८८॥**
**अद्य दिवा रजनी वा पक्षोमासस्तथर्तुरयनं वा ।**
**इति कालपरिच्छित्त्या प्रत्याख्यानं भवेन्नियमः ॥८९॥**

**अन्वयार्थः**—( भोजनवाहनशयनस्नानपवित्रांगरागकुसुमेषु ) भोजन, वाहन, पलङ्ग, स्नान, उटणें, फुलें ( ताम्बूलवसनभूषणमन्मथसंगतिगीतेषु ) ताम्बूल ( पानविडा ) वस्त्र, दागिना, कामभोग, संगीत आणि गायन या विषयामध्यें ( अद्य ) आज ( दिवा ) दिवस ( रजनी ) रात्र ( पक्षः ) पंधरवडा ( मासः ) महिना ( तथा ) तसेंच ( ऋतुः ) दोन महिने ( वा ) अथवा ( अयन ) सहा महिने ( इति ) याप्रमाणें ( कालपरिछित्या ) कालाची मर्यादा करून (प्रत्याख्यानं) त्याग करणें (नियमः) हा नियम ( भवेत् ) होय.

**अर्थः**—भोगोपभोगपरिमाण व्रतामध्यें भोजन, शय्या स्नान, सुगंध, अंजन, उटणें, फुलादिक, पान-विडा, वस्त्र, दागिनें, कामोपभोग, संगीत ( नृत्यासह गाणें ), गायन; यांचें एक दिवस, एकरात्र, एक पंधरवडा, दोन महिने व सहा महिने इतक्या मुदतीचे त्याग करितां येतात.

वर ज्या कालमर्यादा दिल्या आहेत त्यांत फेरफार करितां येणरा नाहीं ? अशी शका येणें साहजिक आहे. दोन दिवस, दोन रात्र, एक आठवडा, तीन आठवडे अगर सहा महिन्यापेक्षां अधिक काळ, अशी काल-मर्यादा घालून हें व्रत घेतां येणार नाहीं ? अशी मर्यादा घालणें धर्मबाह्य होणार नाहीं. श्लो. नं. ८९ मध्यें कालमर्यादेची जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं केवळ नमुन्यादाखल आहेत, असेंच समजणें इष्ट होईल.

वरील गोष्टीबद्दल नियम घेतल्यानें होणाऱ्या फळाचा पं. आशाधर यांनीं केलेला खुलासा अत्यंत विचारार्ह आहे. समजा कीं ' अ ' नें वरील

पदार्थ वर्ज्य करण्याचा फक्त दोन महिने मुदतीचा नियम घेतला व तो नियम पाळीत असतां व ही मुदत भरण्यापूर्वीच 'अ' मरण पावला तर तो मुनी अवस्थेंतच मरण पावला असें होईल व त्याचें फळ त्यास मिळेल. दुसरें असें कीं संसारांत लागणाऱ्या व जगण्याला जरूर अशा सर्वच पदार्थांबद्दल नियम अगर यम घेण्यास सांगितलेलें नाहीं. २१ दिवस अन्न वर्ज्य करूनही जगणारे महात्मे जैन आहेतच. शय्या वाहनादिक अनेक गोष्टींचा कांहींकाळ **उपभोग** न घेतल्यास कोणतीहि आपत्ति येणार नाहीं मात्र पुण्यसंचय करण्यास यामुळें संधि मिळते.

## भोगोपभोगपरिमाणव्रताचे अतिचार·

**विषयविषतोऽनुपेक्षाऽनुस्मृतिरतिलौल्यमतितृषानुभवः**
**भोगोपभोगपरिमा व्यतिक्रमाः पंच कथ्यन्ते ॥९०॥**

**अन्वयार्थः**— ( विषयविषतः ) विषयरूप विषयासंबंधीं ( अनुपेक्षा ) उपेक्षा न करणें अर्थात् आदरबुद्धि ठेवणें, ( अनुस्मृति. ) पूर्वकाळीं भोगलेल्या विषयोपभोगांची वारंवार आठवण करणें, ( अतिलौल्यम् ) वर्तमानकालीन विषयांत अतिशय लालसा ठेवणें, ( अतितृषा ) भविष्यकालीन विषयासंबंधीं अतिशय इच्छा बाळगणें आणि ( 'अति' अनुभवः ) विषयांचें सेवन न करितांच मी विषयांचें सेवन करीत आहे असा अनुभव करणें हे ( पंच ) पांच ( भोगोपभोगपरिमा व्यतिक्रमाः ) भोगोपभोगपरिमाणव्रताचे अतिचार ( कथ्यन्ते ) सांगितले गेले आहेत.

**अर्थः**—(१) विषयविषयानुपेक्षा–संभोगानंतर आलिंगनादिकांनीं प्रेम न दाखविणें, कारण अशा कृत्यामुळें कामसेवनांत आसक्ति दिसते, ह्मणून या कृत्याला अतिचार या सदरांत काढिलें आहे. (२) अनुस्मृति–भूतकालांत भोगलेल्या विषयोपभोगांची पुनः पुनः आठवण करणें (३) अतिलौल्य–भोग घेतल्यानंतरही फिरून भोग घेण्याची इच्छा धरणें, (४) अतितृषा–भविष्यकालीन भोगाबद्दल तीव्र इच्छा धरणें व (५) अत्यनुभव-विषयांचें

सेवन करीत नसतांही त्यांचें सेवन करीत आहों, अशी समजूत करून घेणें—अत्यंत आसक्ति दाखविणें-असे हे या व्रताचे पांच अतिचार आहेत. वरील कृत्यामुळें व्रतभंग न झाला तरी मनाची प्रकृती ठीक राहात नाहीं; यामुळें निरतिचार व्रत पालन करणेंच योग्य आहे. औषध घेतलें पण पथ्य सांभाळलें नाहीं तर औषधाचा संपूर्ण परिणाम होत नाहीं. तद्वतच या व इतर अतिचारांचा परिणाम आहे; म्हणूनच निरतिचार व्रतपालनाची जरूरी आहे.

श्लोकसंख्या ८२ मध्यें भोगोपभोगपरिमाणव्रताचें लक्षण दिल्यानंतर श्लोकसंख्या ८३ मध्यें भोग व उपभोग या शब्दद्वयांची व्याख्या देण्यांत आली आहे. श्लोकसंख्या ८४ व ८५ मध्यें हें व्रत धारण करणाऱ्यांनीं कोणकोणत्या गोष्टी त्याज्य मानाव्यात याबद्दल विवेचन केलें आहे. श्लो. सं. ८७ मध्यें यम व नियम यांची व्याख्या करून श्लो. सं. ८८ व ८९ मध्यें या व्रताचा विधि सांगितला आहे. श्लो. सं. ८४।८५ मध्यें ज्या बाबी त्याज्य करण्याबद्दल सांगितलें आहे, त्या बाबी यावज्जन्म त्याज्य करावयाच्या आहेत; मात्र श्लो. सं. ८८ मध्यें त्याग करण्यास सांगितलेल्या बाबी श्लो. सं. ८९ मध्यें सांगितलेल्या कालमर्यादेपुरत्याच सांभाळावयाच्या आहेत. श्लो. सं. ८८ मधील भोजन वाहनशयनादि बाबींना कालमर्यादेची सवलत कां?

श्रावकांच्या आचारांत प्रगति करावयाची. आचाराचा विकास करावयाचा, गुणव्रत पालन करण्याची तयारी झाली कीं त्याला शिक्षाव्रताची दीक्षा द्यावयाची व शिक्षाव्रताच्या कसोटीला उतरला म्हणजे मुनिदीक्षा द्यावयाची. मुनिदीक्षा घेतल्यानंतर श्लोकसंख्या ८८ मध्यें—भोजनवाहनादि—ज्या बाबी मुदतीनें वर्ज्य कराव्यात म्हणून सांगितलें आहे, त्या बाबतींतील मुदत काढून त्या घ्यावयाची व आमरण बाबी पाळावयाच्या. प्रगतीचा व विकासाचा हा शास्त्रीय-Scientific-क्रम आहे.

श्लो. सं. १०६ मध्यें प्रोषधोपवासाचें लक्षण सांगितलें आहे. प्रोषधोपवास व्रतधाऱ्यांनीं उपवास कसा करावा, उपवासाचें दिवशीं काय काय

करावें व काय करूं नये याबद्दल सांगितलें आहे. उपवासाच्या व पर्वदिवशीं ज्या गोष्टी कराव्यात व करूं नयेत, असें सांगितलें आहे, त्या बाबी मुनि-दीक्षेनंतर केवळ पर्वदिनाच्या दिवशींच तेवढ्या न पाळतां नेहमींच पाळावयाच्या असतात.

# पांचवा परिच्छेद.

## शिक्षाव्रताचे भेद.

**देशावकाशिकं वा सामयिकं प्रोषधोपवासो वा ।**
**वैयावृत्यं शिक्षाव्रतानि चत्वारि शिष्टानि ॥ ९१ ॥**

**अन्वयार्थः**—( देशावकाशिकं ) देशावकाशिक ( वा ) तसेच ( सामयिकं ) सामायिक ( प्रोषधोपवासः) प्रोषधोपवास ( वा ) व ( वैयावृत्यं ) वैयावृत्य हीं ( चत्वारि ) चार ( शिक्षाव्रतानि ) शिक्षाव्रतें ( शिष्टानि ) सांगितलीं गेलीं आहेत.

**अर्थः**—( १ ) देशावकाशिक ( २ ) सामायिक ( ३ ) प्रोषधोपवास व ( ४ ) वैयावृत्य असे शिक्षाव्रताचे चार भेद आहेत. ज्या व्रतामुळें मुनिव्रत पाळण्याचें शिक्षण मिळतें, तें शिक्षाव्रत होय.

कांहीं आचार्यांनीं शिक्षाव्रताचे खालील चार भेद मानिले आहेत.—(१) सामायिक (२) प्रोषधोपवास (३) भोगोपभोगपरिमाण व (४) अतिथि-संविभाग.

आचार्य समंतभद्र भोगोपभोगपरिमाण व्रताचा गुणव्रतांत समावेश करितात तर इतर कांहीं आचार्य त्या व्रताचा शिक्षाव्रतांत समावेश करितात. आचार्य वचनांतील मतभेदाकडे पाहतां असें दिसतें कीं गुणव्रत व शिक्षाव्रत यांची व्याख्या व त्यांचे पोटभेद यांची व्याप्ति स्पष्ट ठरलेली नाहीं. असा हा मत-भेद कां ? याचा खुलासा शास्त्रज्ञांनीं करावा.

### देशावकाशिक-देशव्रत-शिक्षाव्रताचें लक्षण.

**देशावकाशिकं स्यात्कालपरिच्छेदनेन देशस्य ।**
**प्रत्यहमणुव्रतानां प्रतिसंहारो विशालस्य ॥ ९२ ॥**

**अन्वयार्थः**—( विशालस्य देशस्य ) ' दिग्व्रतांत प्रमाण केलेल्या ' मोठ्या देशाचा ( कालपरिच्छेदनेन ) कालाची मर्यादा करून ( प्रत्यहं ) दररोज ( प्रतिसंहारः ) त्याग करणें हें ( अणुव्रतानां ) अणुव्रतें धारण करणाऱ्यांचें ( देशावकाशिकं ) देशावकाशिक व्रत ( स्यात् ) होय.

**अर्थः**—दिग्व्रत घेतल्यावेळीं दाही दिशांबद्दल जी मर्यादा घालण्यांत आली असेल, ती मर्यादा यावज्जीवाची असते; त्या क्षेत्रमर्यादेचा कांहीं काळ संकोच करणें याला देशव्रत अगर देशावकाशिकव्रत असें म्हणतात. उदाहरणार्थ दिग्व्रत घेतांना एखाद्यानें पूर्व अगर पश्चिम दिशेस १०० कोसापलीकडे आमरण स्वतः जावयाचें नाहीं, कोणास पाठवावयाचें नाहीं; अगर त्या मर्यादेच्या बाहेर असलेल्यांना आपल्याकडे बोलावूनही घ्यावयाचें नाहीं, असें व्रत घेतलें आहे; परंतु या क्षेत्र-मर्यादेचा संकोच तर करावयाचा आहे, अशावेळीं त्यानें आज मी ५० कोसाची मर्यादा घालून घेतो अगर शहरांतील अमूक पेठेच्या अगर गल्लीच्या बाहेर जाणार नाहीं; अशा तऱ्हेचा कालमर्यादेचा व क्षेत्रमर्यादेचा निर्बंध घालून घेणें, याला देशावकाशिक-शिक्षाव्रत म्हणतात. मुनिपदाच्या पूर्वतयारीची शिक्षाव्रत ही एक प्राथमिक शाळा आहे. अशा क्षेत्र व काल मर्यादेच्या निर्बंधामुळें संयमाचें शिक्षण मिळत जाऊन पापकृत्याला आळा बसत जातो.

### देशावकाशिक व्रतामध्यें क्षेत्रमर्यादा.

**गृहहारिग्रामाणां क्षेत्रनदीदावयोजनानां च ।**
**देशावकाशिकस्य स्मरन्ति सीमां तपोवृद्धाः ॥९३॥**

**अन्वयार्थः**—( तपोवृद्धाः ) तपानें वृद्ध असलेले अर्थात गणधरादि देव ( गृहहारिग्रामाणां ) घर, गल्ली, गांव (च) आणि ( क्षेत्रनदीदावयोजनानां )

क्षेत्र, नदी, वन व योजन या ( देशावकाशिकस्य ) देशावकाशिक व्रताच्या ( सीमां ) मर्यादा आहेत असें ( स्मरन्ति ) स्मरण करतात अर्थात सांगतात.

**अर्थ:**—दिग्व्रतांत घेतलेल्या क्षेत्रमर्यादेच्या आंत अमुक घरापर्यंत, नदीपर्यंत, शहरापर्यंत इत्यादि क्षेत्रांची हद्दीची मर्यादा या व्रतांत करावी लागते.

### देशावकाशिक व्रतामध्यें कालमर्यादा.

**संवत्सरमृतुरयनं मासचतुर्मासपक्षमृक्षं च ।**
**देशावकाशिकस्य प्राहुः कालावधिं प्राज्ञाः ॥ ९४ ॥**

**अन्वयार्थ:**—( प्राज्ञाः ) गणधरादिक देव ( संवत्सरं ) एक वर्ष, ( ऋतुः ) दोन महिने, ( अयनं ) सहा महिने, ( मासचातुर्मासपक्षं ) महिना, चार महिने, पंधरवडा ( च ) आणि ( ऋक्षं ) नक्षत्र, हे ( देशावकाशिकस्य ) देशावकाशिक व्रताच्या (कालावधिं) कालाच्या मर्यादा आहेत असें ( प्राहुः ) सांगितलें आहे.

**अर्थ:**—देशावकाशिक व्रतांत एक वर्ष, दोन महिने, चार महिने, सहा महिने, एक महिना व पंधरा दिवस इत्यादिक कालांचें प्रमाण करावें लागतें.

श्लोक नं. ९३ मध्यें क्षेत्राच्या-हद्दीच्या मर्यादेचा संकोच सांगितला आहे व या श्लोकांत कालमर्यादेचा संकोच सांगितला आहे व क्षेत्रमर्यादेचा संकोच किती काल असावा, हें सांगितलें. श्लो. नं. ९३।९४ मध्यें सांगितल्याप्रमाणें क्षेत्र व कालमर्यादेचा संकोच करीत गेल्यास तितक्या प्रमाणांत पापकृत्यांना आळा बसत जातो.

### देशावकाशिकव्रताचें फल.

**सीमान्तानां परतः स्थूलेतरपञ्चपापसन्त्यागात् ।**
**देशावकाशिकेन च महाव्रतानि प्रसाध्यन्ते ॥ ९५ ॥**

**अन्वयार्थ:**—( सीमान्तानां परतः ) मर्यादेच्या पलिकडे ( स्थूलेतर-पंचपापसंत्यागात् ) स्थूल व सूक्ष्म पंच पापांचा उत्तमरीतीनें त्याग होत

असल्यामुळें ( देशावकाशिकेन च ) देशावकाशिक व्रतामध्येंसुद्धां ( महा-व्रतानि ) महाव्रतें ( प्रसाध्यन्ते ) साधलीं जातात.

**अर्थः**—जितक्या क्षेत्राची मर्यादा करितो त्या क्षेत्रमर्यादेच्या बाहेर व जितक्या कालाची मर्यादा घेतो त्या कालांत, अशा देशावकाशिक व्रतधारी श्रावकाकडून स्थूल व सूक्ष्म हिंसा होत नाहीं; ह्मणून तो त्या हद्दीच्या पलीकडे व त्या विविक्षित कालांत महाव्रती होतो—ह्मणजे त्या मर्यादेपलीकडचे व त्या कालांत महाव्रताचें पुण्य अंशतः तरी तो जोडितो. दिग्व्रतांत दिग्व्रती त्या मर्यादेच्या बाहेर महाव्रत्या सारखा दिसतो असें ह्मटलें आहे व या व्रतामुळें तो महाव्रती होतो असें ह्मटलें आहे. दिसणें व असणें यांत महत्वाचा फरक आहे. दिग्व्रतानंतर देशावकाशिक व्रत घेतल्यानें हा महत्वाचा फरक नष्टच कसा होतो, हें समजणें कठाण आहे. कारण देशावकाशिक व्रत घेतलें तरी मनाचे कषाय त्या क्षेत्रांत व त्या काळांत नष्टच होतील, असें नाहीं.

### देशावकाशिक व्रताचे अतिचार.

**प्रेषणशब्दानयनं रूपाभिव्यक्तिपुद्गलक्षेपौ ।**
**देशावकाशिकस्य व्यपदिश्यन्तेऽत्ययाःपंच ॥ ९६ ॥**

**अन्वयार्थः**—( प्रेषणशब्दानयनं ) मर्यादेच्या बाहेर पाठविणें, शब्द करणें, आणविणें ( रुपाभिव्यक्तिपुद्गलक्षेपौ ) आपलें रूप प्रगट करणें व खडा-वगैरे पुद्गल फेंकणें हे ( पंच ) पांच ( देशावकाशिकस्य ) देशावकाशिक व्रताचें ( अत्ययाः ) अतिचार ( व्यपदिश्यन्ते ) सांगितले गेले आहेत.

**अर्थः**—देशावकाशिक व्रताचे पांच अतिचार आहेत. ते (१) प्रेषण-असें, असें किंवा अमूक करा असें सांगून त्या मर्यादेच्या आंत असलेल्यांना मर्यादेबाहेर पाठविणें (२) शब्दः-क्षेत्रमर्यादेच्या बाहेर असणाऱ्यांना शब्दानें अगर खुणवून मर्यादेच्या आंत बोलावून घेणें (३) आनयन-हें आण, तें आण, अमूक आण, असें सांगून क्षेत्र मर्यादेबाहेरील वस्तु मर्यादेच्या आंत

मागाविणें (४) रूपाभिव्यक्ति-मर्यादेच्या बाहेर असणाऱ्यांना, काम करणाऱ्यांना आपलें शरिरादि अवयव दाखविणें व (५) पुद्गलक्षेप-मर्यादेच्या बाहेर काम करणाऱ्यांना इशारा देण्यासाठीं, दगड आदि पुद्गल पदार्थ टाकून व फेंकून कांहीं इशारा देणें. वरील अतिचार घडत असतां व्रती हा मर्यादेच्या आंत असतो, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. क्षेत्रमर्यादेच्या बाहेर जाऊन वरील कृत्यें घडल्यास अतिचार या सदराखालीं न येतां तीं अनाचार-व्रतभंग-या सदराखालीं येतील.

## सामायिक शिक्षाव्रताचें लक्षण.

**आसमयमुक्तिमुक्तं पंचाघानामशेषभावेन।**
**सर्वत्र च सामयिकाः सामयिकं नाम शंसन्ति ॥ ९७ ॥**

**अन्वयार्थः**—( आसमयमुक्ति ) कांहीं नियत कालापर्यंत ( सर्वत्र ) सर्व ठिकाणीं ( पंचाघानां ) पांच पापांचा ( अशेषभावेन ) सपूर्णपणें (मुक्तं) त्याग करणें यास ( सामयिकाः ) शास्त्र जाणणारे अर्थात् गणधरादिक देव ( सामायिक नामं ) सामायिक नांवानें ( शंसन्ति ) संबोधितात.

**अर्थः**—मन, वचन, काया, कृत, कारित व अनुमोदन या सर्व प्रकारांनीं पांच पापांचा कांहीं निश्चित कालपर्यंत संपूर्णपणें व सर्वत्र त्याग करणें यास सामायिक शिक्षाव्रत असें ह्मणतात. दिग्व्रत व देशावकाशिक-देशव्रत या व्रतांनीं घातलेल्या क्षेत्र व काल-मर्यादेच्या आंत व त्या मर्यादेच्या पलीकडेहि ह्मणजे सर्वत्र कोठेंही आपल्या कडून पांच पातकें घडूं न देणें याला सामायिक शिक्षाव्रत ह्मणतात. सामायिक ह्मणजे शपथाचार-प्रतिज्ञापूर्वक आचार. देशावकाशिक-देशव्रतामध्यें जी कालमर्यादा ( पहा श्लो. ९४ ) घातलेली असते, त्या कालमर्यादेंत पांचही पापांचा सर्वत्र त्याग झालेला नसतो. परंतु सामायिक शिक्षाव्रताच्या पालनामुळें पांचही पापांचा संपूर्णपणें सर्व ठिकाणीं व विशिष्ट वेळे पुरतां त्याग झालेला असतो.

## सामायिकाचे भेद.

सामायिकाचे वेळीं उत्तर अगर पूर्वाभिमुख तोंड करून उभें राहून पंचपरमेष्ठींना नमस्कार करावा. या नमस्कारानंतर खालीं बसून नमोकार मंत्राचा जप करावा, व नंतर ध्यानमग्न व्हावें.

(१) प्रतिक्रमण:—केलेल्या पातकांचें स्मरण करून त्याबद्दल पश्चाताप करणें. तशीं पातकें फिरून न होतील अशी खबरदारी घेणें.

(२) प्रत्याख्यान:—यापुढें विशिष्ट स्वरूपाचीं पातकें करणार नाहीं, असा मनाचा निश्चय करणें.

(३) सामायिक कर्म:–वैयक्तिक मोहाचा त्याग करून शत्रू व मित्राबद्दल समभावाचा प्रादुर्भाव होईल असा प्रयत्न करणें.

(४) स्तुति:–चतुर्विंशति तीर्थंकरांच्या अंगचें गुणगान करणें.

(५) वंदना:–चोवीस तीर्थंकरांपैकीं एखाद्या तीर्थंकराबद्दल विशेष भक्ति.

(६) कायोत्सर्ग:-देहावरील ममत्व वा आसक्तिचा त्याग करून आत्मध्यानांत तल्लीन होणें. असे सामायिकाचे हे सहा भेद आहेत.

## सामायिकाचे वेळचीं आसनें.

(१) पद्मासन (२) स्वर्गासन व (३) अर्ध पद्मासन. अशक्तता असतां निजूनही सामायिक करण्यास हरकत नाहीं.

## सामायिकाची कालमर्यादा किती असावी ? इत्यादि.

**मूर्धरुहमुष्टिवासोबन्धं पर्येकबन्धनं चापि ।**
**स्थानमुपवेशनं वा समयं जानन्ति समयज्ञाः ॥ ९८ ॥**

**अन्वयार्थ:**—( समयज्ञाः ) शास्त्राला जाणणारे ( मूर्धरुहमुष्टिवासोबन्धं ) शेंडी बांधणें, मूठ बांधणें, वस्त्राला गांठ देणें व तसेंच ( पर्येकबन्धनं ) पद्मासन घालणें ( अपि ) व ( स्थानं ) स्थान आणि ( उपवेशनं ) आसन ह्यांना ( समयं ) कालमर्यादा ( जानन्ति ) जाणतात.

**अर्थ:**—ज्या श्लोकाचे निरनिराळे अर्थ केले गेले आहेत. त्यांत खरा कोणता व चुकीचा कोणता, याचा विचार करण्यांत कालक्षेप करणें व्यर्थ आहे. कोणताही अर्थ समजून घेतांना त्यांतील हेतूकडे लक्ष दिल्यानें निरनिराळ्या अर्थांचें महत्व समजून येईल. तें महत्व समजल्यावर तदनुसार आचार ठेवल्यास अनेक हेतु एकाचवेळीं साध्य करून घेण्यास मदत होते. श्लो. नं. ९८ अशा श्लोकापैकीं एक आहे व त्याचे दोन अर्थ पुढें दिले आहेत.

(१) शेंडीला गांठ मारून ती सोडीपर्यंत लागणारा काळ, मूठ झांकून ती उघडीपर्यंत लागणारा काळ, वस्त्राला गांठ मारून ती सोडीपर्यंत लागणारा काळ, मांडी घालून ती काढीपर्यंतचा काळ, अशा या दोन्ही क्रियेमधील थोड्या अवधीच्या काळांतही आपल्या मनाच्या परिणामाची स्थिरता करण्यानें सामायिक व्रत सिद्धीस जाईल. वर सांगितलेल्या कालमर्यादेपेक्षां अधिक कालाची मनाच्या एकाग्रतेला जरूरी नाहीं असें नाहीं; तथापि ही किमान कालमर्यादा दिली आहे. अर्थातच पांच पातकापासून जितका अधिक काल दूर राहतां येईल तितका काल दूर राहणें साहजिकच अधिक इष्ट आहे.

### दुसरा अर्थ.

(२) सामायिकाला सुरवात करण्यापूर्वी शेंडीला गांठ मारून व डाव्या हाताच्या पृष्ठभागावर उजव्या हाताचा तळहात ठेवावा. अंगावर धोतर शाल व यासारखें वस्त्र असल्यास त्याच्या पदरांना गांठ मारावी. इतकी पूर्वतयारी झाल्यावर कायोत्सर्ग-उभे राहून-अगर पद्मासन-मांडी घालून-मनाची एकाग्रता करावी व कायोत्सर्गामुळें व पद्मासनामुळें शरीराच्या अवयवावर ताण बसूं लागला आहे, असें वाटे पर्यंत, ती एकाग्रता सुरूं ठेवावी. शरीराला त्रास होतो असें वाटल्यानंतर सामायिक करण्याचें सोडून द्यावें. या क्रियेमधील कालमर्यादा ही सामायिक कालमर्यादा समजावी. हा श्लोक काल मर्यादा घालण्यासाठीं आहे असें ठरल्यास पहिला अर्थ बरोबर दिसतो. शेंडीला अगर धोत-

राच्या पदराला गांठ मारणें, मूठ उघडणें वगैरे क्रिया महत्त्वाच्या नाहींत. या क्रियेला धार्मिक स्वरूप नाहीं. त्यांची गांठ सुटेपर्यंत अगर मूठ उघडीपर्यंत ध्यानमग्न राहण्यांत महत्त्व आहे. रहदारीच्या रस्त्यावरील पोलीसानें हात वर केला कीं वाहतुक थांबतें व वर केलेला हात खालीं केव्हां येईल, याकडे आतुरतेनें चित्त एकाग्र राहतें. तद्वतच या गाठींचें महत्त्व आहे.

## सामायिकाचा क्रियाविधि.

जोंपर्यंत शेंडीची गांठ सोडलेली नाहीं अगर घातलेलें आसन काढून घेतलेलें नाहीं तोंपर्यंत मी पांचही पापांचा त्याग केलेला आहे, अशी भावना करून मन एकाग्र करणें. ही एकाग्रता शेंडीला गांठ मारल्या नंतर होवो अगर तशी गांठ मारतानाही होवो. गांठ मारणें अगर न मारणें याला महत्त्व नाहीं, तर चित्ताच्या एकाग्रतेला महत्त्व आहे. केसाला अगर वस्त्राला गांठ कां मारावी ? गांठ न मारल्यानें केस व वस्त्र यांची हालचाल होऊन व ती सांभाळण्याकडे लक्ष लागल्यास एकाग्रतेत व्यत्यय येईल, अशी भीति वाटत असल्यानें ती आपत्ती टाळण्यासाठीं शेंडीला व वस्त्राला गांठ मारावी असें सांगितलें आहे; असें कित्येकांचें ह्मणणें आहे. सहा घटिका ती उत्तम, चार घटिका ही मध्यम व दोन घटिका ही कनिष्ट अशा सामायिक करण्याच्या कालमर्यादा आहेत. २४ मिनिटांची एक घटिका होते.

## सामायिकाला योग्य स्थान.

**एकान्ते सामयिकं निर्व्याक्षेपे वनेषु वास्तुषु च ।**
**चैत्यालयेषु वापि च परिचेतव्यं प्रसन्नधिया ॥ ९९ ॥**

**अन्वयार्थः**—( निर्व्याक्षेपे ) उपद्रवरहित ( एकान्ते ) एकांतात ( च ) तसेंच ( वनेषु ) वनांत ( वा ) किंवा ( वास्तुषु ) घरांत ( च ) आणि ( चैत्यालयेषु ) चैत्यालयांत ( अपि ) व पर्वत, गुहा इत्यादिकांत देखील ( प्रसन्नधिया ) प्रसन्न बुद्धीनें अर्थात मनाची एकाग्रता करून ( सामयिकं ) सामायिक ( परिचेतव्यं ) वाढविलें जावें.

**अर्थः**—कोणताही उपद्रव होणार नाहीं, अशा ठिकाणीं, जेथें वाऱ्यामुळें व पशुपक्षी यांजकडून त्रास होणार नाहीं, अशा एकांतांत, अरण्यांत, घरांत, धर्मशाळेत, जिनमंदिरांत, पर्वतावर अगर गुहेंत एकाग्रचित्त होऊन सामायिक करावें व सामायिकाचा काळ हळूं हळूं वाढवीत जावे. वर जीं स्थळें दिलीं आहेत तेथें प्रसन्न चित्तानें व एकाग्रतेनें सामायिक करावे. सामायिकास वरील जागा अधिक अनुकूल असल्यानें त्यांचा फक्त नामनिर्देश केला आहे.

**सारांशः**—जेथें मनुष्यमात्राची व पशुपक्ष्यांची वर्दळ नाहीं, अशी जागा सामायिकाला योग्य व पवित्र आहे. जेथें संगीत, गीत व वादविवाद चालला आहे, अशी जागा; तसेंच ऊन, वारा व थंडी यांची बाधा होत आहे अशी जागा व किडा, मुंगी, डांस, साप, विंचू इत्यादिकापासून बाधा होईल अशी जागा, सामायिक करण्यास वर्ज्य होत. वर जो खुलासा केला आहे, त्यावरून मनाची एकाग्रता होण्यास जी जागा अनुकूल व मदत करणारी आहे, ती जागा सामायिकासाठीं योग्य आहे, असें समजणेचें आहे; मात्र वर निर्दिष्ट ठिकाणाखेरीज अन्य ठिकाणीं केलेलें सामायिक, सामायिकच नव्हे, असें मात्र समजण्याचें कारण नाहीं.

## सामायिकाला अनुकूल अशा दुसऱ्या बाबी.

**व्यापारवैमनस्याद्विनिवृत्त्यामन्तरात्मविनिवृत्त्या ।**
**सामयिकं बध्नीयादुपवासे चैकभुक्ते वा ॥ १०० ॥**

**अन्वयार्थः**—( व्यापारवैमनस्यात् ) कषायादिक चेष्टा व मनाची एकाग्रता यांच्यापासून ( विनिवृत्यां ) निवृत्त झाल्यावर ( अन्तरात्मविनिवृत्या ) मनाच्या विकल्पाला दूर सारून ( उपवासे ) उपवासाचे दिवशीं ( वा ) अथवा ( एकभुक्ते वा ) एकाशनाचे दिवशीं ( सामयिकं ) सामायिक ( बध्नीयात् ) करावें.

**अर्थः**—उपवासाच्या अगर एकाशनाच्या दिवशीं मन प्रसन्न व उल्हासित ठेवून व अंतरंगांतील संकल्पविकल्पांना थारा न देतां सामायिक

करावें. मन, वचन व काय यांनीं होणारी अशुभ प्रवृत्ति सोडून व आरंभ व परिग्रह यांना वर्ज्य करून सामायिक करावें.

श्लो. नं. ९९ मध्यें सामायिकासाठीं योग्य जागा कोणती याबद्दल विवेचन प्रामुख्यानें केलें आहे. या श्लोकांत सामायिक करणाऱ्याचें अंतरंग-मनःस्थिती कशी असावी, याबद्दल विवेचन केलें आहे. अंतरंग व बहिरंग अनुकूल असतां सामायिक करण्यांत यावें. 'एकान्त ह्मणजे विश्रांति. त्यावेळेस आपण आपल्या खोल स्वरूपाशीं जणूं मिळून जावयाचें......आकाशांत शेंकडो ढग येतात, हजारो वारे सुटतात, धुळीचे लोट उठतात, पांखरें उड-तात, परंतु या सर्वांचे मागें आकाश निळें निळें असतें. त्या आकाशाला या गोष्टींचा स्पर्श नाहीं. आपलें हृदयाकाश असेंच करावयाचें. यासाठीं एकान्ताचा आश्रय करावयाचा.' 'आपलें मन जणूं उकिरडा. साऱ्या जगाची घाण तेथें येऊन पडलेली असते. परंतु मनाला आत्म्याची ओळख नसते... आनंदाचा झरा आंत आहे, याची जाणीव त्याला नसते.'

'संसार वा परमार्थ, त्या त्या वेळच्या महत्वाच्या गोष्टी उलगडतांना जर मनाची, बुद्धीची एकाग्रता करतां आली नाहीं तर प्रश्न सुटत नाहीं.' एकांतांत आपणांस सामर्थ्य मिळतें, आशा मिळते. एकान्त ह्मणजे एक-प्रकारचें मरण...बुद्धीवरचीं व हृदयावरचीं सर्व कश्मलें झाडून टाकून आपण बाहेर येतो, देवाजवळ क्षणभर बसून आलेला, मग तो दानवांना भारी होतो. अपार चैतन्य त्याच्याजवळ असतें. दुर्दम्य आशावाद तो घेऊन येतो. एकान्त ह्मणजे संजीवन. सिंधु मिळण्याची जागा. 'एकान्त ह्मणजे माणूस-घाणेपणा नव्हे. जगाला तुच्छ लेखणें नव्हे. एकान्त ह्मणजे स्वतःचें बरबरलेलें जीवन धुवून टाकण्याची जागा......अत्यंत मलीन झालेलें जीवन एकांतांत जाऊन धुवावयाचें.'

यावरून एकान्त व एकाग्रता याची पुरेपूर कल्पना येईल. 'अधिकस्य अधिकं फलम्' या न्यायानें विचार करितां एकान्त व एकाग्रता यांना

धर्मग्रंथ स्वाध्यायाची ओड देणें. एकान्त, एकाग्रता व स्वाध्याय यांचा थोडा-काल झालेला प्रीतिसंगम सर्व कश्मलें-पातकें-झाडून टाकून सदाचार प्रवृत्त होण्यास व नवचैतन्य देण्यास समर्थ आहे. हें थोर हेतू व दूरगामी परिणाम विचारांत घेऊनच आचार्यांनीं एकान्त, एकाग्रता व धर्माध्ययन याची महति वर्णिलं आहे.

## सामायिक दर दिवशीं करावें.

**सामयिकं प्रतिदिवसं यथावदप्यनलसेन चेतव्यं ।**
**व्रतपंचकपरिपूरणकारणमवधानयुक्तेन ॥१०१॥**

**अन्वयार्थः**—( सामयिकं ) सामायिक ( व्रतपंचकपरिपूरणकारणम् ) पांच व्रतांना परिपूर्ण करण्यास कारण आहे, ('अतएव') म्हणून ( प्रतिदिनं ) दररोज ( अनलसेन ) आळस सोडून ( अपि ) आणि ( अवधानयुक्तेन ) एकाग्र चित्तानें ( यथावत् ) जसें सांगितलें गेलें आहे, त्या विधीनें-विधिपूर्वक ( चेतव्यं ) वाढवावें.

**अर्थः**—पांच व्रतांना परिपूर्ण करण्यास सामायिकव्रत हें कारण आहे. म्हणून दर दिवशीं एकाग्र चित्तानें, आनंदानें व विधिपूर्वक सामायिक करावें. सामायिक करीत असल्यावेळीं अहिंसादि पांच पापांचा पूर्णपणें त्याग झालेला असतो; त्यामुळें तेवढ्या वेळेपुरती तरी श्रावकांची अणुव्रतेंही महाव्रतपदास पोंचतात. दिवसांतून तीन वेळां मिळून ६ घटिका सामायिकांत घालविणें हें उत्तम प्रतीचें सामायिक आहे. याप्रमाणें दिवस रात्रीच्या ६० घटकांपैकीं ६ घटकाचा वेळ सामायिकात गेल्यास तितक्या काळांत तरी श्रावक पाप-बंधनापासून मुक्त राहील. असें झाल्यास महिन्यांतून ६ दिवस अगर सुमारें एक आठवडा गृहस्थी लोकांनाही मुनीसारखें वागण्याचें श्रेय मिळणार आहे. पुढील कष्टतर पण चिरसुखदायी मुनिव्रताच्या आचरणाची ही पूर्वतयारी आहे. अणुव्रतांचा विकास होऊन तीं परिपूर्ण होण्यासाठीं काय करावें व तीं पूर्ण होत असतां व पूर्ण झाल्यावर काय केल्यानें संसारांत राहूनही महाव्रत

पालनाचें अंशतः तरी श्रेय मिळावें, या हेतूनें श्रावकांना एकएक पायरीनें पुढें नेण्याचा हा स्तुत्य व व्यवहार्य प्रयत्न आहे. सर्वसंग परित्याग करून मुनिदीक्षा घेण्यापूर्वीही अशाप्रकारच्या पूर्वतयारीची जरूरी आहे. या ग्रंथांचें मनन करीत असतां ठिकाठिकाणीं हा प्रयत्न दृष्टीस पडल्यावांचून रहात नाहीं. श्लो. नं. १०० मध्यें पर्वदिवशीं सामायिक करण्याचा व श्लो. नं. १०१ मध्यें दर दिवशीं तीन वेळां सामायिक करण्याचा उपदेश केला आहे. यावरून पर्वदिवशींची सामायिकची किमान व दर दिवशीं तीन वेळां मिळून ६ घटिका सामायिक करण्याची ही कमाल मर्यादा घालण्यांत आली आहे.

## सामायिकाच्या वेळेचा श्रावक कसा दिसतो ?

**सामयिके सारम्भाः परिग्रहा नैव सन्ति सर्वेपि ।**
**चेलोपसृष्टमुनिरिव गृही तदा याति यतिभावम् ॥१०२॥**

**अन्वयार्थः**—( सामयिके ) सामायिकामध्यें ( सारम्भाः ) शेती वगैरे आरंभसहित ( सर्वेपि ) सर्व बाह्य अभ्यंतर प्रकारचे ( परिग्रहाः ) परिग्रह ( न एव सन्ति ) नसतातच ( 'अतएव' ) म्हणून (तदा) त्यावेळीं ( गृही ) गृहस्थी ( चेलोपसृष्टमुनिः इव ) कपड्याचा उपसर्ग ज्या मुनीवर झाला आहे अशा मुनीप्रमाणें ( यतिभावं ) मुनिपणाला ( याति ) प्राप्त होतो.

**अर्थः**—वीतरागी मुनींच्या अंगावर बोटभरही कपडा नसतो; परंतु त्यांना उपसर्ग देण्याच्या हेतूनें त्यांच्या शरीरावर कोणी कपडा घातला तर त्या उपसर्गाचें वेळीं मुनी जसे दिसतात, तद्वतच गृहस्थी-श्रावक-सामायिकाचें वेळीं असतो. श्रावकानें त्यावेळीं जर अंगावरील वस्त्राचा त्याग केला तर तो त्याच क्षणीं वीतराग मुनीसारखा मुनि दिसूं लागेल. उपसर्ग करण्यासाठीं मुनीच्या अंगावर घातलेल्या कपड्याबद्दल मुनींना महत्व नसतें, त्या कपड्यामध्यें आसक्ति नसते; उलट त्यांच्या इच्छेविरुद्ध हा प्रकार झालेला असतो. आपल्या अंगावर असलेल्या कपड्याबद्दल सामायिकाचें वेळीं श्रावकाच्या मनांतही ममत्व व आसक्ति नसते. उपसर्ग करण्यासाठीं मुनीवर जब-

रीनें व त्यांच्या इच्छेविरुद्ध कपडा घातलेला असतो व श्रावक केवळ व्यवहार सांभाळण्यासाठीं सामायिकाचें वेळीं कपडा घालतो. फरक हा कीं श्रावक स्वेच्छेनें अंगावर कपडा घालतो व मुनीवर कपड्याची जबरी झालेली असते. कपड्याचा हा बाह्य देखावा वगळल्यास मुनी व श्रावक हे दोघेही अंतर्यामी सामायिकाचें वेळीं सारखेंच असतात. यामुळेंच सामायिकाचें महत्व विशेष आहे.

**सामायिकाचें वेळीं परिषह अगर उपसर्ग सहन करावा.**

**शीतोष्णदंशमशकपरीषहमुपसर्गमपि च मौनधराः ।**
**सामयिकं प्रतिपन्ना अधिकुर्वीरन्नचलयोगाः ॥१०३॥**

**अन्वयार्थः**—( मौनधराः ) मौन धारण करणार व ( अचलयोगाः ) अचल योगाला धारण करणारे असून ( सामयिकं ) सामायिकाला (प्रतिपन्नाः) प्राप्त झालेल्या पुरुषांनीं ( शीतोष्णदंशमशकपरीषहं ) शीत, उष्ण व दंशमशक परिषह ( च ) आणि ( उपसर्गं अपि ) उपसर्ग देखील ( अधिकुर्वीरन् ) सहन करावेत.

**अर्थ:**—सामायिक करण्याच्या वेळांत सामायिक करीत असलेल्या काळांत थंडी, ऊन, वारा इत्यादिकांचा त्रास, ढेंकूण, पिसवादिकांचा दंश, रोगपीडा झाली असल्यास ती पीडा व दुष्ट लोकांनीं केलेली निंदा व शिविगाळ वगैरे परिषह शांत चित्तानें सहन करावेत. तसेंच सिंह, व्याघ्र व सर्पादिक घातूक व दुष्ट प्राण्यांकडून व अग्नि आणि जल इत्यादिकांमुळें व देव, मनुष्य व तिर्यंच यांजकडून झालेला उपसर्ग, मन, वचन व कायेनें, धैर्यानें, शांतचित्तानें व समभावनेनें सहन करावेत. मौन सोडू नये, भीतिमुळें मनाची चलबिचलता होऊं देऊं नये व परिषह आणि उपसर्ग करणाऱ्याबद्दल आपल्या मनांत दुष्ट बुद्धि धरूं नये. क्षुधा, तृषादि २२ प्रकारचे परिषह आहेत. उपसर्ग-उपद्रव ह्मणजे द्वेषादिकांनीं प्रेरीत होवून दिलेला त्रास.

योग ह्मणजे हालचालीची व व्यवहाराची क्रिया ज्याच्या साहाय्यानें घडते, ते साधन. योगाचे (१) मनोयोग (२) वचनयोग व काययोग असे

तीन प्रकार आहेत. सामायिकाचे वेळीं मन, वचन व काया यांचे व्यापारावर कोणत्याहि सुखदुःखाच्या प्रसंगाची पर्वा न करितां ताबा ठेवावयाचा असतो. येथें अशी शंका येईल कीं, श्लो. सं. ९९ मध्यें पसंत केलेल्या जागेंत वरील उपसर्गापैकीं कांहीं उपसर्गाची शक्यता ती कशी ? किडा, मुंगी, साप व विंचू इत्यादि नाहींत, असें पाहून पसंत केलेल्या जागेंत ते नजरचुकीनें राहणारच नाहींत असें नाहीं अगर सामायिकास सुरवात झाल्यावरहि त्या जागेंत येणार नाहींत असेंहि नाहीं. उपद्रव होणार नाहीं अशी खबरदारी प्रथम घ्यावयाची व याहि उप्पर, उपद्रव झालाच तरी तो सहन करावयाचा.

### सामायिक करित असतांना काय काय चिंतावें ?

**अशरणमशुभमनित्यं दुःखमनात्मानमावसामि भवम् ।**
**मोक्षस्तद्विपरीतात्मेति ध्यायन्तु सामयिके ॥ १०४ ॥**

**अन्वयार्थः**—( ' अहं ' ) मी ( अशरणं ) अशरण, ( अशुभं ) अशुभ, ( अनित्य ) अनित्य, ( दुःखम् ) दुःखमय व ( अनात्मानं ) पररूप अशा ( भवं ) संसारांत ( आवसामि ) राहतो आणि ( मोक्षः ) मोक्ष ( तद्विपरीतात् ) याच्या उलट आहे; ( इति ) याप्रमाणें ( सामयिके ) सामायिकाचे वेळीं ( ध्यायन्तु ) विचार करावा.

**अर्थः**—संसार हा अशरण, अशुभरुप, अनित्य व दुःखमय आहे. मोक्ष मात्र शरण, क्षम, नित्य व शुभरूप आहे. यामुळें खरें व शाश्वत सुख संसारांत नाहीं. खऱ्या व शाश्वत सुखाची प्राप्ति, मोक्ष प्राप्तिमुळेंच होणारी आहे. इत्यादिकांचा विचार सामायिकाचे वेळीं करावा. संसार हा दुःखदायक, पापबंधक व पररूप आहे. याच्या उलट मोक्ष आहे. म्हणजे मोक्ष शरण आहे, शुभ आहे, नित्य आहे, सुखमय आहे व आत्मस्वरूप आहे. यासाठीं मोक्षप्राप्ती हेंच माझें **ध्येय** आहे; असा शुभ विचार मनांत आणावा.

संसार अशरण कां ? तर संसारांत असतां पापापासून संरक्षण करण्यास कोणी समर्थ नाहीं. संसारांत नेहमीं अशुभ कृत्यें घडणार म्हणून संसार अशुभ

व अशरण आहे. चारहि गतीमध्ये सतत भ्रमण करावयास लावितो म्हणून तो अनित्य आहे. सर्व प्रकारच्या दुःखाला संसार कारणीभूत असल्यामुळे संसार दुःखमय आहे. आत्म्याहून भिन्न स्वरूपाचा संसार असल्यानें तो पररूप आहे. अनंतानंत काळ परिभ्रमण करीत असतां एखाद्यावेळीं संसारी जीव चांगल्या क्षेत्रांत, उत्तम कुलांत, सुंदर व सुदृढ शरिरांत जन्म घेतो. संतति, संपत्ति, ऐश्वर्य, मानसन्मान, मित्र, सुंदर व भार्याप्राप्ति, विद्वत्ता वगैरे वगैरे स्पृहनीय गोष्टींचा लाभ होतो; परंतु हे सर्व क्षणमात्र व नश्वर आहेत. संपत्ती व आरोग्य केव्हां नष्ट होतील याचा नेम नाहीं. आजचे मित्र उद्याला वैरी होतील. अशा तऱ्हेच्या विचारामुळें संसाराबद्दल **आसक्ति** ठेवूं नये. माझा शत्रूही कोणी नाहीं व मित्रही कोणी नाहीं. अशा चिंतनामुळें समताभावाची वृद्धि होते. सामायिक करीत असतां सर्व प्राणिमात्रांना तो क्षमा करितो व त्यांच्या क्षमेची याचना करितो.

वर, ध्येय व आसक्ति हे दोन शब्द जाड अक्षरांत कां घातले आहेत ? ज्याचा संसार सुखमय आहे; त्यांनीं हें सुख क्षणभंगुर आहे, असें मानून त्या सांसारिक सुखांत आसक्ति ठेवूं नये. संसार सोडावयाचा उपदेश नसून त्यांत आसक्ति ठेवूं नये, असा उपदेश आहे. संसारांत असतां मातृधर्म, पितृधर्म, भार्याधर्म, पुत्रधर्म वगैरेचें पालन करणें जरूर आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांचें साधन करावें लागणार; परंतु तें साध्य करीत असतां त्यांत आसक्ति राहूं नये; त्यांचा मोह ठेवूं नये.

मोक्ष हें ध्येय. हें ध्येय गांठतांना संसारातून जावें लागणार. धर्म, अर्थ वा काम पुरुषार्थांची प्राप्ति करणें हें आपलें ध्येय नव्हे, तर मोक्षप्राप्ति हें आपलें ध्येय आहे; असें मानीत राहिल्यानें इतर पुरुषार्थांबद्दल आसक्ति राहणार नाहीं. अर्थ वा काम पुरुषार्थांची प्राप्ति झाली कीं तेथेंच थांबावयाचें नाहीं. त्यांना मागें टाकून मोक्ष प्राप्तिसाठीं धांव घ्यावयाची आहे, तेथवर पल्ला गांठावयाचा आहे. तेंच अंतरचें व सर्वोत्कृष्ट ध्येय आहे.

### सामायिकाचे अतिचार.

**वाक्कायमानसानां दुष्प्रणिधानान्यनादरास्मरणे ।**
**सामयिकस्यातिगमा व्यज्यन्ते पंच भावेन ॥१०५॥**

**अन्वयार्थः**—(वाक्कायमानसानां) वचन, शरीर व मन यांचे (दुष्प्रणिधानानि) चलायमान होणें (अनादरास्मरणे) अनादर करणें व विस्मरण होणें हें (भावेन) परमार्थानें (सामयिकस्य) सामायिकाचें (पंच) पांच (अतिगमाः) अतिचार (व्यज्यन्ते) सांगितले गेले आहेत.

**अर्थः**—(१) वचनांत चलबिचल होऊं देणें (२) कषायामुळें शरीर अस्थिर होऊं देणें (३) आर्त व रौद्र ध्यानामुळें मनाची चलबिचलता होऊं देणें (४) सामायिक क्रियेंत आदर व भक्ति न ठेवतां सामायिक करणें व (५) सामायिक पाठांत चूकभूल करणें; असे सामायिकव्रताचें पांच अतिचार आहेत. या पांच अतिचारापैकीं श्रद्धा, भक्ति व आस्था न ठेवतां केलेल्या सामायिक विधीला आचार्योनीं अतिचारांतव कां घालावें ? हें समजणें कठीण आहे. श्रद्धा, भक्ति व आस्था नसता केलेला सामायिक ह्मणजे अनाचारच—व्रतभंग-होणार नाहीं ?

### सामायिक शिक्षाव्रताबद्दल विशेष विचार.

योगसार टीकेंत लिहिलें आहे कीं,

**सव्वे जीवा णाणमया जो समभाव मुणेइ ।**
**सो समाइउ जाणि फुडु जिणवर एम भणेइ ॥ ९९ ॥**

**भावार्थः**—सर्वांविषयीं सम अगर समताभाव यास सामायिक ह्मणतात. जगतांतील सर्व चराचर वस्तूंकडे जेव्हां निश्चयनयानें आणि द्रव्यार्थिकनयानें पाहतां येईल तेव्हांच समभाव प्राप्तिचा संभव आहे. चार गती कर्मांच्या उदयानें जीव हे नारकी, पशु, मानव व देव स्वरूपांत दिसतात. जातिनामकर्मांच्या उदयानें एकेंद्रिय तें पंचेंद्रिय अखेर स्वरूप जीवाला प्राप्त होतें. आठ कर्मांच्या उदयामुळें जीवाची बाह्य व अंतरंग अवस्था भिन्न भिन्न होते.

(१) मोहनीय (२) ज्ञानावरणीय (३) दर्शनावरणीय (४) अंतराय (५) आयु (६) नाम (७) गोत्र व (८) वेदनीय अशीं हीं आठ कर्में आहेत. यांपैकीं एक किंवा अधिक कर्मांचा उदय झाला तरी जीवावर त्याचे सारखेच परिणाम होतात, असें नाहीं. कषायाची तीव्रता अगर मंदता यावर परिणाम अवलंबून असतात. व्यवहारिक नयानें पाहतां रागद्वेषादि विकार उत्पन्न होणारीं कारणें सम्यग्दृष्टीच्या समोर असतात. सम्यग्दृष्टि, जीवाच्या बाह्य गुणाकडे अधिक पाहतो. निश्चयनयानें विचार करीत असतां सम्यग्दृष्टीचा आत्मा दुसऱ्या जीवांतील आत्म्याचाच तेवढा विचार करितो. तो आत्मा ज्या शरिरांत अगर देहांत आहे, तो जीव श्रीमंत आहे, उच्चकुलीन आहे, गरीब आहे कीं अडाणी आहे, इत्यादि विचार करीत नाहीं. कारण कर्मांच्या उदयानें या अशा अवस्था प्राप्त होतात.

या विचारामुळें त्यांना—सामायिक करणाऱ्यांना—आपल्या आत्म्या-सारखाच इतरांचा आत्मा कर्मरहित, शरीररहित व रागद्वेषरहित आहे; तसेंच तो आत्मा परमज्ञानी, परमसुखी, परमशुद्ध आहे, असें दिसूं लागतें. आपल्या आत्म्यामध्यें जे गुण व जी शक्ति आहे, तसेच गुण व तितकीच शक्ति इतरहि आत्म्यांत आहे, असें दिसून येतें. या भावनेलाच समताभाव असें ह्मटलें जातें व ह्मणूनच सामायिक ह्मणजे सम अगर समताभावप्राप्तीचें साधन आहे, असें मानिलें जातें.

समताभाव उत्पन्न झाला कीं रागद्वेषादिकांच्या मूळ कारणांचेंच उच्चाटन होतें. ह्मणून रागद्वेषादिकांच्या त्यागालाच सामायिक असें ह्मटलें आहे.

**राय–रोस बे परिहरिवि जो समभाउ मुणेइ।**
**सो समाइउ जाणि फुडु केवलि–एम भणेइ ॥ १०० ॥**

**भावार्थः**—रागद्वेषांचा त्याग ह्मणजेच सामायिक. आपला हेतु साध्य होण्याच्या कामीं ज्यांची मदत होते, त्यांच्याबद्दल प्रेम व जे त्या मार्गांत आड येतात, त्यांच्याबद्दल द्वेष, अशी भावना उत्पन्न होते. घोर तप करणारेहि या भावनेपासून सर्वस्वी मुक्तच असतात असें नाहीं.

## सामायिकाचें लक्षण.

सामायिकव्रताचें लक्षण आचार्य अमितगतीनीं आठव्या परिच्छेदाच्या ३१ साव्या श्लोकांत दिलें आहे. तो श्लोक

**जीविते मरणे लाभेऽलाभे योगे विपर्यये।**
**शत्रौ मित्रे सुखे दुःखे साम्यं सामायिकं विदुः ॥ ३१ ॥**

**सारांश:**—शत्रु असो वा मित्र असो, संपत्तकाल असो वा, विपत्त-काल असो, जिवंतपणीं—संसारांत अगर डोळ्यांत प्राण राहिला असो, अनुकूल वा प्रतिकूल समय असो; सारांश कोणत्याहि परिस्थितींत मनाची समता ठेवणें, कोणाचाही राग-अनुराग-प्रेम न करणें अगर द्वेष न धरणें, याला सामायिक व्रत ह्मणतात.

या व्रताचें महत्व विशेष आहे. सामायिक ह्मणजे दिवसांतून कांहीं वेळ ग्रंथवाचन नव्हे. ग्रंथवाचनांत मन तल्लीन झालें ह्मणजे त्यावेळेपुरता समताभाव उत्पन्न होणारच नाहीं असें नाहीं. तथापि त्यावेळेव्यतिरिक्तही समताभाव धरावा ह्मणून आचार्यांनीं कोणत्याही परिस्थितींत व सदासर्वकाळही समतेची भावना असावी ह्मणून 'जीविते मरणे' इत्यादि शब्दप्रयोग उपयोगांत आणिले आहेत.

असा समताभाव मनांत सदैव राहील तर संसारांतील रोजच्या अनेक कटकटी तरी मिटतीलच पण चालू युद्धासारखीं अखिल प्राणिमात्रांचा संहार करणारीं युद्धेंहि टळतील.

आचार्य पद्मनंदि यांनीं श्रावकाचारांत सामायिकाचें स्वरूप पुढील-प्रमाणें दिलें आहे.

**समता सर्वभूतेषु संयमे शुभभावना।**
**आर्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिकं व्रतम् ॥ ८ ॥**

**सारांश:**—अखिल प्राणिमात्राविषयीं समताभाव, संयमांत शुभ-भावना धरणें व आर्त व रौद्र ध्यानाचा त्याग करणें याला सामायिकव्रत असें ह्मटलें आहे.

सर्वांविषयीं समताभाव धरावा. राग लोभादिकांच्या आधीन होऊं नये. आचार्य समंतभद्र यांनीं या व्रत पालनाचा अधिक खुलासेवार तपशील दिला आहे. ( पहा श्लोक ९७ ते १०५ अखेर ) आचार्य अमितगतीनीं कोणत्याहि परिस्थितींत सदासर्वकाळ व शत्रुमित्राबद्दल आपल्या मनाची भावना कशी असावी यावर अधिक जोर दिला आहे. आचार्य पद्मनंदि यांनीं काल व क्षेत्रमर्यादा घातलेली नाहीं. सारांश कोणत्याहि आचार्यांचें मत विचारांत घेतलें व त्यांतील तपशील सोडून दिला तर एक गोष्ट स्पष्ट होते व ती ही कीं आपल्या मनाचे कषाय बिघडवूं देऊं नयेत. कषाय मलीन होऊं देऊं नये. समाजस्वास्थ्याच्या दृष्टीनें या व्रताचें महत्व अत्यंत महत्त्वाचें आहे. दुही व वैरभाव व त्यामुळें उत्पन्न होणारी हानी ही या व्रतपालनामुळें टाळतां येतील.

आचार्य पद्मनंदी यांनीं सप्तव्यसनांचा त्याग केल्याशिवाय सामायिक होणार नाहीं, असें मत प्रदर्शित केलें आहे. श्लो.सं. ९मध्यें ते लिहितात कीं—

सामायिकं न जायेत व्यसनम्लानचेतसः ।
श्रावकेन ततः साक्षात् त्याज्यं व्यसनसप्तकम् ॥९॥

**सारांश:**—जो एक किंवा अधिक व्यसनाच्या आधीन झाला आहे, त्याचेकडून सामायिक व्रताचें पालन होणार नाहीं. (१) मांसाहार (२) जुगार (३) मद्यपान (४) वेश्यागमन ५ शिकार (६) चोरी व (७) परस्त्रीगमन हीं सात व्यसनें आहेत, असें पद्मनदि आचार्यांनीं श्लोकसंख्या १० मध्यें सांगितलें आहे. आचार्य पद्मनंदी यांचा या सात व्यसनांवर तीव्र कटाक्ष दिसतो. आचार्य समंतभद्र यांनीं थंडी, वारा व ऊन इत्यादिकांची खंती न बाळगतां सामायिक करावें असें लिहिलें आहे. बराच तपशील दिला असतांहि आचार्य पद्मनंदि यांच्याप्रमाणें व्यसन व सामायिक यांचा अन्योन्य संबंध जोडलेला नाहीं. आचार्यांच्या मतामतांचा हा गलबला व त्यांचीं कारणें याबद्दलचा विचार न करितांहि आचार्य पद्मनंदी यांचें मत ग्राह्य मानिल्यास अधिकस्य अधिकम् फलम् या न्यायानें व्यसनत्याग करणें खास उचीत आहे. काल येथें

एक शंका येते व ती ही कीं, प्रचलित व्यापाराच्या पद्धतींत सट्टेबाजीला बरेंच महत्व आलें आहे. प्रचलित कायद्यांत सट्टयाच्या व्यवहाराला कायदेशीर स्वरूप दिलेलें नाहीं. सट्टा बेकायदा मानिला असला तरी नैतिकदृष्टया सटोडी निषिद्ध मानिले जात नाहींत. अनेक सामायिकव्रती सट्टयाचा व्यापार करितात. प्रचलित सट्टेबाजी व धर्मग्रंथांतील जुगार यांत फरक मुळींच नाहीं; व असें मानिल्यास सामायिक व्रत्यांनीं सट्टयाच्या व्यवहारापासून अलिप्त राहिलें पाहिजे. पं. सुखानंदजी याचे विचार विचारांत घेतल्यास सटोडयांच्या घरीं अन्नसेवन करणेंहि मुनीनीं वर्ज्य मानिलें पाहिजे. जुगार व सट्टेबाजी हीं भिन्न आहेत असें म्हणून सट्टयावर धर्माचें शिक्कामोर्तब करणाऱ्यांच्या आड येण्याची आमची इच्छा नाहीं.

सारांश, समताभावामुळें रागद्वेषादिकांची भावना राहत नाहीं. समदृष्टी संसारांत मिळणाऱ्या सुखावर आसक्ति ठेवित नाहीं. आपण आपलें कार्य केलें आहे. याहि उप्पर सुखदुःख झालेंच तर शुभ वा अशुभ कर्माचें तें फल आहे असें तो समजतो.

सामाजिक व राजकीय स्वास्थ्याच्या दृष्टीनें तर या व्रताचें महत्व अपरिमित आहे, हें थोड्याशा विचारांती दिसून येईल.

### प्रोषधोपवास-शिक्षाव्रताचें लक्षण.

**पर्वण्यष्टम्यां च ज्ञातव्यः प्रोषधोपवासस्तु ।**
**चतुरभ्यवहार्याणां प्रत्याख्यानं सदेच्छाभिः ॥ १०६ ॥**

**अन्वयार्थः**—( पर्वणि ) चतुर्दशीला ( च ) व ( अष्टम्यां ) अष्टमीला ( सदा ) सर्वकाल ( इच्छाभिः ) व्रत धारण करण्याची इच्छा करणाऱ्याकडून ( चतुरभ्यवहार्याणां ) चार प्रकारच्या आहारांचा ( प्रत्याख्यानं ) त्याग करणें हें ( प्रोषधोपवासः ) प्रोषधोपवास व्रत आहे असें ( ज्ञातव्यः ) जाणावें.

**अर्थः**—वर्षांतील प्रत्येक चतुर्दशीच्या व अष्टमीच्या पर्व दिवशीं व्रत म्हणून व अन्तःकरणपूर्वक स्वेच्छेनें-मनानें-चारी प्रकारचें अन्न वर्ज्य करणें, यास प्रोषधोपवास म्हणतात (१) खाद्य (२) स्वाद्य (३) लेह्य व (४) पेय असें

अन्नाचे चार प्रकार आहेत. (१) खाद्य-भात, भाकर, चपाती, व डाळ आदि (२) स्वाद्य-लाडू, बरफी व पेढा आदि स्वादयुक्त जिनस (३) लेह्य-चटणी, आमरस, मुरंबा, आदि (४) पेय-दूध, पाणी, ताक, सरबत इत्यादि.

आचार्य अमितगति आपल्या श्रावकाचाराच्या सहाव्या अध्यायांतील श्लोक नं. ९१ मध्यें ह्मणतात.

**उपवासं जिननाथा निगदंति चतुर्विधाशनत्यागम् ।**
**सजलमनुपवासोऽयमेकस्थानंसकृद्भुक्तिम् ॥ ९१ ॥**

**भावार्थः**—चार प्रकारच्या आहार त्यागाला **उपवास** ह्मणावें; फक्त पाणी घेतल्यास **अनुपवास** ह्मणावें; व एकवेळ भोजन केल्यास **एकस्थान** ह्मणावें. अनुपवास ह्मणजे अल्पसा उपवास-कांहीं अंशाचा अन्न त्याग.

यावरून प्रोषधोपवास, उपवास, अनुपवास व एकस्थान असे पर्व दिवसाच्या आहारत्यागाचे चार भेद होतात. प्रोषधोपवास-पर्वदिनाच्या आदल्या दिवशीं नित्याप्रमाणें एक वेळ भोजन करणें व त्यानतर १६ प्रहर-४८ तास अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असें व्रत अगर अशी प्रतिज्ञा करून पर्वदिवशीं चारही प्रकारच्या अन्नापैकीं कोणतेंहि अन्न न घेणें. पर्वाच्या दुसऱ्या दिवशीं नित्याप्रमाणें आहार घेणें, याला प्रोषधोपवास ह्मणतात. यावरून सप्तमी तिथीला एकवेळ जेवण करावयाचें अष्टमीच्या दिवशीं अन्नग्रहण न करावयाचें ह्मणजे दरम्यान ४८ तास अन्नपाण्याशिवाय राहावयाचें, याला प्रोषधोपवास ह्मणतात. याशिवाय हा सर्वकाल धर्माध्ययनांत घालवावयाचा असतो.

**उपवासः**—पर्वतिथीच्या दिवशीं चारही प्रकारच्या आहाराचा त्याग करणें.

**अनुपवासः**—यांत पर्वाच्या दिवशीं फक्त पाणी घ्यावयाचें असतें; अर्थात ज्याला उपवास सोसत नाहीं अगर अशक्ततेमुळें निदान पाणी घेणें तरी प्रकृतीच्या दृष्टीनें इष्ट असतें.

**एकस्थानः**—पर्वाचे दिवशीं फक्त एक वेळच आहार घेणें. यालाच प्रोषध असेंही ह्मणतात. ( श्लो.नं. १०९ खालील मजकूर पहावा. )

## प्रोषधोपवास-पर्वदिवशीं-त्याज्य गोष्टी.

**पंचानां पापानामलंक्रियारम्भगन्धपुष्पाणाम् ।**
**स्नानांजननस्यानामुपवासे परिहृतिं कुर्यात् ॥ १०७ ॥**

**अन्वयार्थः**—( उपवासे ) उपवासाचे दिवशीं ( पंचानां पापानां ) हिंसादिक पांच पापांचा ( अलंक्रियारम्भगन्धपुष्पाणाम् ) शृंगार, आरम्भ, गंध आणि फुलें यांचा व ( स्नानांजननस्यानां ) स्नान, अंजन व नस्य यांचा ( परिहृतिं ) त्याग ( कुर्यात् ) करावा.

**अर्थः**—प्रोषधोपवासाचे दिवशीं हिंसादिक पांच पापांचा त्याग करावा; शृंगार व कोणत्याहि कार्याला आरंभ करू नये, गंध लावूं नये, फुलांचा उपभोग घेऊं नये, डोळ्यांत अंजन घालूं नये, बिडी व तपकीर ओढूं नये, अनुराग उत्पन्न करणाऱ्या गोष्टी म्हणजे संगीत, गीत इत्यादि करूं नये.

## प्रोषधोपवासाच्या वेळेचीं कर्तव्यें.

**धर्मामृतं सतृष्णः श्रवणाभ्यां पिबतु पाययेद्वान्यान् ।**
**ज्ञानध्यानपरो वा भवतूपवसन्नतन्द्रालुः ॥ १०८ ॥**

**अन्वयार्थः**—( अतन्द्रालुः ) उद्यमी अशा ( उपवसन् ) उपवास करणाऱ्यानें ( सतृष्णः ) आस्थापूर्वक (श्रवणाभ्यां) कानांच्या योगानें ( धर्मामृतं ) धर्मरूपी अमृतावें ( पिबतु ) पान करावें (वा) अथवा ( अन्यान् ) दुसऱ्यांना ( पाययेत् ) पान करावयास लावावें (वा) अथवा ( ज्ञानध्यानपरः ) ज्ञान आणि ध्यानामध्यें तत्पर ( भवतु ) व्हावें.

**अर्थः**—प्रोषधोपवास करणाऱ्या व्यक्तिनीं आळस धरूं नये. आळस सोडून उत्साहित मनानें धर्माचें अध्ययन, अध्यापन, वाचन, मनन व श्रवण करावें. धर्माचरणामुळें प्राण्यांचें हित होतें म्हणून धर्माला अमृताची उपमा दिली आहे. या दिवशीं याप्रमाणें धर्मामृत प्यावें व पाजावें, अशी धर्माज्ञा आहे. मागील श्लोकांत काय काय वर्ज्य करावें हें सांगितलें आहे व या श्लोकांत काय काय करावें हें सांगितलें आहे.

### प्रोषध, उपवास व प्रोषधोपवास-यांचें लक्षण.

**चतुराहारविसर्जनमुपवासः प्रोषधः सकृद्भुक्तिः।**
**स प्रोषधोपवासो यदुपोष्यारंभमाचरति ॥१०९॥**

**अन्वयार्थः**—( चतुराहारविसर्जनम ) चार प्रकारच्या आहाराचा त्याग करणें हा ( उपवासः ) उपवास होय. ( सकृत्-भुक्तिः ) एकदांच जेवणें हा ( प्रोषधः ) प्रोषध होय ( उपोष्य ) उपवास करून ( यत् ) जे ( आरंभ ) पारण्याचे दिवशीं आरंभ अर्थात एकाशन ( आचरति ) करणें ( सः ) तो ( प्रोषधोपवासः ) प्रोषधोपवास होय.

**अर्थः**—चार प्रकारच्या आहाराचा १२ प्रहर त्याग करणें याला उपवास ह्मणतात. दिवसांतून फक्त एकवेळ आहार घेणें याला प्रोषध अगर एकस्थान ह्मणतात. १६ प्रहर चारही प्रकारच्या आहाराचा त्याग करणें याला प्रोषधोपवास ह्मणतात. याबद्दलचा अधिक खुलासा श्लो. नं. १०६ खालीं केला आहे.

### प्रोषधोपवासाचे अतिचार.

**ग्रहणविसर्गास्तरणान्यदृष्टमृष्टान्यनादरास्मरणे ।**
**यत्प्रोषधोपवासव्यतिलंघनपंचकं तदिदम् ॥११०॥**

**अन्वयार्थः**—( यत् ) जें ( अदृष्टमृष्टानि ) न पाहतां व न झाडतां ( ग्रहणविसर्गास्तरणानि ) घेणें, टाकणें, बिछाना घालणें, ( अनादरास्मरणं ) अनादर करणें व विस्मरण होणें ( तत् ) तें ( इदं ) हे (प्रोषधोपवासव्यतिलंघनपंचकं ) प्रोषधोपवासाचे पांच अतिचार आहेत.

**अर्थः**—प्रोषधोपवास व्रताचे पांच अतिचार आहेत. तें (१) ग्रहण-जीवजंतु आहेत अगर कसें हें न पाहतां पूजादिकांची सामुग्री घेणें (२) विसर्ग-न पाहतां व न झाडतां जमिनीवर मलमूत्रादि टाकणें-विसर्जन करणें, (३) न पाहतां व न झाडतां आंथरूण घालणें, (४) अनादर-आवश्यक व जरूर त्या धर्मक्रियेबद्दल आदर न धरणें व (५) अस्मरण-चित्ताची एकाग्रता न ठेवणें असे हे या व्रताचे पांच अतिचार आहेत.

## उपवास-पर्व-दिनीचें-कर्तव्य.

उपवास व प्रोषधोपवासादि पर्वदिवशीं आपण कसें वागावें व काय करावें याबद्दल आचार्य पद्मनंदी यांच्या मताचा परिचय करून घेणें जरूर आहे. आचार्य ह्मणतात कीं—

**पर्वस्वथ यथाशक्ति भुक्तित्यागादिकं तपः ।**
**वस्त्रपूतं पिबेत्तोयं रात्रिभोजनवर्जनम् ॥ २५ ॥**

**सारांशः**—अष्टमी व चतुर्दशीचे दिवशीं यथाशक्ति उपवासादि तप करावेत. तसेंच वस्त्रगाळित पाण्याचा उपयोग करावा. प्यावें-व रात्री जेवण करूं नये.

आचार्यांच्या श्लोकांतील पहिल्या पदाबद्दल विशेष विचार करण्याचें कारण नाहीं; परंतु दुसऱ्या पदाबद्दल अधिक विचार कर्तव्य आहे. पर्वाच्या दिवशीं वस्त्रगाळित पाणी प्यावें व रात्रीं जेवण करूं नये असें ह्मटल्यानें इतर दिवशीं वस्त्रगाळ करून पाणी न प्यालें अगर रात्रीं अन्न खाल्लें तर चालेल कीं काय ? श्लोकांचा सरळ अर्थ विचारांत घेतला तर वरील शंकेला साधार जागा आहे. इतर आचार्यांचीं मतें विचारांत घेतां या श्लोकांतील दुसऱ्या चरणाचा अर्थ निराळाच लावावा लागेल, पर्वदिवशीं तरी वरील निर्बंध पाळलेच पाहिजेत. इतर दिवशीं ते निर्बंध पाळूच नयेत असें मात्र नव्हे.

आचार्य समंतभद्रांचा श्रावकाचार आचार्य पद्मनंदी यांनीं पाहिलाच नसावा असें ह्मणणें धाष्टर्याचें होईल. आचार्य समंतभद्र यांच्या श्रावकाचारांतील निर्बंध डोळ्यापुढें असतांहि ते शिथिल करण्याचा प्रयत्न कां व्हावा ? याचें संभाव्य कारण असें असावें कीं आचार्य पद्मनंदी यांनीं आपल्या वेळची समाजाची परिस्थिती विचारांत घेऊन कमींत कमी निर्बंध घातले असावेत. हा तर्क आहे. खऱ्या कारणांचा विचार करण्याचें काम शास्त्रज्ञांचें आहे.

वरील आचार्य वचनाचा विचार करीत असतां तीन गोष्टींचा विचार कर्तव्य आहे.

(१) ' यथाशक्ति भुक्तित्यागादिकं ' या शब्द समुच्चयावरून उपवास प्रोषधोपवास वा एकभुक्ति यापैकींच कोणत्याहि प्रकारें अवलंब्य करावें असाच

अर्थ निश्चितपणें होईल असें दिसत नाहीं. रोज खात असलेल्या अन्नापैकीं एखादें अन्न उदाहरणार्थ फक्त भातच तेवढा वर्ज्य केला तरी यथाशक्ति भुक्ति-त्याग कां होऊं नये ?

(२) वस्त्रपूतं पिबेत्तोयं—ह्मणजे पर्व दिवशीं वस्त्रगाळ पाणी प्यावें, हें पर्व दिवशींचें दुसरें कर्तव्य; मात्र आचार्य समंतभद्र ही अट घालीत नाहींत. एवढेंच नव्हे तर श्लोक संख्या १२७।१२८ मध्यें समाधि मरणाचें वेळीं आहार त्यागाचा जो क्रम सांगितला त्यांत तापविलेलें पाणी घेण्याची आज्ञा आहे; परंतु **वस्त्रगाळ** करून पाणी तापवावें अशी आज्ञा केलेली नाहीं. आठ मूल-गुणांत वस्त्रगाळ पाण्याचा समावेश करणाऱ्या आचार्यांना तर आचार्य पद्मनं-दीचें हें मत बंडखोरीचेंच वाटेल !!

(३) रात्रिभोजनवर्जनम्-हें पर्वदिवशीं तिसरें कर्तव्य आचार्य पद्मनंदींनीं सांगितलें आहे. रात्रीं भोजनत्यागाचा कांहीं आचार्य मूळगुणांत समावेश करि-तात. श्रीजिनसेन रात्रीभोजनत्यागाला सहावें अणुव्रत ह्मणून मानितात. आचार्य पद्मनंदी अष्टमी-चतुर्दशीच्या पर्वदिनीं रात्रीभोजनत्याग वर्ज्य ठरवितात. आचार्य समंतभद्र श्लोक संख्या १४२ मध्यें सहाव्या व्रतप्रतिमाधारी श्रावकानें रात्री-भोजनत्याग करावा असें लिहितात.

यावरून रात्रीभोजनत्याग व वस्त्रगाळ पाणी याबद्दल आचार्य वचनांत तीव्र मतभेद दिसत आहे, हें स्पष्ट दिसेल. आचार्यवचनात अशी तीव्र मत-भिन्नता दिसत असली तरी आज जी रूढी आहे, तीच अधिक इष्ट दिसते.

## आचार्य पद्मनंदी व आठ मूळगुण व सप्तव्यसनें.

आचार्य समंतभद्र व आचार्य अमितगति यांच्या मतें आठ मूळगुण कोणते, याची चर्चा वर केलीच आहे. आचार्य पद्मनंदी व आचार्य अमित-गति यांच्या मतांत एक वाक्यता दिसते.

**त्याज्यं मांसं च मद्यं च मधूदुम्बरपंचकम् ।**
**अष्टौ मूलगुणाः प्रोक्ता गृहिणो दृष्टिपूर्वकाः ॥ २३ ॥**

**सारांशः**—श्रावकानें तीन मकार व पंच उदुंबर यांचा त्याग करावा. सम्यग्दर्शनीयांचे हे आठ मूलगुण होत.

सप्त व्यसनाच्या यादींत या आठ मूलगुणांपैकीं मद्य व मांस यांचा समावेश केला आहे. मद्य व मांस हीं जो खातो व जुगारादि इतर पांच व्यसनें ज्याला आहेत तो सामायिक व्रतधारी होणार नाहीं. असें आचार्य पद्मनंदी यांनीं श्लोक ८ मध्यें लिहिलें आहे. वरील आठ मूलगुण असल्याखेरीज श्रावकच होणार नाहीं. जो श्रावकांच्या कसोटीला उतरत नाहीं, तो सम्यग्दृष्टी कसा होणार ? व जो सम्यग्दृष्टीहि नाहीं तो सामायिकव्रती तरी कसा होणार ? असा विचार करितां व ही विचारसरणी बरोबर आहे असें मानिल्यास सामायिक व्रत धारण करण्यापूर्वीच मद्य व मांसादिकांचा त्याग झालेलाच असतो. सामायिक व्रतधाऱ्यांनीं सात व्यसनांपैकीं दारु व मांस यांचा त्याग केला पाहिजे असें ह्मणणें असंबद्ध होईल. कारण त्यांचा त्याग या व्रतसेवनापूर्वीच झालेला असतो. सात प्रकारच्या व्यसनावर आचार्य पद्मनंदी यांचा विशेष कटाक्ष असावा व त्यामुळें सामायिक व्रतासारख्या अखेरअखेरच्या पायरीवर असणाऱ्यानाहि मद्य व मांसांचा त्याग त्यांनीं सांगितला असावा असें दिसतें. या सर्व आचार्यांच्या भिन्न भिन्न मतांचा समन्वय कसा करतां येईल हें लिहिलेंच आहे; तथापि एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं, तीर्थंकर मतांचा अनुवाद करितांना भिन्न भिन्न मतें प्रतिपादिलीं जावींत व त्यांचा समन्वय करून आचार्यवचनांत मतभेदता नाहीं असें ह्मणण्याचा प्रसंग कां यावा ?

## आजचा व्यवहार कसा आहे ?

अष्टमी व चतुर्दशीच्या पर्वदिवशीं उपवास, प्रोषधोपवास, एकस्थान वगैरे करणार श्रावक अनेक आहेत. यापूर्वी उपवासादिकांचा जो विधी सांगितला आहे त्यावरहुकूम आचरण करणारे किती ? दिवसभर तोंड हालविणाऱ्यापेक्षां आजचे प्रोषधोपवासी निर्विवाद बरे. दगडापेक्षां वीट मऊ या न्यायानें हें सर्व ठीक आहे. या विधींत जें जें करूं नये असें सांगितलें आहे व जें वर्ज्य मानिलें

आहे तेंच अचूक धर्म ह्मणून आचरिलें जातें. उदाहरणार्थ अंगसंस्कार–स्नान करणें, गंध लावणें, फुलांचा वास घेणें इत्यादि करूं नयेत अशी धर्माज्ञा असतां आह्मी पर्वदिनीं बिनचूक स्नान करितों, नेहमीपेक्षां गंधाचा मोठा टिळा लावितो, रोजचा पोटापाण्याचा व्यवहार बहुधा सोडीत नाहीं व ध्यान, वाचन व श्रवण तर क्वचितच.

आरोग्याच्या दृष्टीनेंहि या व्रताचें महत्व आहेच; परंतु त्याचाहि कितपत लाभ होतो, याची शंकाच वाटते. उपवास करावयाचा ह्मणून त्या दिवशीं यथेच्छ मिष्टान्न व जडान्न इतकें खावयाचें कीं दोन दिवसाची बेजमी एकाचवेळीं करावयाची !! यामुळें आरोग्यलाभहि नाहीं व व्रतपालनहि नाहीं. या दोहोंसहि मुकावें लागतें.

## वैदिकधर्म व उपवास.

वैदिकधर्मांतहि उपवासाचें महत्व कमी मानिलें आहे असें नाहीं. मात्र प्रायश्चित्त ह्मणून त्या धर्मांत उपवासाची योजना केली आहे असें दिसतें. आपल्याकडून कांहीं दोष घडले तर त्या घडलेल्या पापकृत्याबद्दल दंड ह्मणून उपवास करावयाचा. आचार्य समंतभद्रांना ही विचारसरणी पसंत पडणार नाहीं. केव्हांतरी मर्जीप्रमाणें उपवास करण्यापेक्षां नियमित दिवशीं व व्रत ह्मणून उपवास करणें श्रेयस्कर, असें हिंदुधर्मशास्त्रज्ञांचें मत आहे.

याचाच अर्थ असा कीं मनाचा संकल्प करावा; अमूक दिवशीं उपवास करीत जाईन, असें व्रत घ्यावें. वरील फरक लक्षांत ठेवूनही उपवासाबद्दल वैदिक धर्मग्रंथांतील वचनांचा विचार केल्यास या दोन्ही धर्मांत नितांत साम्य आहे, असेंच दिसून येईल.

उपावृत्तस्य पापेभ्यो यस्तु वासो गुणैःसह ।
उपवासः स विज्ञेयः सर्वभोगविवर्जितः ॥

या श्लोकांत उपवास शब्दाचा अर्थहि दिला आहे. उप ह्मणजे जवळ व वास ह्मणजे राहणें. कशाच्या जवळ रहावयाचें? व कशापासून दूर रहावयाचें?

गुणैः सहवास-ह्मणजे सद्गुणाला जवळ करावयाचें व पापेभ्यो ह्मणजे पापापासून दूर राहवयाचें सर्वभोग विवर्जितः- उपवास करण्यानें काय करावें तर सर्व प्रकारचा भोग वर्ज करावा.

दोन्ही धर्मांतील नितांत साम्य दाखविण्यास वरील एकच उतारा पुरेसा आहे. उपवास कसा करावा याबद्दल मात्र या दोन्ही धर्मांत तीव्र मतभेद दिसतो. एकच वेळ खावें अगर दिवसभर विशिष्टच पदार्थ खात जावेत ? हिंदुधर्मीय उपवासाचें दिवशीं अनेक वेळां उपवासाचे जिन्नस ह्मणून खाल्लें जातात. चहा, बटाटा इत्यादि अलिकडील जिनसांचा उपवासाच्या पदार्थांच्या यादींत हिंदुधर्मीयांनीं केव्हांच समावेश करून घेतला आहेऽ.

पर्व दिवशींच्या आहारासंबंधीचे निर्बंधांची चर्चा येथपर्यंत झाली. श्रावकाचा नित्य आहार कसा असावा ? शुद्धाहार-अन्न कोणी शिजवावें इत्यादि-काबद्दल एक अवाक्षरहि या श्रावकाचारांत सांगितलेलें नाहीं. या विषयावरील इतर ग्रंथांत मात्र यासंबंधी चर्चा आढळते.

व्यापारी लोकांनीं कोणकोणत्या जिन्नसांचा व्यापार करावा व कोणकोणत्या जिन्नसांचा व्यापार करूं नये इत्यादिकाबद्दल निर्बंध घातले आहेत.

शौचविधी, हजामत, घर बांधणें, नवा कपडा अंगावर केव्हां घालावा, कोणतें जनावर बाळगावें व बाळगू नये, कोणत्या जनावराच्या दुधाचा उपयोग करावा व करूं नये इत्यादि इत्यादि रोजच्या व्यवहाराबद्दल निर्बंध घातले आहेत.

जैनधर्मानेंच असे निर्बंध घातले आहेत असें नाहीं. हिंदु-वैदिक-धर्म ग्रंथांतहि जवळ जवळ तेच निर्बंध आहेत. कोणी कोणाची नक्कल केली अगर दोन विचारी लोकांच्या विचारांत अनेक वेळां साम्य असते, असा प्रकार झाला हें ठरविण्यांत अगर हे निर्बंध तीर्थंकरप्रणीतच आहेत कीं नाहीं, याची चर्चा करण्यांतहि अर्थ नाहीं.

### वैयावृत्याचें लक्षण.

**दानं वैयावृत्यं धर्माय तपोधनाय गुणनिधये ।**
**अनपेक्षितोपचारोपक्रियमगृहाय विभवेन ॥ १११ ॥**

**अन्वयार्थः**—( गुणनिधये ) गुणांचे निधी असलेल्या ( अग्रहाय ) घररहित असलेल्या ( तपोधनाय ) तप हेंच ज्यांचें धन आहे अशा यतींना ( विभवेन ) ऐपतीप्रमाणें, ( धर्माय ) धर्मासाठीं ( अनपेक्षितोपचारोपक्रियं ) प्रत्युपकाराची अपेक्षा न बाळगतां (दानं) दान देणें हें (वैयावृत्यं) वैयावृत्य होय.

**अर्थः**—प्रत्युपकाराची–उपकारफेडीची अगर मोबदल्याची इच्छा न धरतां व केवळ धर्मबुद्धीनें–कर्तव्य ह्मणून-सम्यक्त्वादि गुणांनीं युक्त अशा मुनीजनादिकांना आहार, पिंछी, कमंडलु, धर्मग्रंथादिकांचें दान देणें, यास वैयावृत्य ह्मणतात. मुनीकडून कोणता प्रत्युपकार अगर मोबदला मिळवावयाचा अशी शंका येणें साहजिक आहे. मंत्रलाभ, दानलाभ, कीर्ति व आशिर्वादामुळें भौतिक सुख मिळावें वा मिळतें, या हेतूनें दिलें जाणारें दान व्यर्थ आहे. केवळ धर्म, कर्तव्यकर्म व धर्मवृद्धी ह्मणून वरील प्रकारचीं दानें द्यावींत. चतुर्विध दान द्यावें, व तें आपल्या ऐपतीप्रमाणें असावें. दुसऱ्यानें सरी घातली ह्मणून दोरी बांधून घेऊं नये. सारांश दान निष्काम द्यावें. व धर्मवृद्धी हा दान देण्यांत हेतु असावा. धर्मवृद्धीसाठीं व निष्काम हेतूनें दानधर्म करावा असें सांगण्यांत उच्च हेतु आहे. व तो हा कीं, नांवलौकिकासाठीं, इहजन्मीं व भावी जन्मांत सुख मिळावें, ह्मणून दानधर्म करूं नये. धर्माज्ञच्या या कसोटीला उतरणारे महाभाग फारच विरळा !! गुप्तदानाचें महत्व तर यासाठींच. नांवलौकिकासाठीं व पारलौकिक सुखासाठीं दान करूं नये, तर मग तें करावें तरी कशासाठीं ? आपल्याजवळील संपत्तीचा संग्रह कमी करण्यासाठीं, ज्यांना ज्याची नड आहे ती भागविण्यासाठीं, धर्म व ज्ञानप्रसार हें आपलें कर्तव्यकर्म ह्मणून.

### वैयावृत्याचें दुसरें लक्षण अगर दुसरा प्रकार.

**व्यापत्तिव्यपनोदः पदयोः संवाहनं च गुणरागात् ।**
**वैयावृत्यं यावानुपग्रहोऽन्योपि संयमिनाम् ॥ ११२ ॥**

**अन्वयार्थः**—(गुणरागात्) गुण रागामुळें (संयमिनां) संयमी लोकांच्या (व्यापत्तिव्यपनोदः) आपत्तींना दूर करणें, (च) आणि (पदयोः) पाय (संवाहनं) दाबणें वगैरे (अन्यः अपि) दुसरें देखील (यावान्) जितके (उपग्रहः) उपकार आहेत, त्याला (वैयावृत्यं) वैयावृत्य ह्मणतात.

**अर्थः**—व्रती वा मुनी लोकांच्या गुणाबद्दल प्रेम व आदर ठेवून त्यांना झालेले कष्ट आपलें कर्तव्यकर्म ह्मणून नष्ट करण्याचा प्रयत्न करणें, उदाहरणार्थ ते प्रवास करून आले तर त्यांचे हातपाय रगडणें, ते आजारी पडल्यास त्यांची सेवा करणें व इतरहि अशाच बाबतींत हरप्रकारें त्यांच्यावर जितका उपकार करतां येईल तितके कर्तव्यकर्म ह्मणून करणें.

श्लोक संख्या १११ मध्यें वैयावृत्याचें जें स्वरूप-लक्षण—सांगितलें आहे, त्याच प्रकाराला कांहीं आचार्यांनीं अतिथिसंविभागव्रत या नांवानें संबोधिलें आहे. पं. आशाधर यांच्या सागारधर्मामृतांतील पाचव्या अध्यायांतील श्लो. संख्या ४१ मध्यें अतिथिसंविभागव्रताचें लक्षण दिलें आहे. मात्र आचार्य समंतभद्र यांनीं श्लो. सं. ११२ मध्यें वैयावृत्याचें जें लक्षण सांगितलें, त्यास जमणारें लक्षण सागारधर्मामृतांत तरी आढळ झाला नाहीं.

### तिथि-अतिथी-शब्दांचे अर्थ.

अतिथि या शब्दाचे दोन अर्थ केले जातात (१) तिथी ह्मणजे पर्व, उपवासादिकाचा दिवस न पाहतां भिक्षेसाठीं स्वतः जाणें व (२) देहसंरक्षणासाठीं उपयोगी असलेल्या अन्नाकरितां आपल्या पायानें दुसऱ्याच्या घरीं जाणें. यापैकीं पहिला अर्थ अधिक सार्थ दिसतो.

### दानाचें स्वरूप-लक्षण.

**नवपुण्यैः प्रतिपत्तिः सप्तगुणसमाहितेन शुद्धेन ।**
**अपसूनारम्भाणामार्याणामिष्यते दानम् ॥११३॥**

**अन्वयार्थः**—( सप्तगुणसमाहितेन ) सात गुणांनीं युक्त असलेल्या ( शुद्धेन 'श्रावकेन' ) शुद्ध श्रावकानें ( अपसूनारम्भाणां ) पंचसूना व आरंभ यांनीं रहित अशा ( आर्याणाम् ) मुनींचा ( नवपुण्यैः ) नवधाभक्तीनें ( प्रतिपत्तिः) आदरसत्कार व गौरव करणें हें (दानं) दान (इष्यते) असें ह्मटलें आहे.

**अर्थः**—पांच पातकांचा ज्यांनीं त्याग केला आहे व जे आरंभरहित आहेत, अशा मुनींना सात गुणांनीं सहित व नऊ प्रकारच्या भक्तीनें युक्त, आहारादि चतुर्विध दान श्रावकांनीं द्यावें. श्लोक नं. १११-११२ मध्यें सांगितल्याप्रमाणें प्रत्युपकाराची कोणतीहि इच्छा न धरतां केवळ कर्तव्य ह्मणून निष्काम बुद्धीनें धर्मवृद्धीसाठीं चतुर्विध दान द्यावें.

या श्लोकाच्या आरंभींच ' नवपुण्यैः ' या सहित श्रावकांनीं दान द्यावें, अशी आचार्यांची आज्ञा आहे. तीं नऊ पुण्यें कोणतीं? नऊ पुण्यालाच नवधाभक्ति असें दुसरें नांव आहे. तीं नऊ पुण्यें—

**पडिगहमुच्चठाणं, पादोदयमच्चणं च पणमंच ।**
**मणवयणकायसुद्धी, एसणसुद्धी य णवविहं पुण्णं ॥१॥**

(१) पडिगाहन—पडगाहन—प्रतिग्रह—ह्मणजे सामोरें जाणें. (२) उच्चास्थानं-उच्चस्थानीं बसविणें, (३) पादोदय-पादप्रक्षालन-पाय धुणें, (४) पूजा करणें, (५) पणमं-प्रणाम—नमस्कार करणें, (६+७+८) = मणवयणकायसुद्धी, मन, वचन व कायशुद्धी आणि (९) एपणसुद्धी-आहारशुद्धी-शुद्धाहार; अशीं हीं नऊ पुण्यें आहेत. मुनींना आदर दाखविण्याचे, त्यांचा सत्कार करण्याचे ह्मणजे आहार स्वीकारण्यापूर्वी त्यांना आमंत्रण देण्याचे हे नऊ प्रकारचे भक्तीचे मार्ग आहेत.

(१) आपल्या निवासस्थानापासून मुनी आहारासाठीं बाहेर पडले व आपल्या राहत्या घराजवळ आले कीं, त्यांना आदरानें सामोरें जावें (२) ते आपल्या येथें आले कीं, त्यांना जमिनीवर न बसवितां उच्च स्थानावर बसवावें ह्मणजे पाट वगैरे त्यांना बसावयास घालावा. (३) त्यानंतर त्यांचे पाय धुवून

(४) त्यांची पूजा करावी व (५) त्यांना नमस्कार करावा, (६-७-८) मनानें, वाणीनें व शरीरानें शुद्ध राहून त्यांना (९) शुद्ध आहार द्यावा.

सागारधर्मामृतांत (१) सात्विक (२) राजस व (३) तामस असे दानाचे तीन प्रकार-भेद सांगितले आहेत. सागारधर्मामृतांत दानविधीबद्दल श्लोकसंख्या ४५ अध्याय पांचवा यांत **दानविधी**चें वर्णन आहे.

प्रतिग्रह, उच्चासनादि विधीबरोबर अन्नशुद्धि सांगितली आहे. संस्कृत टीका व मराठी भाषांतर यांत अन्नशुद्धि ह्मणजे चतुर्दश प्रकारच्या मलांनीं रहित असें अन्न, असा अर्थ केला आहे. अन्न देणारा कोणत्या कुलांतील व कोणत्या धंद्याचा असावा, याबद्दलचा निर्बंध घातलेला दिसत नाहीं.

पांचव्या अध्यायांतील श्लोकसंख्या ५४ मध्यें पं. आशाधर यांनीं या व्रताचे जे अतिचार सांगितले आहेत; ते आचार्य समंतभद्र यांनीं श्लो. सं. १२१ मध्यें सांगितलेल्या अतिचारांशीं जमतातच असें नाहीं.

वैदिक धर्मांतहि भक्तीचे नऊ प्रकार सांगितले आहेत ते:-(१) श्रवण (२) कीर्तन (३) स्मरण (४) पादसेवन (५) अर्चन (६) वंदन (७) दास्य (८) सख्य व (९) आत्मनिवेदन.

जैन व वैदिक धर्मांतील या भक्तीच्या प्रकारची तुलना केल्यास केवळ नाममात्र भेद दिसतो.

## सात गुण कोणते ?

**श्रद्धातुष्टिर्भक्तिर्विज्ञानमलुब्धता क्षमा सत्यम् ।**
**यस्यैते सप्तगुणास्तं दातारं प्रशंसन्ति ॥ १ ॥**

**अर्थः**—(१) श्रद्धा (२) संतोष (३) भक्ति (४) ज्ञान (५) निर्लोभ (६) क्षमा (७) सत्य असे हे सात गुण आहेत. ह्या सातही गुणांनीं युक्त आहारदान देणारा श्रावक स्तुतीस पात्र आहे. या सात गुणांपैकीं चौथा गुण ज्ञान आहे. ज्ञान ह्मणजे विधीपूर्वक-विधी समजून घेऊन आहारदान देणें. केवळ अंधश्रद्धा व कवाईत असूं नये.

## पंचसूना-पांच पातकें कोणतीं?

**खंडणी पेषणी चुल्ली उदकुम्भः प्रमार्जनी।**
**पंचसूना गृहस्थस्य तेन मोक्षं न गच्छति ॥ १ ॥**

**अर्थः**—खंडणी-कुटणें (२) पेषणी-दळणें (३) चुल्ली-चूल पेटविणें (४) उदकुंभ-पाणी भरणें व (५) प्रमार्जन-झाडणें. अशीं पांच प्रकारचीं पातकें गृहस्थी लोकांकडून घडतात व त्यामुळें तो मोक्षाला जात नाहीं. सारांश या पांच कृत्यांत हिंसा घडते व हिंसेमुळें घडणाऱ्या पातकामुळें त्याला मोक्षप्राप्ति होत नाहीं.

श्लोक नं. ११३ चा सारांश—वर सांगितलेलीं पातकें ज्यांच्याकडून घडत नाहींत व जे आरंभ—द्रव्योपार्जनाचें साधन-रहित आहेत—अशा सम्यक्त्वधारी ( आर्य ) मुनींना सात गुण व नऊ प्रकारची भक्ति यांनीं सहित होऊन श्रावकांनीं चतुर्विध दान द्यावें.

आहार-शुद्धाहार असावा. तो आहार मन, वचन व काया शुद्ध ठेवून द्यावा. इत्यादि चर्चा वर केली आहे. अन्न तयार करणारा व तें दान म्हणून देणारा, याचें कुल काय असावें? तो विवाहित असावा कीं अविवाहित असावा; तो विधुर असावा कीं नसावा ? तो पुनर्विवाहित आहे कीं नाहीं ? त्याचा धंदा काय आहे, इत्यादि इत्यादि चौकशी करणें; धर्मविहित आहे कीं नाहीं, याचा विचार वाचकांनीं करावा. (पुढील श्लोकाखालील विचार पहावेत. )

या विषयाचा अधिक विचार करण्यापूर्वी हिंदुधर्मात या पूर्वीच्या सर्वच आचारांना कसें एकत्र महत्व दिलें आहे, याची ओळख करून घेणें उचित आहे.

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**दानं दया दमःशान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥**

**भावार्थः**—(१) अहिंसा (२) सत्य (३) अस्तेय (४) शौच (५) इंद्रियनिग्रह-कामक्रोधादिकांच्या आधीन न होणें, (६) अव्यभिचार, (७) दान (८) दया (९) दम व (१०) शान्ति, हे दशधर्म होत, असें याज्ञवल्क्यांचें मत आहे. श्रावकाचारांतील आधाराशीं याज्ञवल्क्यप्रणित दशधर्मांची स्थूल मानानें

तुलना केल्यास श्रावकाचारांतील परिग्रहपरिमाण या व्रताचा वरील दशधर्मांत समावेश झालेला नाहीं, असें फार तर ह्मणतां येईल. मात्र याज्ञवल्क्य आचारांतील 'शौच' शब्द हा व्यापक आहे. श्रावकाचारांत परिग्रहाला मर्यादा घालावी, अशी अनुज्ञा आहे. 'शौच' या शब्दांत शरीरशुद्धी, अन्नशुद्धि व वस्त्रशुद्धि इत्यादिकांचाच समावेश होत नसून त्यांत अर्थशुद्धिचा प्रामुख्यानें समावेश केला जातो. संपत्ति-परिग्रह-यांचा संग्रह सन्मार्गानेंच करावा, असें ह्मटलें आहे. यामुळें वरील दशधर्मांत जरी परिग्रहपरिमाण या श्रावकाचारांतील निर्बंधाचा प्रत्यक्ष समावेश झाला नसला तरी पर्यायानें त्याचा समावेश केला गेला आहे, असेंच ह्मणणें युक्त होईल.

## दानाचें फल.

**गृहकर्मणापि निचितं कर्म विमार्ष्टि खलु गृहविमुक्तानाम् ।**
**अतिथीनां प्रतिपूजा रुधिरमलं धावते वारि ॥ ११४ ॥**

**अन्वयार्थः**—('यथा') जसें (वारि) पाणी (अलं) निश्चयानें (रुधिरं) रक्ताला (धावते) धुवून टाकतें ('तथा') तसें (गृहविमुक्तानां) घरानें रहित अशा (अतिथीनां) अतिथींची (प्रतिपूजा) पूजा (खलु) निश्चयानें (गृहकर्मणा) घरांतील आरंभादि कार्यांच्या योगानें (निचितं अपि) संचित केलेलें (कर्म) पाप (विमार्ष्टि) नष्ट करतें.

**अर्थः**—गृहस्थी लोकांना द्रव्योपार्जनादिकासाठीं व जीवन मरणादिकाचा झगडा चालवित असतां, कराव्या लागणाऱ्या कृत्यामुळें सतत पाप घडत असतें. उदाहरणार्थ—दळणें, कांडणें व चूल पेटविणें इत्यादि कृत्यें करावीं लागणारच. व्यापार व शेती करतांनाहि अनेक पातकें घडतात. अशा या सर्व कृत्यामुळें पातकांचा सांठा सतत वाढतच जाणार. अर्थात ह्या कमी करण्याचे मार्ग व उपाय असणें जरूर आहे. आचार्यांनीं या श्लोकांत वरील पापांना रक्ताची व चतुर्विध दानाला पाण्याची उपमा दिली आहे. अंगावर अगर कपड्यावर पडलेलें रक्त जसें पाण्यामुळें साफ धुतलें जातें, त्याचप्रमाणें गृहस्थाश्रमांत अस-

त्यामुळें जीं अनेक पातकें घडतात, तीं धुवून काढण्यास-तीं नष्ट करण्यास-चतुर्विध दान समर्थ आहे. चतुर्विध दानामुळें गृहस्थाश्रमांतील सर्व पातकें नाहींशीं होतात. आमंत्रणाचा स्वीकार न करितां यदृच्छेनें जाणारे ते अतिथी.

गृहस्थाश्रमांतील पापांचें परिमार्जन करण्याचे दुसरे मार्ग नाहींत असें नाहीं; परंतु चतुर्विध दानाचा मार्ग सर्वांना साध्य असा असल्यानें पाप नष्ट करण्यास समर्थ ह्मणून चतुर्विध दानाचें महत्व विशेष मानिलें आहे. यथाशक्ति दान करणें हें प्रत्येकाच्या स्वाधीनचें आहे.

## चतुर्विध दानाविषयीं थोडासा अधिक विचार.

आचार्य अमितगति यांनीं आपल्या श्रावकाचाराच्या नवव्या अध्यायांत चतुर्विध दानाच्या महत्वासंबंधीं व त्या दानामुळें मिळणाऱ्या फळा—पुण्या—संबंधी अधिक विस्तारपूर्वक विवेचन केलें आहे. तसेंच दान देण्याची तीव्र इच्छा असतांहि, दान देण्याचा प्रत्यक्ष योग जमून आला नाहीं, तरी केवळ भावनेच्या-हेतूच्या, मनाच्या-शुद्धीमुळें-प्रत्यक्ष दान दिल्याइतकेंच श्रेय मिळतें. पुण्यलाभ होतो व पातकें नष्ट होतात असें प्रतिपादन केलें आहे. दूर ठिकाणीं मुनि असल्यामुळें त्यांना आहार देणें अनेकांना शक्य होत नाहीं. तसेंच शेजारीं मुनि असतांहि अनेक कारणामुळें आहारदान देण्याचा योगायोग जमून येत नाहीं. अशा अडचणींत असलेल्या गृहस्थी लोकांचें पापक्षालन होण्याचा मार्गच बंद झाला काय ? आचार्य अमितगतींच्या मताप्रमाणें पापक्षालनाचे मार्ग बंद होत नाहींत; हें वाचून अनेकांना खास आनंद होईल. यासाठीं आचार्य अमितगतिंच्या श्रावकाचारांतील कांहीं श्लोक या खालीं देऊन आचार्यांच्या विचार सरणीची ओळख वाचकांना करून देण्याचा प्रयत्न केला आहे.

## निराश होण्याचें वा दुःख मानण्याचें कारण नाहीं.

अमितगति-श्रावकाचार-अध्याय ९ वा श्लोक ३० वा.

**यः सर्वदा क्षुधां धृत्वा साधुवेलां प्रतीक्षते ।**
**सः साधूनामलाभेऽपि दानपुण्येन पूज्यते ॥ ३० ॥**

**अर्थः**—आपल्या स्वतःच्या भुकेच्या व तहानेच्या बाधेकडे न पाहतां व भूक व तहान यांची बाधा-त्रास-सहन करून साधुजनांना आहार देण्याच्या तयारींत जो राहतो व साधुजनांचा आहार झाल्याचें कळल्यावर जेवण करितो, त्याला प्रत्यक्ष आहारदान दिल्याचें पुण्य मिळतें.

मुनींना आहार देण्याची तीव्र इच्छा आहे; परंतु या, ना त्या कारणा-मुळें आहारदान प्रत्यक्ष देण्याचा योग जमून येत नाहीं; आहारदान देणें त्याला शक्य होत नाहीं. परंतु तो केवळ मुनींच्या आहाराची वेळ टळेपर्यंत जेवणखाण करीत नाहीं; अगर मुनींचा आहार झाल्याची बातमी कळल्यानंतर जेवणखाण करितो, त्याला आहारदान न देतांहि आहारदान दिल्याचें श्रेय मिळतें.

श्लोक ३१ मध्यें आचार्य अमितगति लिहितात कीं,

**भवने नगरे ग्रामे कानने दिवसे निशि ।**
**यो धत्ते योगिनश्चित्ते दत्तं तेभ्योऽमुना ध्रुवम् ॥**

**अर्थः**—जो कोणी घरीं असो, शहरांत असो, खेड्यांत असो, अरण्यांत असो, कोठेंहि असो-जो दिवसा व रात्रीं मुनीश्वरांबद्दल मनानें आदर राखितो त्यांचें स्मरण करितो, त्याला आहारदान दिल्याचें श्रेय मिळतें. असें श्रेय कां मिळावें ? भक्तीचा हा महिमा आहे. मनोभावनाशुद्धिचा हा प्रभाव आहे. मनानें व भक्तिपूर्वक मुनींचें स्मरण करणाऱ्यांच्या मनःचक्षुपुढें मुनी सदेह जरी दिसले नाहींत; तरी मुनींचें चित्र त्याच्या डोळयापुढें उभें असतें. साक्षांत नमस्काराचा योग नसला तरी डोळयापुढें उभे राहिलेल्या चित्राला नमस्कार केल्यानें मुनींना नमस्कार केल्याचा पुण्यलाभ त्यास मिळतो.

पुढील श्लोकांत याहि पुढें जाऊन आचार्य लिहितात कीं,

**यः सामान्येन साधूनां दानं दातुं प्रवर्तते ।**
**त्रिकालगोचरास्तेन योगिनो भोजिताः स्तुताः ॥ ३२ ॥**

**अर्थः**—मुनीजनांना दान देण्यांत ज्याला आनंद वाटतो, हर्ष वाटतो व दान देण्याकडे ज्याच्या मनाची प्रवृत्ति वाहते, त्यांना केवळ विवक्षित

मुनीनांच आहार दिल्याचें फल मिळतें असें नाहीं, तर सर्व विद्यमान मुनीसंघा-नांच आहारदान दिल्याचें फल मिळतें असेंहि नाहीं तर भूत, वर्तमान व भविष्य काळांतील सर्व मुनींना दान दिल्याचें व त्यांची स्तुति केल्याचें श्रेय मिळतें.

आपल्या येथें आहारदानाचा योग जमून आला नाहीं म्हणून दुःख मानणारे अनेक आहेत. आपल्या गांवीं मुनी आले नाहींत व त्यामुळें आप-ल्याला आहार देण्याचें भाग्य लाभत नाहीं म्हणून कष्टी होणारे अनेक आहेत, लांबच्या ठिकाणीं मुनी आहेत व त्यामुळें त्यांचें दर्शन घडत नाहीं म्हणून आपल्या नशिबाला दोष देणारे थोडथोडके नाहींत. अशा रितीनें दुःख मानून आपल्या नशिबाला दोष देणाऱ्यांनीं, आचार्य अमितगतींनीं प्रदर्शित केलेले विचार व त्या विचारांतील तत्व लक्षांत घेतल्यास स्वतःला अगर मुनीना दोष देण्याचें कारण नाहीं. तीव्र इच्छा आहे, मुनीजनांना दान देण्यांत आनंद वाटत आहे, त्यांचें दर्शन घडावें असें अंतःकरणपूर्वक वाटतें. परंतु तो योग प्रत्यक्ष जमून न आला तरी प्रत्यक्ष योगाचीं सर्व फलें मिळतात. याला कारण तीव्र व प्रबल इच्छा व त्यामुळें मनांत उत्पन्न होणारी सद्भावना हीं होत. दान कोणी द्यावें; कोणास द्यावें व दान देतांना दात्याच्या मनाची भावना काय असावी याबद्दल शक्य तो खुलासा वर केला आहे. आहारदान घेतांना हल्लीं मुनीजन ज्या अनेक बाबतींत चौकशी करतात व दाता योग्य वा अयोग्य हें ठरवितात, तशा प्रकारच्या चौकशीला व निर्णयाला धर्माधार श्रीसमंतभद्रा-चार्य व आचार्य अमितगति, पद्मनंदी व पं. आशाधर यांच्या श्रावकाचारांत तरी आढळ झाला नाहीं. हा वाद उकरून काढण्याचें हें स्थल नव्हे. तथापि पुराणांतरीचीं दोन उदाहरणें देऊन वस्तुस्थिती वाचकांपुढें मांडणें हें कर्तव्य आहे.

## दोन उद्बोधक उदाहरणें.

(१) मधु नांवाचा राजा होऊन गेला. त्या राजाचे कांहीं मांडलिक राजे होते. त्यापैकीं एका मांडलिक राजाच्या बायकोला मधुराजानें बलात्कारानें आणून आपल्या राजवाड्यांत ठेविली व तिच्याशीं विषयभोग घेत राहिला. हे दोघे

मुनींना आहारदान देत असत. शेवटीं या दोघांनीं मुनीदीक्षा घेतली व मरणोत्तर अच्युत स्वर्गांत दोघांचा जन्म झाला.

(२) सुमुख नांवचा राजा होऊन गेला. वीरक नांवचा एक शेट त्याच्या राज्यांत राहत होता. वनमाला नांवची या शेटजीची बायको. वनमालेला सुमुख राजानें राजवाड्यांत नेऊन ठेवून तिच्याशीं कामभोग घेऊं लागला. कामभोग घेत असतां एक विशुद्धज्ञानी मुनी आहारासाठीं राजवाड्यांत गेले. राजा सुमुख व वनमाला यांच्या अनैतिक संबधाचें ज्ञान या मुनींना होतें. तरी या उभयतांचा आहार मुनीनीं घेतला. विजेच्या अपघातानें ते दोघे मरण पावले व विद्याधर व विद्याधरी झाले. अशा व्यभिचारी लोकांनीं आहारदान देऊन पुण्यसंचय केला व मरणोत्तर या पुण्याचें फळ त्यांना मिळालें.

राजा सुमुख व वनमाला यांचा मुलगा 'हरि' हा हरिवंशाचा आद्य पुरुष. हरिवंशाचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं जात आहेत ऽऽ

कार्तिकेय स्वामीची जन्मकथा सर्वश्रुतच आहे. वाडवडिलांच्या दोषाबद्दल त्यांच्या वंशजाला दोषी ठरविणें व्यवहार व धर्मशास्त्र यांना कदापि मान्य होणार नाहीं. पतितांना पावन करणारा जैनधर्म आहे. पतित म्हणून त्याला आजन्म बहिष्कृत करणारा धर्म जैनधर्म नाहीं. प्रायश्चित्त व अंतःशुद्धि हे पावन करण्याचे उपाय आहेत. वर जे पुराणांतरींचे दाखले दिले आहेत, त्यावरून जैनधर्मीय योग्य तो बोध घेतीलच.

### इतराइतकें व इतरासारखें दान देतां येत नाहीं; म्हणून खेद व दुःख मानण्याचें कारण नाहीं, कां ?

आचार्य अमितगति लिहितात कीं:—

**कालं पात्रं संधिं ज्ञात्वा दत्तं स्वल्पमपि स्फुटम् ।**
**उप्तं बीजमिव प्राज्ञैर्विधत्ते विपुलं फलम् ॥ ३८ ॥**

**अर्थः**—इतराइतकें व इतरासारखें दान देतां आलें नाहीं म्हणून खेद मानण्याचें कारण नाहीं. कारण काल, पात्रापात्रता व विधी हें समजून घेऊन योग्यप्रकारें थोडेसें दान देणाऱ्यांनाहि इतरांच्या मोठ्या दानाइतकें संपूर्ण फल मिळतें.

वटवृक्षाचें बीं मुळांत अगदींच लहान असतें. परंतु योग्य काळीं तें जमिनींत पडलें ह्मणजे अशा बीजापासून १०००।१५०० बीं-फल-फळतें. तद्वतच विधीपूर्वक अल्पस्वल्प जरी दान दिलें तर त्याचें फल वटवृक्षाप्रमाणें प्रचंड प्रमाणांत मिळतें. यासाठींच इतरासारखें मोठ्या प्रमाणावर दान करितां येत नाहीं, ह्मणून दुःख मानण्याचें व खेद करण्याचें मुळींच कारण नाहीं.

श्लोक संख्या ११६ मध्यें हीच विचारसरणी दिसते. दानाचें महत्व यापूर्वी दिलें आहे. मात्र एका महत्वाच्या गोष्टीचें विस्मरण होऊं देऊं नये. दानामुळें पुण्यप्राप्ति होते हें खरें; परंतु हा पुण्यलाभ संसारचक्रांत घालण्यास कारणीभूत होतो. दानाप्रमाणेंच जप, तप, व्रत व शील वगैरेमुळें पुण्यबंध होतो; परंतु त्यामुळें कर्मक्षय होत नाहीं. पापबंधामुळेंहि संसारचक्रांत व जन्मजरादिकांच्या फेऱ्यांत सांपडावें लागतें. या दृष्टीनें विचार करतां पुण्यबंध व पापबंध हें सारखेच आहेत. या दोन्हीमुळें संसाराची बेडी सुटत नाहीं. फरक इतकाच कीं एक लोखंडाची तर दुसरी सोन्याची. मग करावें काय ? पाप व पुण्य या दोहोंबद्दल ममता सोडावी व आपल्या आत्म्याबद्दल विचार करावा. तो परमात्मपदाला कसा पोहोंचेल याचा ध्यास धरावा.

## दानाची दुसरी दृष्टि.

नांव लौकिकासाठीं, इह व पारलौकिक सुखाच्या आशेनें दान देण्यांत **स्वार्थ** आहे ह्मणून अशा हेतूनें दान देऊं नये. गुप्तदानाचें महत्व तर यासाठींच. आपल्या संपत्तीचा सत्कार्यी विनियोग झाला. त्यामुळें आपला परिग्रह कमी झाला. इतराजवळ जें नाहीं तें त्यांना दिल्यानें त्यांना सौख्य झालें. ज्ञान व धर्मप्रसारार्थ संपत्तीचा विनियोग झाल्यानें ती संपत्ति मिळवितांना झालेल्या पातकांचा परिहार होतो. परिग्रह प्रमाण करून त्याप्रमाणापेक्षां अधिक मिळालेली संपत्ती धर्मकार्यास लावणें ही गोष्ट सामान्य आहे, असें नाहीं. परंतु त्याहिपेक्षां अनन्य सामान्य गोष्ट ह्मणजे या प्रमाणातील संपत्तीचाहि धर्मकार्यी व्यय करणें यांत आहे.

### दानांतील रूढि.

चतुर्विध दान करावें अशी धर्माज्ञा; परंतु नित्य व्यवहारांत मात्र या धर्माज्ञेकडे कळत वा न कळत दुर्लक्षच होत आहे. आहारदानाची व्याप्ति मुनीजनापुरतीच दिसते. औषधदान फारच थोड्याकडून घडतें. इतर दोन दानाकडे तर प्रायः दुर्लक्षच !! असें का ? याचें उत्तर एकच व तें हें कीं रूढि.

### नवधा भक्तीचें फळ.

**उच्चैर्गोत्रं प्रणतेर्भोगो दानादुपासनात्पूजा ।**
**भक्तेः सुन्दररूपं स्तवनात्कीर्तिस्तपोनिधिषु ॥ ११५ ॥**

**अन्वयार्थः**—(तपोनिधिषु) तपस्वी मुनींना (प्रणतेः) नमस्कार करण्यानें (उच्चैर्गोत्रं) उच्च गोत्र (दानात्) दान देण्यानें (भोगः) भोग (उपासनात्) पूजा करण्यानें (पूजा) पूज्यपणा (भक्तेः) भक्तिपासून (सुंदररूपं) सुंदर रूप आणि ( स्तवनात् ) स्तुति करण्यानें (कीर्तिः) कीर्ति ( भवति ) होते.

**अर्थः**—मुनीजनांना नमस्कार केल्यानें उच्चकुल, इंद्रत्वादि उच्चगोत्र, यांची प्राप्ति होते; दान दिल्यानें भोगोपभोगाचीं साधनें मिळतात; उपासना—सेवा केली ह्मणजे प्रतिष्ठा मिळते; भक्ति केल्यानें सुंदररूपप्राप्ति होते व त्यांची स्तुति केल्यानें यश व कीर्तीचा लाभ होतो. मुनीजनांची आपण स्तुति केली तर जनता आपली स्तुति करते. नवधा भक्तीचे हे परिणाम होत. या व अशा प्रकारच्या सुफलाला उद्देशूनच यांना सोन्याची बेडी असें ह्मटलें आहे.

### अल्पदानाचें फळ.

**क्षितिगतमिव वटबीजं पात्रगतं दानमल्पमपि काले ।**
**फलति च्छायाविभवं बहुफलमिष्टं शरीरभृताम् ॥ ११६ ॥**

**अन्वयार्थः**—( शरीरभृतां ) जीवांना ( पात्रगतं ) पात्राला दिलेलें ( अल्पं अपि दानं ) थोडें देखील दान ( काले ) योग्यवेळीं ( क्षितिगतं ) जमिनींत टाकलेल्या (वटबीजं) वडाच्या बीजाच्या (छाया विभवं इव) छायेच्या वैभवाप्रमाणें ( इष्टं ) मनोवाञ्छित ( बहुफलं ) पुष्कळ फळाला (फलति) देते.

**अर्थ:**—योग्यकाली व विधीपूर्वक मुनि-अर्जिका वगैरे सत्पात्राला अल्पसें असें जरी दान दिलें तरी त्याचें फल मोठें मिळतें. योग्यकाळीं वडाचें लहानसें बीं जमिनींत टाकलें तरी त्याचा प्रचंड वृक्ष बनतो व अनेकांना शीतल छाया देऊन संतुष्ट करितो. योग्यकाळीं व विधीपूर्वक अल्पसें दानही वट-वृक्षाप्रमाणें फलदायी होतें. यासंबंधीं आचार्य अमितगति यांचें मत यापूर्वीच दिलें आहे. पात्राचे तीन भेद आहेत. (१) उत्तम पात्र उदाहरणार्थ—मुनी, (२) मध्यम पात्र-श्रावक व (३) जघन्यपात्र-अविरत सम्यग्दृष्टी; या तीन्ही तऱ्हेच्या लोकांना चतुर्विध दान द्यावें.

पंडित आशाधर यांनीं वरील पात्रापात्रतेचा विचार करितां "जैन" यास अजैनांपेक्षां अग्रतेचा मान देऊन सद्गुणी अजैनांपेक्षां केवळ जैन ह्मणविणारा हजार पटीनीं अधिक पात्र आहे, असें मानिलें आहे. ही विचारसरणी पटण्यासारखी नाहीं. जात्यंधता व धर्मांधता, यांचा यांत वास येतो.

## दानाचे भेद-प्रकार.

**आहारौषधयोरप्युपकरणावासयोश्च दानेन ।**
**वैयावृत्यं ब्रुवते चतुरात्मत्वेन चतुरस्राः ॥ ११७ ॥**

**अन्वयार्थ:**-(चतुरस्राः) पंडित लोक (आहारौषधयोः) आहार, औषध (अपि) आणि (उपकरणावासयोः) उपकरण व स्थान यांच्या (दानेन) दानानें (चतुरात्मत्वेन) चार प्रकारचें (वैयावृत्यं) वैयावृत्य आहे असें (ब्रुवते) सांगतात.

**अर्थ:**—वैयावृत्य-दान-चार प्रकारचें आहे (१) आहारदान-सत्पात्राला विधीपूर्वक आहारदान करणें (२) औषधदान-रोगी लोकांना औषधोपचार करणें (३) ज्ञानदान-शास्त्र देणें व शास्त्र शिकवणें इत्यादि (४) अभयदान-जीवांचें संरक्षण करणें, राहण्यासाठीं जागा देणें इत्यादि.

## दानशूरांची नामावली.

**श्रीषेणवृषभसेने कौण्डेशःशूकरश्च दृष्टान्ताः ।**
**वैयावृत्यस्यैते चतुर्विकल्पस्य मन्तव्याः ॥ ११८ ॥**

**अन्वयार्थः**—( श्रीषेणवृषभसेने ) श्रीषेणराजा, वृषभसेना ( कौण्डेशः ) कौण्डेश ( च ) आणि ( शूकरः ) डुक्कर ( एते ) हे ( चतुर्विकल्पस्य ) चार प्रकारच्या (वैयावृत्यस्य) वैयावृत्याचे (दृष्टान्ताः) दृष्टान्त (मन्तव्याः) मानावेत.

**अर्थः**—आहारदानामुळें राजा श्रीषेण, औषध दानामुळें वृषभसेन, ज्ञानदानामुळें कौंडेश कोतवाल, मुनींना आश्रयासाठीं जागा दिल्यामुळें एक डुक्कर, असे प्रसिद्धीस आले आहेत.

तत्वार्थसूत्रांतील सातव्या अध्ययांत श्री उमास्वामींनीं दानासंबंधीं जे विचार प्रदर्शित केले आहेत, त्यांची ओळख वाचकांना करून देण्याच्या उद्देशानें पुढील प्रयत्न केला आहे.

## दानाचें लक्षण.

**अनुग्रहार्थं स्वस्यातिसर्गो दानम् ॥३८॥**

**भावार्थः**—आपल्या स्वतःवर व इतरावर उपकार करण्यासाठीं धनादिकांचा त्याग करणें, याला दान ह्मणतात. धनादिकांचा त्याग करण्यानें स्वतःवर उपकार कसा ? उपकार असा कीं, त्यामुळें पुण्यलाभ होतो. दुसऱ्यावर उपकार असा होतो कीं, ज्याला दान दिलें, जातें त्याच्या सम्यग्ज्ञानादि गुणांची वृद्धी होण्यास मदत होते.

## दानामध्यें विशेषता.

**विधीद्रव्यदातृपात्रविशेषात्तद्विशेषः ॥३९॥**

**भावार्थः**—(१) विधीविशेष (२) द्रव्यविशेष (३) दातृविशेष व (४) पात्र विशेष, या चार प्रकारच्या वैशिष्ट्यामुळें दानाची विशेषता दिसून येते.

**(१) विधीविशेषः**—नवधाभक्तिच्या क्रमामुळें येणारें वैशिष्ट्य.

**(२) द्रव्यविशेषः**—स्वाध्याय व तपादिकांच्या वृद्धिसाठीं दिलेलें आहारदान.

**(३) दातृविशेषः**—श्रद्धादि सात गुणांनीं युक्त अशा दात्याकडून झालेलें दान.

**(४) पात्रविशेषः**—सम्यक्चारित्रादि गुणांनीं युक्त असलेल्या मुनींना दिलेलें दान.

आहार, अभय, औषध व विद्या यासाठीं दिलेल्या दानांत वरील चार प्रकारचें वैशिष्ट्य येतें. निर्ग्रंथ मुनींना आहारदान देण्याचा लाभ मिळाला तर

पात्रविशेषामुळें त्या दानाला वैशिष्ट्य येतें. निर्ग्रंथ मुनींना आहारदान देण्याचें भाग्य लाभलें; परंतु दान देणाऱ्याच्या अंगीं श्रद्धादि सर्व सात गुण नाहींत, तर दानांत दातृत्व-विशेषता येणार नाहीं. निर्ग्रंथ मुनींना व श्रद्धादि गुणांनीं युक्त असलेल्या दात्यानें दान दिलें तर वैशिष्ट्य आहे. व त्याहिंपक्षां अधिक वैशिष्ट्य येण्यास नवधा भक्ति व सात गुणांनीं युक्त असलेला दाता व निर्ग्रंथ मुनी अशा त्रिवेणी संगम जमून यावा लागतो.

## थोडासा अधिक विचार.

जैनधर्माप्रमाणेंच वैदिक धर्मांतहि चार प्रकारचींच दानें सांगितलीं आहेत. याशिवाय कन्यादान, गोदान वगैरे अनेक दानें सांगितलीं आहेत. न्यायदान हा शब्द नित्याच्या व्यवहारांतील असला तरी आजच्या परिस्थितींत सार्थ नाहीं. ज्यावेळीं न्याय मोफत मिळत असे त्याकाळीं न्यायदान हा शब्द सार्थ होता.

निढळाच्या-घामाचा-पैसा आहे, हें नेहमीं आपण ह्मणतो व ऐकितों. याचा अर्थ असा कीं, पैसा मिळवण्यास अत्यंत श्रम करावे लागतात; परंतु त्याहिपेक्षां अधिक कष्ट त्याचें संरक्षण व सत्पात्रीं दान देण्यांत घेणें जरूर आहे. दान, भोग व नाश अशा संपत्तीच्या तीन अवस्था आहेत. भोगांत नाश नाहीं-दान हा एकप्रकारचा भोग आहे. दान देतांना झालेला आनंद ह्मणजे एक-प्रकारें भोग आहे. भोगांतहि आनंदच असतो.

दानप्रथा ही समाजाच्या उन्नतीची एक आदर्श संस्था आहे. जैनसमाजांतील धनिकांनीं संपत्तीचें दान करून अनेक उपयुक्त संस्था चालविल्या आहेत व त्या संस्था समाज व धर्मधारणा करीत आहेत. जैनधर्मीय उदार धनिकांच्या दानाचें प्रस्तुतचें लिखाण व लेखक हें अल्पसें फळ आहे.

हिंदुशास्त्रांत दान व त्याचीं फळें यासंबंधींच्या उल्लेखाकडे पाहिल्यास त्या शास्त्रांना शास्त्र तरी कसें ह्मणावें, याची शंका आल्यावांचून राहत नाहीं. ह्मातारपण-जरा-प्राप्त होऊं नये ह्मणून जिऱ्याचें, धनलाभ व्हावा ह्मणून गुळाचें

व कांति मिळावी ह्मणून हरभऱ्याच्या डाळीचें दान अशीं दानें द्यावींत, असें सांगितलें आहे. ब्राह्मणाला विडा देण्यानें जन्मतः मिळालेलें रूप बदलणार कसें?

याशिवाय व्रताच्या उद्यापनाच्या अखेरीस दान देण्याची प्रथा आहे. या दानांतील हास्यास्पद प्रकार बंद होणें जरूर आहे.

## अर्हंताची पूजा करण्याचा उपदेश.

**देवाधिदेवचरणे परिचरणं सर्वदुःखनिर्हरणम् ।**
**कामदुहि कामदाहिनि परिचिनुयादादृतो नित्यम् ।११९।**

**अन्वयार्थः**—( कामदुहि ) इच्छा तृप्त करणाऱ्या ( देवाधिदेवचरणे ) देवांचे अधिदेव अर्थात् अरहंत भगवंताच्या चरणाची ( सर्वदुःखनिर्हरणम् ) सर्व दुःखांचा नाश करणारी ( परिचरणं ) पूजा ( नित्यं ) नेहमीं ( आदृतः ) आदरपूर्वक ( परिचिनुयात् ) करावी.

**अर्थः**— संपूर्ण इच्छा व आकांक्षा यांची पूर्तता करणारे व कामवासनेला भस्म करणारे भगवंताचे चरण आहेत. सर्व प्रकारच्या दुःखांचा नाश भगवानांची पूजा केल्यानें होतो. ह्मणून भगवंताची पूजा नित्य करावी.

भगवंतांच्या पूजेमुळें सर्व इच्छा तृप्त होतात व दुःखें नाहींशीं होतात. असें या श्लोकांत ह्मटलें आहे. धनदौलत व मानसन्मान इत्यादिकांच्या प्राप्तीचें पूजा हें आमिष आहे? ती लांच आहे? असें वाटण्याचा संभव आहे. धनधान्य, संतति, संपत्ति इत्यादिकांचा लाभ व्हावा या आशेनें, हेतूनें व भावनेनें जिनपूजा करूं नये. इच्छा, मग ती चांगली वा वाईट असो, इच्छा धरून पूजा करणें धर्मसंमत नाहीं. फळांची आशा न धरतां निष्काम कार्य करावें. त्या कार्याचीं फळें सावलीप्रमाणें आपल्या पाठीमागें धांवत येतील. मोहामुळें मोक्षप्राप्तीचाहि अभिलाष धरला तरी मोक्षापासून तो दूरच जातो.

**मोक्षेऽपि मोहादभिलाषदोषो विशेषतो मोक्षनिषेधकारी ।**
**यतस्ततोऽध्यात्मरतो मुमुक्षुर्भवे किमन्यत्र कृताभिलाषः ॥ ३ ॥**

**अर्थः**—"मोहामुळे मोक्षाविषयींहि जरी एखाद्यास अभिलाष उत्पन्न झाला तर निश्चयानें तो अभिलाषी जीव मोक्षापासून भ्रष्ट होतो, ह्मणून मुमुक्षु-

मोक्ष इच्छिणाऱ्यांना-जीवानें निरंतर अध्यात्मरत असावें. दुसऱ्या कशाचाहि अभिलाष करणें बरें नाहीं.'' ( पहा, सागारधर्मामृत पान २२० ).

अर्थात जो अध्यात्मरत राहतो तो निर्विकार व तटस्थ वृत्तीचा असतो. फलाविषयीं आशा न धरतां केवळ कर्तव्य ह्मणून धर्माचरण करितो.

## पूजामाहात्म्य व पूजापुण्याचें प्रसिद्ध भोक्ते.

**अर्हच्चरणसपर्यामहानुभावं महात्मनामवदत् ।**
**भेकः प्रमोदमत्तः कुसुमेनैकेन राजगृहे ॥ १२० ॥**

**अन्वयार्थः**— ( राजगृहे ) राजगृह नगरींत ( प्रमोदमत्तः ) आनंदानें मत्त झालेला ( भेकः ) बेडूक ( एकेन कुसुमेन ) एकाच फुलानें ( अर्हच्चरणसपर्यामहानुभावं) अर्हंताच्या चरणाच्या पूजेच्या महात्म्याला (महात्मनां) भव्य जीवांना ( अवदत् ) सांगता झाला.

**अर्थः**—भगवान महावीर स्वामींची पूजा करण्याकरितां एक बेडूक कमलाचें फूल तोंडांत धरून वैरागगिरीकडे जात असतां वाटेंत राजा श्रेणिक बसून चाललेल्या हत्तीच्या पायाखालीं सांपडून तो चिरडून मेला. परंतु भगवानाची पूजा करण्याची तीव्र इच्छा असतांना त्याला मरण आल्यानें तो स्वर्गांत देव होऊन जन्मास आला. अवधिज्ञानामुळें पूर्व जन्मींचें त्याला स्मरण झालें. आपण पूर्वी कोण होतो, हें त्याला कळलें. बेडूक चिन्हांकित मुकुट घालून तो—महावीर स्वामींच्या समवशरणांत तीर्थंकर प्रभूंच्या दर्शनासाठीं आला. राजा श्रेणिकानें गौतमगणधरांना याबद्दलचा वृत्तांत विचारला. गौतमगणधरांनीं त्याचा पूर्ववृत्तांत सांगून पूजेचें महत्त्व विशद करून सांगितलें. केवळ भावनेमुळें जर हें फल बेडकाला मिळालें; तर मग प्रत्यक्ष पूजा करणाऱ्याला कोणतें फळ मिळेल, याचा विचारच करावयास नको.

## वैयावृत्याचे अतिचार.

**हरितपिधाननिधाने ह्यनादरास्मरणमत्सरत्वानि ।**
**वैयावृत्यस्यैते व्यतिक्रमाः पंच कथ्यन्ते ॥ १२१ ॥**

**अन्वयार्थः**—(हरितपिधाननिधाने) दान द्यावयाची वस्तु हिरव्या पानानें झाकणें, हिरव्या पानावर ठेवणें, (अनादरास्मरणमत्सरत्वानि) अनादर करणें, दानाचा विधी विसरून जाणें व ईर्षाबुद्धीनें दान देणें, (एते पंच) हे पांच (वैयावृत्यस्य) वैयावृत्याचे (व्यतिक्रमाः) अतिचार (कथ्यन्ते) सांगितले गेले आहेत.

**अर्थः**—(१) दान देण्याची वस्तू हिरव्या-ओल्या-पानाने झाकणें, (२) दान देण्याची वस्तू हिरव्या-ओल्या-पानावर ठेवणें, (३) दान देतांना अनादर दाखविणें, (४) दानाचा विधी विसरून जाणें व (५) ईर्षाबुद्धीनें दान देणें, असे या व्रताचे पांच अतिचार आहेत.

दान देण्याची तीव्र इच्छा असतांहि दान देण्याचा योगायोग जमून न आला तरी प्रत्यक्ष दान दिल्याचें फळ का मिळतें? याबद्दल आचार्य अमितगतीचें मत यापूर्वीच दिलें आहे. या सर्व बाबतींत हेतूला व भावनेला प्राधान्य दिलें आहे. या संसाररूपी वनाचा नाश करण्यास अग्निसारखें समर्थ असे दानाचे चार मार्ग अगर उपाय आहेत. संसार करीत असतां पातकें हीं घडणारच; मग त्या पातकांचा नाश करण्यासाठीं संसाराचा त्याग करणेंच जरूर आहे काय? संसारांत राहूनही पातकांचा नाश करितां येतो. पापनाशक चतुरंग सेना म्हणजे (१) दान (२) पूजा (३) शील व (४) उपवास हे होत.

आचार्य अमितगति यांच्या श्रावकाचाराच्या नवव्या अध्यायांतील पहिला श्लोक खालीलप्रमाणें आहे:—

**दानं पूजा जिनैः शीलमुपवासश्चतुर्विधः ।**
**श्रावकाणां मतो धर्मः संसारारण्यपावकः ॥ १ ॥**

अरण्य जाळण्यास जसा अग्नि समर्थ आहे, तद्वतच संसारी जीवांच्या संसारांतील पातकांना जाळण्यास-नष्ट करण्यास-(१) दान (२) जिनपूजा (३) शील पालन व (४) उपवास हे चार उपाय समर्थ आहेत. आकाशांतील ढग हे आपलें ओझें कमी करण्यासाठीं जलवृष्टि करीत नाहींत. पृथ्वीवरील लोकांना आनंद व्हावा, त्यांना सुख व्हावें व भूतलावर अन्नादिअबाद व्हावी म्हणून ढग

पाऊस पाडतात, ही निष्काम सेवा आहे; निष्काम कर्म आहे. जलवृष्टी करण्यांत ढगांचा स्वार्थी हेतू नसतो. तद्वतच दान देण्यांत, पूजा करण्यांत, शील पाळण्यांत अगर उपवास करण्यांत इहपरलौकिक सुख, मानमरातब इत्यादि स्वार्थी हेतू नसावा.

---

# अध्याय सहावा.

## सल्लेखनेचें-समाधी मरणाचें-स्वरूप-लक्षण.

### मृत्यु-महोत्सव.

**उपसर्गे दुर्भिक्षे जरसि रुजायां च निष्प्रतीकारे ।**
**धर्माय तनुविमोचनमाहुः सल्लेखनामार्याः ॥१२२॥**

**अन्वयार्थ:**—(आर्याः) गणधरादि श्रेष्ठ पुरुष (निष्प्रतीकारे) ज्याचा प्रतिकार करतां येत नाहीं अशा (उपसर्गे) उपसर्गाचे वेळीं (दुर्भिक्षे) दुष्काळाचेवेळीं (जरसि) म्हातारपणामध्यें (च) आणि (रुजाया) रोग आला असतां (धर्माय) धर्मासाठीं (तनुविमोचनं) शरीर सोडणें यास (सल्लेखनां) सल्लेखना (आहुः) म्हणतात.

**अर्थः**—आपल्या आयुष्याच्या अंतसमयीं संन्यासपूर्वक मरण साधल्यानें तपाचें फळ मिळतें; यासाठीं शक्त्यनुसार समाधिमरण साधण्याचा प्रयत्न करावा. हें केव्हां ? तर जरी प्रतिकार केला तरी उपसर्ग टाळतां येण्यासारखा नाहीं, अशा उपसर्गाचा प्रसंग ओढवला असतां, दुष्काळामुळें पोटाला अन्न मिळत नाहीं व त्यामुळें मृत्यु टळत नाहीं अशावेळीं, वृद्धापकाळ झाल्यावेळीं वा मृत्यु समीप आला आहे असें वाटल्यावेळीं, रोग आला व त्यांतून बरा होण्याची सर्व आशा खुंटल्यावेळीं धर्म म्हणून व धर्माध्ययन करीत प्राण सोडणें, याला सल्लेखनाव्रत म्हणतात. या व्रतानंतरच्या मरणाला समाधिमरण असें म्हणतात.

### सल्लेखना म्हणजे आत्महत्या नव्हे.

आत्महत्या व समाधिमरण हीं परस्पर भिन्न आहेत. अज्ञानामुळें कित्येक समाधिमरणाला आत्महत्या समजतात. बॅ. चंपतरायजी जैन यांनीं

Householder's Dharma या पुस्तकांत पान ५८।५९ वर सल्लेखना समाधिमरणाबद्दल पुढील मननीय विचार व्यक्त केले आहेत. समाधिमरण हें आत्महत्येहून भिन्न मानिलें पाहिजे. धर्मकार्य करण्यास शरीर असमर्थ झालें व मरण टळत नाहीं व यमपाश चुकवितां येत नाहीं असें निश्चित वाटल्यावर सल्लेखनाव्रताच्या स्वीकारामुळें आत्म्याला धैर्य येतें. या व्रत स्वीकारामुळें आत्मा बलवान होतो. मरणाची भीति जीवाला राहत नाहीं. यामुळें पुनर्जन्म टाळतां येतो. सल्लेखनाव्रत स्वीकारामुळें जीव स्वतंत्र, संतुष्ट व आत्मध्यानीं होतो. तो स्वतःचें वैयक्तिक सुखदुःख विसरतो. स्वतःवरील त्याचें ममत्व सुटतें. मृत्यूला मारणाऱ्या व यमावर विजय मिळविणाऱ्या या व्रताच्या निश्चयाचा विलक्षण व अतर्क्य परिणाम मरणाच्या दारीं असलेल्यावर होतो.

क्षणार्धाचें उरलेलें-सुरलेलें आयुष्य जीव जगविण्यासाठीं व मरण टाळण्यासाठीं इतस्ततः भ्रमण करून व नाना खटपटींत उरलेला वेळ घालविणारा प्राणी व हंसतमुखानें, शांतचित्तानें व धर्मध्यानांत मग्न राहून मृत्यूला आदरानें आमंत्रण देणारा जीव यांत महत्वाचा फरक आहे. समाधिमरणानें उत्तमगति मिळते. तर आत्महत्येनें नरकवास घडतो.

देहावरील ममत्व, रागद्वेषादि षड्रिपूशीं वैरत्व, शत्रुमित्रांशीं समताभाव, अंतरंग व बहिरंग परिग्रहाचा त्याग, इत्यादिक सत्प्रवृत्तींचा अल्पकाळीं आश्रय करणाऱ्याला सद्गति मिळाली तर नवल काय ? आत्महत्येंत रागद्वेषादिकांचें पुरें प्राबल्य असतें. नको हा ससार म्हणून त्रागा असतो. संकटें, विटंबना व दुर्लौकिक टाळण्यासाठीं जीवत्याग, अर्थात धर्मासाठीं हा प्राणत्याग नव्हे. या दोहोंतील फरक अशींच अनेक कारणें देऊन स्पष्ट दाखवितां येईल. या दोन्हीमधील हेतूकडे न पाहिल्यानें कांहींना या दोहोंत फरक दिसला नाहीं. समाधिमरण साधणारा मृत्यूवर जय मिळवितो; आत्महत्या करणाऱ्यावर मृत्यू अकालींच विजय मिळवितो. ( श्लो. सं. १३५ खालील विवेचन पहावें )

## समाधिमरणाची आवश्यकता.

**अन्तःक्रियाधिकरणं तपःफलं सकलदर्शिनः स्तुवते।**
**तस्माद्यावद्विभवं समाधिमरणे प्रयतितव्यं ॥ १२३ ॥**

**अन्वयार्थः**—( अन्तक्रियाधिकरण ) मृत्यूसमयीच्या क्रियेला सुधारणें अर्थात संन्यास धारण करणें हेंच ( तपःफलं ) तपाचें फळ आहे. ( ' इति ' ) असे (सकलदर्शिनः) सर्वज्ञ देव (स्तुवते) सांगतात (तस्मात्) ह्मणून (यावद् विभवं) यथाशक्ति (समाधिमरणं) समाधि मरणासाठीं (प्रयतितव्यं) प्रयत्न करावा.

**अर्थः**—एखाद्याचा संसार चांगला झाला नाहीं, हें ठरविण्याची व्यवहारिक कसोटी ह्मणून त्याच्या संसाराचा शेवट गोड झाला कीं नाहीं हें पाहण्यांत येतें व त्यावरून संसार चांगला झाला कीं, वाईट झाला हें व्यवहारिक दृष्ट्या ठरविण्याचा प्रयत्न होतो. एखाद्याला मुलगे व्हावेत व त्याच्या वृद्धापकाळीं अगर त्याच्या आधीं ते मरण पावले तर त्याच्या संसाराचा शेवट गोड झाला नाहीं, असें समजलें जातें; तद्वतच जन्मभर तप व तपादिकांचे साधन केलें व मरणसमयीं त्यास समाधी-मरण साधता आलें नाही तर जन्मभर केलेलें जप व तपादिक, हें व्यर्थ आहेत; करितां मृत्यू समीप आल्यावेळीं समाधिमरण साधणें अत्यावश्यक आहे. तपश्चरणादिकांचे फळ आपल्या अखेरच्या क्रियेवर व भावनेवर अवलंबून असतें. यामुळें अखेर साधली नाहीं तर सर्वच व्यर्थ आहे. यासाठीं यथाशक्ति समाधिमरण साधण्याचा प्रयत्न अत्यावश्यक आहे.

## शरीराचा-देहाचा-उपयोग तो कोणता ?

परमात्मप्रकाश पान ४११।१२ वरील सारांशः—

मनुष्याचा हा देह जमिनीत पुरला तर त्यापासून दुर्गंधी उत्पन्न होते व जाळला तर त्याची राख होते. यामुळें या देहांत सार नाहीं. मृत हत्तीची हाडें व वनगाईचे केस उपयोगी पडतात. मनुष्याच्या शरीराचा मात्र कोणताहि उपयोग नाहीं. किडलेला ऊस खाण्यास व गाळण्यास योग्य नाहीं परंतु बीं ह्मणून त्याचा उपयोग केल्यास एका ऊसाचे शेकडो रसयुक्त ऊस निर्माण

होतात. किडलेल्या ऊसाप्रमाणें हा देह निरुपयोगी आहे; परंतु त्याला परलोक साधनाचें बी करून असार देहाला सार करितां येतें. मोक्षप्राप्तीचें साधन ह्मणजे हा मानवी देह आहे. निश्चयरत्नत्रयाचें साधक व्यवहार रत्नत्रय आहे. व्यवहार रत्नत्रयांच्या बलावर-जोरावर-स्वर्गप्राप्ती व निश्चयरत्नत्रयांच्या जोरावर मोक्ष-प्राप्ती करून घेतां येते. यामुळें हा मनुष्यदेह सार ही आहे व असार ही आहे. त्याच्या चांगल्या व वाईट उपयोगामुळें तो सार व असार ठरतो. त्याच्यावर ममत्व ठेविलें कीं, असार व त्यावरील ममत्व सांडिलें कीं तो सार ठरतो.

सल्लेखना-समाधिमरणाच्यावेळीं शरिरावरील ममत्व सोडावयाचें असतें. ममत्व सुटल्यानें तें शरीर-हा देह परलोक सुखाचें साधन होतें; ह्मणूनच या व्रताचें वैशिष्ठ्य वर्णिलें आहे.

## सल्लेखनाचा-समाधिमरणाचा-विधी.

**स्नेहं वैरं संगं परिग्रहं चापहाय शुद्धमनाः ।**
**स्वजनं परिजनमपि च क्षान्त्वा क्षमयेत्प्रियैर्वचनैः ॥१२४॥**

**अन्वयार्थः**—समाधिमरणाचेवेळीं (स्नेहं) प्रेम (वैरं) वैर (संगं) ममत्व (च) आणि (परिग्रहं) परिग्रह (अपहाय) सोडून ( शुद्धमनाः सन् ) निर्मल अन्तःकरण करून (प्रियैः वचनैः) मधुर भाषांनीं ( स्वजनं अपि च परिजनं ) कुटुंबी लोकांना व नोकर-चाकरांना देखील (क्षान्त्वा) क्षमा मागून ( क्षमयेत् ) आपणही त्यांना क्षमा करावी.

**अर्थः**—प्रेम, वैर, ममत्व व परिग्रह हें सोडून देऊन यांचा त्याग करून निर्मल अन्तःकरणानें व गोडवाणीनें नोकरचाकरासह कुटुंबीयांची क्षमा मागावी व त्यांच्या कृत्याबद्दल त्यांना आपण अन्तकरणपूर्वक क्षमा करावी. उपकारक वस्तूबद्दलचा अनुराग, आस्था व ममत्व हीं सोडून द्यावींत. अनुपकारक वस्तू-बद्दल द्वेष वा दुजाभाव सोडून द्यावा. स्त्रीपुत्रादि आप्त-स्वकीयाबद्दलचा लोभ व त्यांच्या संबंधीचा मोह व ममता सोडून द्यावीत. बाह्य व अभ्यंतर परि-ग्रहाचा त्याग करावा. शुद्ध अन्तःकरणानें व खुल्या दिलानें सर्वांना त्यांच्या

कृत्याची क्षमा करावी व आपल्या कृत्याबद्दल त्यांची क्षमा मागावी. या सर्व कृत्याचा परिणाम एकच व तो हा कीं हें व्रत घेतल्यानंतर सल्लेखनी आपल्या घराच्या सांवलींत असला तरी तो महाव्रती होतो; व अशा स्थितींतच त्यास मरण आलें कीं धार्मिक दृष्ट्या त्याचा शेवट गोड झाला. अंतरंग परिग्रह ह्मणजे क्रोध, राग, मोह मत्सरादि कषाय व बहिरंग परिग्रह ह्मणजे धन-दौलत, संतति संपात्ति इत्यादिक.

अत्रिसंहिता श्लो. सं. ४१ मध्यें 'दया' या शब्दाची व्याख्या पुढील-प्रमाणें आहे. ही व्याख्या अतिव्याप्तीची आहे, असें ह्मणण्यास जागा राहणारच नाहीं असें नाहीं:—

परस्मिन् बंधुवर्गे वा मित्रे द्वेष्ये रिपौ तथा ।
आत्मवत् वर्तितव्यं हि दयैषा परिकीर्तिता ॥

**भावार्थः**—आपले शत्रू व मित्र, परकीय व स्वकीय या सर्वांशीं समता-भाव धरावा. जैनधर्मीय समता व सल्लेखना धारण करणाऱ्यानीं आचरावयाचे नियम तरी भिन्न आहेत असें कसें ह्मणतां येईल ? भिन्नता दिसते ती विषयाच्या मांडणींत. दया या सदराखालीं समताभावाचा समावेश होवो अगर इतर अशाच दुसऱ्या सदराखालीं समावेश होवो, समतेची जरूरी आहे, हें मात्र सिद्ध होतें.

### महाव्रत धारण करण्याचा उपदेश.

**आलोच्य सर्वमेनः कृतकारितमनुमतं च निर्व्याजम् ।**
**आरोपयेन्महाव्रतमामरणस्थायि निःशेषम् ॥ १२५ ॥**

**अन्वयार्थः**—(च) आणि (कृतकारितं अनुमतं) कृतकारित व अनु-मोदनेनें केलेल्या (सर्वं) सर्व (एनः) दोषांची (निर्व्याजम्) निष्कपट बुद्धीनें (आलोच्य) आलोचना करून (आमरणस्थायि) मरेपर्यंत टिकणारी अशी (निः शेषं) सर्व (महाव्रत) महाव्रतें (आरोपयेत्) धारण करावींत.

**अर्थः**—सल्लेखनाव्रत घेतल्यानंतर त्यापूर्वीच्या काळांत मन, वचन, काया, कृत, कारित व अनुमोदित यामुळें घडलेल्या सर्व पातकांची आलोचना

करावी. यामुळें मन शुद्ध राहण्यास मदत होईल. चित्तशुद्धि झाल्यावर आमरण महाव्रतें धारण करावीत. आलोचना करणें ह्मणजे आपल्या हातून घडलेल्या पातकांचा उच्चार करणें अगर तीं उघडपणें बोलून दाखविणें. उजळ माथ्यानें व मोकळया मनानें आपलीं पातकें गुरुसमोर जाहीर करावींत. गुरुजवळ नसल्यास ज्यांना आपण पूज्य समजतो, त्यांच्यापुढें तीं पातकें सांगावींत. यामुळें मनावरचा दाब कमी होऊन चित्तशुद्धि होते.

### महाव्रतें धारण केल्यानंतरचें कार्य.

**शोकं भयमवसादं क्लेदं कालुष्यमरतिमपि हित्वा ।**
**सत्त्वोत्साहमुदीर्य च मनः प्रसाद्यं श्रुतैरमृतैः ॥ १२६ ॥**

**अन्वयार्थः**—(शोकं) शोक (भयं) भीति (अवसादं) खेद (क्लेदं) स्नेह (कालुष्यं) रागद्वेषरूप परिणति (अपि) तसेंच (अरतिं) अरति यांचा (हित्वा) त्याग करून (च) आणि (सत्वोत्साहं) शक्ति व उत्साह यांना (उदीर्य) प्रगट करून (अमृतैः) अमृतासारख्या (श्रुतैः) शास्त्रानीं (मनः) मन (प्रसाद्यं) प्रसन्न करावें.

**अर्थः**—शोक, भय, खेद, कालुष्य व अरति यांचा त्याग करून शास्त्र श्रवणांत उत्साहानें आमरण काल घालवावा. धर्मश्रवण हें अमृतासारखें हित-कारी आहे. धर्मशास्त्र श्रवणामुळें वैराग्य वृत्तीची वाढ होवून मन प्रसन्न व आनंदित राहतें. अमृताप्रमाणें यावेळीं धर्मश्रवण हे तारक आहे. अमृत सेवना-मुळें जीवाला मृत्यूची भीति राहत नाहीं. तद्वतच महाव्रत धारण केल्यावर धर्म श्रवणांत काळ घालविण्यानें जन्मजरा मरणाची भीति राहत नाहीं; कारण धर्म-श्रवण करणारा जीव मुक्त होतो.

### सल्लेखना व्रताचा स्वीकार केल्यानंतर.

**आहारं परिहाप्य क्रमशः स्निग्धं विवर्द्धयेत्पानम् ।**
**स्निग्धं च हापयित्वा खरपानं पूरयेत् क्रमशः ॥१२७॥**

**अन्वयार्थः**—(क्रमशः) क्रमाक्रमानें (आहारं परिहाप्य) आहाराला सोडून (स्निग्धं पानं) स्निग्ध पेय (विवर्द्धयेत्) वाढवावें (च) आणि (क्रमशः) क्रमाक्रमानें (स्निग्धं) स्निग्ध पदार्थांचा (हापयित्वा) त्याग करून (खरपानं) कांजी वगैरे पदार्थ (पूरयेत्) वाढवावेत.

**अर्थः**—सल्लेखना व्रताचा स्वीकार केल्यानंतर क्रमाक्रमानें अन्न कमी कमी करावें, नंतर दूध व ताक यासारखे पेय पदार्थ वाढवीत जावें, व शेवटीं तेंही न घेतां कांजी वाढवावी व अखेर केवळ तापविलेलें पाणीच अधिक घेत जावें.

**पाणीहि कमी करून उपवास करावा.**

**खरपानहापनामपि कृत्वा कृत्वोपवासमपि शक्त्या ।**
**पंचनमस्कारमनास्तनुं त्यजेत् सर्वयत्नेन ॥ १२८ ॥**

**अन्वयार्थः**—(खरपानहापनां अपि) गरम पाण्याचा देखील त्याग (कृत्वा) करून (अपि) तसेंच (शक्त्या) शक्तिला अनुसरून (उपवासं) उपवास (कृत्वा) करून (सर्वयत्नेन) सर्व प्रकारच्या प्रयत्नांनीं (पंचनमस्कारमनाः) पंचणमोकर मन्त्रामध्यें ज्यानें आपल्या मनाची एकाग्रता केली आहे असा होऊन (तनुं) शरीराला (त्यजेत) सोडावें.

**अर्थः**—कांजी व गरम पाणीहि घेण्याचें सोडून देऊन सोसेल तसें व यथाशक्ति उपवास करावेत. उपवास करीत करीत पंचनमस्काराकडे लक्ष ठेवून व व्रत, संयम, चारित्र व ध्यान याविषयीं सावध राहून देह-त्याग करावा.

**टीपः**—जैन ह्मटला कीं वस्त्रगाळित पाण्याचाच तो उपभोग करणार. ह्मणजे वस्त्रगाळित पाणी व जैन असें समीकरण आहे. श्लोक संख्या १२७ व १२८ मध्यें तापविलेल्या पाण्याचा उपयोग करावा असें लिहिलें आहे, परंतु पाणी वस्त्रगाळ करूनच घ्यावें, असा निर्बंध इतरत्रहि दिसत नाहीं, यामुळें अहिंसा अणुव्रतांत वस्त्रगाळ पाणीच वापरावें असा निर्बंध घातला आहे असा निष्कर्ष काढावा लागेल. रात्रीं भोजनत्याग व वस्त्रगाळित पाण्याचा उपयोग करणें, यासंबंधीं आचार्य वचनांत भिन्नता दिसते. रात्रीं भोजनत्याग

व वस्त्रगाळीत पाण्याचा उपयोग करणें याचा आठ मूलगुणांतच ज्यांनीं समावेश केला त्या आचार्यांचें मतच अधिक सयुक्तिक दिसतें असें ह्मटल्यास तें चुकीचेंच होईल असें नाहीं.

**भावार्थः**—या श्लोकांत पंचनमस्कार करीत करीत देह त्याग करावा असें सांगितलें आहे. हे पंचनमस्कार कोणते इत्यादिकाबद्दल स्थूल मानानें कल्पना देणें अप्रस्तुत होणार नाहीं. (१) णमो अरहंताणम् (२) णमो सिद्धाणम् (३) णमो आइरियाणम् (४) णमो उवज्झायाणम् (५) णमो लोए सव्वसाहूणम्-ह्मणजे-(१) अरहंत (२) सिद्ध (३) आचार्य (४) उपाध्याय व (५) सर्व साधु यांना नमस्कार करीत करीत प्राणत्याग करावयाचा असतो.

सव्व अथवा सर्व हें विशेषण साधु या नामामागेंच लाविलेलें आहे; तथापि सर्व अरहंत, सर्व सिद्ध, सर्व आचार्य व सर्व उपाध्याय अर्थात् भूत, वर्तमान व भविष्यकालीन अशांना हे नमस्कार असतात असेंच समजणेंचें आहे.

## अरहंत व सिद्धादि कोणास ह्मणावें.

यासंबंधीं थोडीशी कल्पना देणें अनाठायीं होणार नाहीं. णमोकार मंत्र सर्वांच्याच परिचयाचा आहे. मात्र त्या मंत्रांतील विभूतींच्या अंगीं कोणकोणते गुण असतात; हें कळणें जरूर आहे. नमस्कार हा त्या विभूतींच्या देहाला नसून त्यांच्या गुणाला करावयाचा असतो.

**नियमसार**-व्यवहार चारित्र-आचार्य कुंदकुंद-श्लोक संख्या ७१ ते ७५ अखेर-यांत अरहंतादि विभूतींचीं लक्षणें दिलीं आहेत.

**घनघातिकर्मरहिताः केवलज्ञानादिपरमगुणसहिताः ।**
**चतुस्त्रिंशदतिशययुक्ता अर्हन्त ईदृशा भवन्ति ॥७१॥**

**सारांशः**—चार घातियाकर्मांचा नाश करणारे, केवलज्ञानादि गुण समुच्चयानें युक्त व चौतीस अतिशयांनीं युक्त हीं अर्हन्त भगवानांचीं लक्षणें आहेत.

**नष्टाष्टकर्मबन्धा अष्टमहागुणसमन्विताः परमाः ।**
**लोकाग्रस्थिता नित्याः सिद्धास्ते ईदृशा भवन्ति ॥ ७२ ॥**

**सारांशः**—आठ कर्मांचा ज्यांनीं नाश केला आहे. आठ महागुणासह जे आहेत, लोकांच्या अग्रस्थानीं जे आहेत व नित्य आहेत त्यांना सिद्ध म्हणावें.

**पंचाचारसमग्राः पंचेन्द्रियदंतिदर्पनिर्दलनाः ।**
**धीरा गुणगंभीरा आचार्या ईदृशा भवन्ति ॥७३॥**

**सारांशः**—पांच प्रकारच्या आचारानें युक्त, पंचेंद्रियांचे विजेते, जे धीर आहेत व गुणांकित आहेत, त्यांना आचार्य म्हणावें. अहिंसादि पाच महाव्रतें, भाषासमिति आदि पांच समिति व मनोगुप्ति, वाक्‌गुप्ति व कायगुप्ति अशा तीन गुप्ति असे हे तेरा आचार आहेत; व यांनीं युक्त ते आचार्य होत. साधुसंघावर नियंत्रण ठेवण्यास समर्थ व साधुसंघाच्या आचारावर देखरेख ठेवण्याची ज्यांना पात्रता आलेली असते, त्यांना आचार्य म्हणतात. आचार्य इतर साधूंना उपदेशामृत पाजून त्यांना आपल्या पायरीवर आणण्याचा प्रयत्न करितात.

रत्नत्रयसंयुक्ताः जिनकथितपदार्थदेशका सूराः ।
निःकांक्षभावसहिता उपाध्याया ईदृशा भवन्ति ॥७४॥

**सारांशः**—रत्नत्रयांनीं युक्त, जिनदेवांनीं सांगितलेला धर्मोपदेश देणारा व जो मोह व आशारहित आहे. त्याला उपाध्याय म्हणावें.

**व्यापारविप्रमुक्ताः चतुर्विधाराधनासदारक्ताः ।**
**निर्ग्रंथा निर्मोहा साधवः एतादृशा भवन्ति ॥७५॥**

**सारांशः**—संसारांतील व्यापारापासून मुक्त, चारहि प्रकारच्या आराधनांत मग्न, जे निर्ग्रंथ आहेत व ज्यांचा मोह नष्ट झाला आहे, त्यांना साधू म्हणावें.

अधिक माहितीसाठीं श्री. उगरसेन एम्. ए. एल्‌एल् बी. यांनीं लिहिलेला व सेक्रेड बुक्स ऑफ धि जैन्स या मालेमार्फत प्रसिद्ध झालेला **नियमसार** या पुस्तकांतील पान ३६ ते ४० हीं पाहावींत.

## सल्लेखनाव्रताचे अतिचार.

**जीवितमरणाशंसे भयमित्रस्मृतिनिदाननामानः ॥**
**सल्लेखनातिचाराः पंच जिनेन्द्रैः समादिष्टाः ॥१२९॥**

**अन्वयार्थः**-(जीवितमरणाशंसे) (१) जीविताची इच्छा (२) मृत्यूची इच्छा ( भयमित्रस्मृतिनिदाननामानः ) (३) भीती (४) मित्र स्मरण (५) निदान असे (सल्लेखनातिचाराः) सल्लेखनाचे पांच अतिचार (जिनेंद्रैः समादिष्टाः) जिनेंद्र देवांनीं सांगितले आहेत.

**अर्थः**—या व्रताचे पांच अतिचार आहेत. (१) जीवितशंसा-अधिककाल जगण्याची इच्छा धरणें (२) मरणशंसा—लवकर मरण्याची इच्छा धरणें (३) भय-क्षुधा, तृषादिकांची भीति बाळगणें (४) मित्रस्मृति-मी मरतो आहे. परंतु माझा अमूक स्नेही वा आप्त यांची भेट होत नाहीं, ह्मणून हळहळणें व (५) निदान-पुढील भवांत सुख मिळो अशी इच्छा धरणें, असे हे या व्रताचे पांच अतिचार आहेत. आपण हें व्रत घेतलें असल्यानें पुढील जन्मांत आपणांस सुख मिळो, अशी आशाहि धरणें इष्ट नाहीं. कारण त्यामुळें धर्म व कर्तव्यकर्म ह्मणून हें व्रत घेतलें असें न होतां भावी सुखाच्या स्वार्थ बुद्धीनें हें व्रत घेतलें असें होईल. मरण केव्हां येईल तेव्हां येवो. अशी तटस्थ वृत्ति ठेवावी. मरण लवकर येवो अथवा तें लांबणीवर पडो, अशी आशा धरणेंहि अनिष्ट आहे. निरिच्छ वृत्तीनें धर्म ह्मणूनच हें व्रत घेऊन त्यांचें पालन करावें. या व्रतांत मनसंयमाची पराकाष्टेची कसोटी लागणार आहे.

### सल्लेखना व्रताचें फल.

**निःश्रेयसमभ्युदयं निस्तीरं दुस्तरं सुखाम्बुनिधिम् ।**
**निष्पिबति पीतधर्मा सर्वैर्दुःखैरनालीढः ॥ १३० ॥**

**अन्वयार्थः**—(पीतधर्मा) ज्यानीं धर्माचे प्राशन केलें आहे असा सल्लेखना धारण करणारा जीव (सर्वैः दुःखैः अनालीढः सन) सर्व दुःखांनीं रहित होऊन (अभ्युदयं) इंद्रादिकांच्या वैभवाला तसेंच (निस्तीरं) अपार ( दुस्तरं ) दुस्तर (सुखाम्बुनिधी) सुखसमुद्रस्वरूप (निःश्रेयसं) मोक्षाला (निष्पिबति) अनुभवतो अर्थात करून घेतो.

**अर्थः**—सल्लेखना धारण करून मरण साधणाऱ्या व्रतीपैकीं कांहींना स्वर्गसुखाची व कांहींना मोक्षसुखाची प्राप्ति होते. उत्तम क्षमादि दशधर्माचें श्रवण करून देहत्याग करणाऱ्या जीवापैकीं कांहींना इंद्र व अहमिंद्रादि पदाची प्राप्ति होते; व त्या पदाचें सुख अनेक काळ त्यांना भोगावयास मिळतें. समाधिमरण साधणाऱ्या कित्येक जीवांना अखंड सुख असलेल्यांना मोक्षाची प्राप्ति होते. व्रत एकच परंतु त्याचीं फळें मात्र भिन्न भिन्न कां ? या प्रश्नाचें समधानकारक उत्तर देणें अवघड असलें तरी तें अशक्य नाहीं. व्रत घेतल्यापासून मरणाचा काळ यामधील अंतर व निरतिचार व्रत पालन इत्यादिकामुळें फळात भिन्नता येईल.

मृत्यू-महोत्सवाचें वर्णन या अध्यायांत दिलें आहे. मृत्यूची भीति सर्वांना वाटते; परंतु मृत्यु टाळतां येत नाहीं. हरप्रयत्नानें अनेक आपत्ति टाळतां येतात परंतु मृत्यूला केव्हां तरी शरण जावेंच लागतें. असें असतांहि या अध्यायाला **मृत्यू-महोत्सव** असें कां संबोधिलें आहे, याचा थोडासा खुलासा करणें जरूर आहे. या खुलाशावरून मृत्यूला भितो कोण ? व मृत्यूला न भितां मृत्यूवर विजय कोण मिळवितो, याचा बोध होईल.

**सुदत्तं प्राप्ते यस्मात् । दृश्यते पूर्वसत्तमैः ॥**
**भुज्यते स्वर्भवं सौख्यं । मृत्युर्भीतिः कुतः सताम् ॥१॥**

**सारांशः**—इहजन्मीं केलल्या सुकृताचीं फळें परलोकीं भोगण्यास मृत्यूमुळें संधि मिळते, यासाठीं सन्मार्गप्रवृत्तक मृत्यूला कां भिईल ? भिणार नाहीं. युद्धांत शौर्याची कमाल केली म्हणून 'अ' चा सन्मान करण्याचें निश्चित झालें आहे. बादशहा 'अ' च्या छातीवर या सन्मानाचा बिल्ला स्वहस्तें लावणार आहे. अशा वेळीं 'अ' हा या सन्मान स्थळाकडे मोठ्या आनंदानें जातो. बिल्ला मिळाल्याबद्दल तो स्वतःस कृतकृत्य समजतो. तद्वतच सन्मार्गानें वागणाऱ्यांच्या गुणाची चीज जेथें होणार त्या स्थळीं जाण्यास कां भ्यावें! याच्या उलट भितो कोण !

संसारासक्तचित्तानां । मृत्युर्भीत्यै भवेन्नृणाम् ॥

**सारांश**:—संसारावरील आसक्ति ज्यांची सुटलेली नाहीं, त्यांना मृत्यूचें भय सतत राहणारच.

**या मृत्यु-महोत्सवाचें महत्व.**

यत्फलं प्राप्ते सद्भिर्व्रतायासविडंबनात् ।
तत्फलं सुखसाध्यं स्यान्मृत्युकाले समाधितः ॥

**सारांश**:—व्रतवैकल्यामुळें जपतपामुळें व इतर अशाच कृत्यामुळें जें फळ मिळतें तेंच फळ मरणसमयींच्या मनाच्या समतेमुळें मिळतें. याच्या उलट-

तप्तस्य तपसश्चापि पालितस्य व्रतस्य च ।
पठितस्य श्रुतस्यापि फलं मृत्युः समाधिना ॥

**सारांश**:—मुनिव्रत घेतलें, उपासतपास केलें, धर्माध्ययन करून धर्मज्ञ झालों परंतु समाधिमरण साधतां आलें नाहीं तर आजन्म केलेले सायास सर्व व्यर्थ होत.

विद्यार्थी वर्षभर झटून अभ्यास करितो. परिक्षेंत तो उत्तीर्ण होतो. पदवीदान समारंभास हजर राहण्यासाठीं जातो. कुलगुरु त्याचें स्वागत करून त्यास शिफारसपत्र देतो. तद्वतच इहलोकीची मुदत संपल्यावर आजन्म आचरिलेल्या सन्मार्गाचें व केलेल्या सत्कृत्यांचें फळ मिळणार आहे, अशी दृढ श्रद्धा ठेवून मृत्यूचें स्वागत करावें. मरणानंतर कुलगुरु आपलें स्वागत करणार आहेत. स्वागताचा महोत्सव होणार आहे व मृत्यू आपणांस ही संधी देणार आहे. अशा मृत्यूस भिण्याचें मग कारण तें कुठें राहील ?

तीर्थयात्रेला निघतांना आपलें मन आनंदित व उल्हासित असतें. तीर्थांत सर्वच पवित्र असतें. अशा पवित्र स्थळीं कांहीं काळ आपलें तरी वास्तव्य घडावें ह्मणून आपण उत्सुक असतो. तीर्थयात्रेला जाण्याची मनांत कल्पना आल्यापासून आपला देह आपल्या गांवीं असताहि आपलें मन त्या पवित्र ठिकाणीं पोंचलेलें असतें. पवित्र ठिकाणीं राहण्यासाठीं मन केव्हाच पुढें भरारी मारून गेलेलें असतें. पवित्र ठिकाणीं व पवित्र आत्म्याच्या सन्निध जन्मजरामृत्यूच्या

तावडींतून कायमचें सुटून चिरंतन सुखांत राहण्यासाठीं आपण अत्यंत उतावीळ होणें जरूर आहे. याचाच अर्थ मृत्यूचें आपण हंसतमुखानें स्वागत केलें पाहिजे. हाच मृत्यू-महोत्सव व हेंच करण्यास धर्मानें सांगितलें आहे.

## श्रावकाचाराचा सार.

स्थूलमानानें पाहतां या श्लोकाअखेरच श्रावकाचार संपला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जीवाची इह लोकांतील शेवटची क्रिया ह्मणजे मरण; यामुळें श्रावकाचाराचा सार येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं. पं. आशाधर यांच्या निटवेकृत सागारधर्मामृताच्या पहिल्या अध्यायांतील श्लोक संख्या १२ खालीं हा सारांश दिला आहे.

" शंकादि दोषरहित सम्यक्त्व, निरतिचार अशीं पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें, चार शिक्षाव्रतें हीं पाळणें आणि शेवटीं ह्मणजे मरणकालीं विधीपूर्वक सल्लेखना ह्मणजे समाधिमरण साधणें, अर्थात पुत्र, मित्र, कलत्र, धन व विषयसुख इत्यादि पदार्थांविषयीं ममत्व न करणें, हा पूर्ण सागारधर्म होय. मरणकालीं विधीपूर्वक ज्यानें सल्लेखना घेतली त्यानें श्रावकधर्मरूपी प्रासादावर कळसच चढविला असें ह्मणावयाचें "

विधीपूर्वक सल्लेखनाव्रत घेऊन समाधिमरण साधणारा श्रावक' धर्मावर कळस कसा चढवितो? मुक्ति, मोक्ष व परमात्मपद हें धर्माचें ध्येय आहे. विधीपूर्वक सल्लेखनाव्रत घेऊन मरण साधणाऱ्यांना मुक्ति मिळते; असें या पूर्वीच्या श्लोकांत सांगितलें आहे. मुक्ति हें अंतिम ध्येय व तेंच साध्य झालें ह्मणजे मग इतर फळांची आशा ती कशासाठीं ?

संसारांत-घरच्या सांवलींत-राहूनहि मुक्ति मिळविण्याचें सल्लेखना हें एक अमूल्य साधन आहे. यावरून मुक्तिसाठीं सर्वसंग परित्यागाची जरूरी ठेवलेली नाहीं. यामुळेंच जैनधर्म हा प्रवृत्तीमार्गी आहे,निदान प्रवृत्ति व निवृत्ति मार्गांचा योग्य मिलाफ करणारा हा धर्म आहे; हें स्पष्ट होणार आहे. गृहस्थधर्मानें वागून अथवा निर्ग्रंथ होऊन मुक्ति मिळवितां येते, हें जैनधर्मानें शिकविलें आहे.

## मोक्षाचें स्वरूप.

**जन्मजरामयमरणैः शोकैर्दुखैर्भयैश्च परिमुक्तम् ।**
**निर्वाणं शुद्धसुखं निःश्रेयसमिष्यते नित्यम् ॥ १३१ ॥**

**अन्वयार्थः**—( जन्मजरामयमरणैः ) जन्म, वृद्धावस्था, रोगमृत्यू ( शोकैः दुखैर्भयैः च ) शोक, दुःख, भीति इत्यादिकांनीं ( परिमुक्तं ) रहित ( नित्यं ) नित्य ( शुद्धसुखं ) शुद्ध, सुखस्वरुप ( निर्वाणं ) असा जो मोक्ष (निःश्रेयसं) तोच निश्रेयस (इष्यते) ह्मणविला जातो.

**अर्थः**—समाधिमरण साधणाऱ्या कांहीं जीवांना मोक्षप्राप्ति होते, असें मागील श्लोकात सांगितलें आहे. अर्थातच मोक्षाचें स्वरूप काय आहे, हें सांगणें क्रमप्राप्त होतें व आचार्यांनीं या श्लोकांत मोक्षाचें स्वरूप दिलें आहे तें असें:-

जेथें जन्म नाहीं, जेथें बाळ, यौवन व वृद्धापकाळ अशी अवस्था नाहीं. तेथें रोग होण्याची भीति नाहीं. तेथें मरणाची भीति नाहीं. तेथें दुःख व भय यांची बाधा होत नसते. तेथील सुख, खरें सुख असून तें चिरंजीव व चिरकाल टिकणारें असते. तेथें कोणतीहि क्रिया करावी लागत नाहीं अशा स्थानाला मोक्ष असें ह्मटलें आहे.

## वैदिकधर्म-मोक्ष-मार्ग.

यापुढें वैदिकधर्मांत मोक्षाचें स्वरूप व मोक्ष मिळविण्याचे मार्ग यासंबंधीं केलेल्या विवेचनाची वाचकांना ओळख करून देण्याचा प्रयत्न केला आहे. यम व नाचिकेत यांच्या संवादांत हें विवेचन असल्यानें तो यापुढें दिला आहे.

कठ उर्फ काठक या उपनिषदामध्यें आत्मविद्येशिवाय दुसरा विषय नाहीं. या ग्रंथांत नाचिकेत व यम यामधील संवाद सारांश रूपानें देण्याचा हेतु, हा कीं उपनिषदांतील आत्मविद्येचें विवरण जैनधर्म आत्मविद्येच्या स्वरूपांशीं कसें तंतोतंत जमतें तें दिसावें.

नाचिकेत हा वाजश्रवा नांवच्या ऋषीचा मुलगा. स्वर्गप्राप्ति व्हावी ह्मणून वाजश्रवानें विश्वजित् नांवचा यज्ञ करून, यज्ञ करणाऱ्यांना आपल्या

जवळची धनदौलत व गाई देऊन टाकल्या. ज्यांचें दूध काढून घेतलें आहे अशा गलितगात्र गाई दान देऊन कोणतें पुण्य मिळणार? माझें दान तुम्हीं कोणाला करणार असा मुलानें बापास प्रश्न केला. असा तीनवेळां प्रश्न केल्यावर बापानें रागानें उत्तर दिलें कीं, मी यमाला तुझें दान करणार आहे. मनुष्य जनन मरणाच्या आधीन आहे; हें जाणून आपलें बोलणें खरें करण्याचा हट्ट मुलानें बापाजवळ धरिला. बापानें नचिकेतला यमाकडे जाण्यास परवानगी दिली. यमाकडे तो गेला पण यमाची तीन दिवस भेट झाली नाहीं. भेट झाल्यावर यमानें तीन वर मागण्यास त्यास सांगितलें.

आपला बाप शांतसंकल्प व वीतकाय (वीतराग) व्हावा. हा पहिला वर मागितला व यमानें तो दिला. जेथें जन्म, जरा व मृत्यू यांची भीति नाहीं अगर दुसऱ्या कशाचीहि भीति नाहीं, क्षुधा तृषादिकांची इच्छा नाहीं व जेथें सदासर्वकाळ आनंद असतो, अशा स्थलांची-स्वर्गाची दुसरी मागणी घातली व यमानें हाहि वर दिला.

**मृत्यूला मरण आणणारी** आत्मविद्या मला द्या. असा तिसरा वर या मुलानें मागितला. या वरमागणीपासून परावृत्त करण्यासाठीं यमानें तू शतायु होशील, तुला इंद्रादिकांचें सौख्य मिळेल वगैरे वगैरे लालुच दाखविली; परंतु नचिकेत आपला आग्रह सोडीना. मला अक्षय सुख देणाऱ्या आत्मविद्येचाच वर पाहिजे असा आग्रह त्या मुलानें धरला.

नचिकेताचा हा निर्धार व सुखापासून विरक्त भावना पाहून यमानें आत्मविद्येचा मार्ग सांगितला. यम ह्मणाला कीं,—श्रेयोमार्ग—ज्यांत परम कल्याण आहे असा मार्ग आहे. श्रेयः ह्मणजे मोक्षसुख. प्रेयो ह्मणजे विषयसुख-प्रेयो मार्गाचें अवलंबन केल्यानें चार पैसे मिळतील, विषय व शरीर सुख मिळेल परंतु मोक्षलक्ष्मी मिळणार नाहीं. श्रेयोमार्गानेंच मोक्षलक्ष्मी मिळते. यावरून या मुलाच्या दृष्टांतील वैशिष्ट्य दिसेल.

आत्मविद्या-आत्मज्ञान-मिळणें कठीण आहे. आत्म्याला रूपगुणादिक नाहींत त्यामुळें तो इंद्रियानें ओळखला जात नाहीं. हर्षशोकापासून मुक्त असणारा आत्मज्ञानी होतो. आत्मतत्व आनंदरूप आहे. हा आत्मा कोणाला मारीत नाहीं व त्याला मरण नाहीं; त्यास मारण्यासहि कोणी समर्थ नाहीं. सूक्ष्माहूनहि हा सूक्ष्म आहे व मोठ्याहूनहि मोठा आहे. अंतर्मुख होणाऱ्या विरागी पुरुषालाच त्याचा प्रत्यय-अनुभव-येतो. व ज्याला अनुभव येतो तो हर्षशोकादि द्वंद्वापासून मुक्त होतो.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन·**

बुद्धी तरतरीत असली तर अनेक शास्त्रांत प्रवीण होतां येते. अशा शास्त्रज्ञाला आत्मज्ञान होईलच असें नाहीं. दुश्चरितापासून परतला नाहीं, इंद्रियाचा उपशम व चित्ताची एकाग्रता झाली नाहीं, तोंवर ब्रह्मप्राप्ति होणार नाहीं, आत्मज्ञान होणार नाहीं व आत्मा परमात्मपदाला पोंचणार नाहीं.

आत्मज्ञान होण्याचा यमानें सांगितलेला हा मार्ग व जैनतत्व यांत फरक तो कोणता ?

**यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः ।**

**तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ॥**

सर्व चराचर प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आपण आहों असें जो समजतो ह्मणजे ज्याचा आपपर भाव नष्ट झाला आहे, त्याला सुख तरी कशाचें व दुःख तरी कशाचें ? अशी स्थिती प्राप्त होणें यालाच आत्मज्ञान असें ह्मणतात. मुक्ति ती हीच.

उपनिषदांत अहिंसा, सत्य, गुरुसेवा, तप, ब्रह्मचर्य, परोपकार व अपरिग्रह यांची महति जागोजागीं वर्णिली आहे. उदाहरणार्थ सत्यंवद । धर्मंचर । स्वाध्यायान्मामदः । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव, उपनिषद् गीता व अलिकडील संतवाङ्मय यांत जन्ममरणादिकांच्या आपत्तींतून मुक्त व्हावें असाच उपदेश सांगितला आहे. जैनधर्माचें तर हेंच साध्य आहे. मोक्ष अगर मुक्ति हेंच अंतिम ध्येय आहे.

हें साध्य सिद्ध करून घेण्यासाठीं अगर अंतिम ध्येय जी मुक्ति ती मिळविण्यासाठीं जे मार्ग जैनधर्म व वैदिकधर्मांनीं सांगितले आहेत, त्यांत तत्वतः विरोध नाहीं. आचारधर्मांत फरक येतो व आचारधर्मालाच धर्म समजले गेल्यानें हे दोन धर्म भिन्न दिसतात.

## मोक्षाची चिंता-आशा-तरी धरावी काय ?

यावद्दल **परमात्मप्रकाश** या ग्रंथांतील 'महाधिकार' छाया नंबर ३१९ पुढीलप्रमाणें:—

**मोक्षं चिंतय मा योगिन् मोक्षो न चिंतितो भवति ।**
**येन निबद्धो जीवः मोक्षं करिष्यति तदेव ॥ ३१९ ॥**

**सारांशः**—हे योगिन तूं मोक्षाची चिंता करूं नकोस, त्याचा मोह धरूं नकोस, मोक्ष चिंता केल्यानें मिळत नाहीं. इच्छेचा त्याग केल्यामुळें तो मिळतो.

मोक्षाचीहि इच्छा न धरण्याबद्दलचा हा इशारा म्हणजे निष्कामकर्म करीत राहण्याचाच इशारा आहे. कर्तव्य म्हणून सदाचारानें वागा व तसें वागतांना फळाची आशा धरूं नका, असेंच या छायेंत स्पष्ट बजाविलें आहे.

येथें शंका अशी येईल कीं, जिनमंदिर बांधल्यानें बांधणाऱ्यावर रत्नवृष्टि होते, अतिचाररहित पांच अणुव्रतांच्या पालनामुळें स्वर्ग वा मोक्षसुख मिळतें, आहारदानानें अमूक पुण्यप्राप्ति होते व समाधिमरणामुळें स्वर्ग अगर मुक्ति मिळते, इत्यादि सदाचाराचीं फळें मिळतील असें कां सांगितलें आहे ? फळ सांगणें अगर सुखाची आशा लावणें हें निराळें. तसें होणार नसतें तर सदाचाराकडे मनाची प्रवृत्ति करण्याचा प्रयत्नच झाला नसता. तें सुख अगर तसलें सुख मिळतें म्हणून सदाचारप्रवृत्त झालों तर इच्छा मारली नाहीं, मोह सुटला नाहीं, चांगल्या सुखाबद्दलहि निरिच्छ राहतां आलें नाही, अनुराग उत्पन्न होतो, इच्छा, मोह व अनुराग हीं सर्वत्रच वर्ज्य मानिलीं आहेत. परिग्रहाचे हे चौदा अंतरंग दोष आहेत. अंतरंग व बहिरंग दोष टाळल्याशिवाय मुक्ति मिळणार नाहीं, कर्म निष्कामच केलें पाहिजे.

### मुक्तजीवाचें वर्णन.

**विद्यादर्शनशक्तिस्वास्थ्यप्रल्हादतृप्तिशुद्धियुजः ।**
**निरतिशया निरवधयो निःश्रेयसमावसन्ति सुखम् ॥१३२॥**

**अन्वयार्थः**—मुक्त जीव ( विद्यादर्शनशक्तिस्वास्थ्यप्रल्हादतृप्ति-शुद्धि-युजः) केवलज्ञान, केवलदर्शन, अनंतशक्ती, परम-स्वस्थता, अनन्त-सुख परम -संतोष व उत्कृष्ट शुद्धि यांनीं युक्त असलेलें (निरतिशयाः) अतिशयानें रहित अर्थात ज्ञानादि गुणांच्या हीनाधिक अवस्थेनें रहित (निरवधयः) कालमर्यादेनें रहित अनन्त कालपर्यंत राहणारे असे होऊन (निश्रेयसं सुखं) मोक्षसुखामध्यें (आवसन्ति) वास करितात.

**अर्थः**—वरील श्लोकांत मोक्षस्थान कसें असतें याचें वर्णन दिलें आहे. त्या ठिकाणीं राहणारा-मुक्तजीव-कशा स्वरूपाचा असतो, हें सांगणें क्रमप्राप्त होतें व या श्लोकांत मुक्तजीव कसा असतो याचें वर्णन केलें आहे.

अनंतज्ञानादि गुण धारण करणारे सिद्ध जीव अनंतकाल व चिरंतन सुखानें मोक्षांत राहतात. मुक्तजीव, केवलज्ञानी-अनंतज्ञानी, केवलदर्शनी-अनंतदर्शनी, अनंतशक्ति-अनंतवीर्यी, परमउदासीन, अनंतसुखी, इच्छारहित, विषयासंबंधीं अनिच्छ, अशा गुणांनीं युक्त व चिरकाल सुखानें राहणारे असतात.

**सारांशः**—गृहस्थी धर्माचें व मुनीधर्माचें पालन करीत असतां मोक्ष प्राप्तिसाठीं जे जे गुण-पुण्य-मिळवावें व जीं जीं पातकें-दोष-टाळावेत, असें यापूर्वी सांगितलें आहे, त्या त्या सर्व गुणानीं युक्त व त्या त्या दोषांनीं रहित असलेलें व चिरकाल टिकणारे जीव-मुक्तजीव-सिद्धभगवान-तेथें असतात. पृथ्वीवर व स्वर्गातहि जें सुख नाहीं तसें सुख तेथें मिळतें.

### सिद्ध जीवांच्या गुणामध्यें विकारांचा अभाव.

**काले कल्पशतेऽपि च गते शिवानां न विक्रिया लक्ष्या**
**उत्पातोपि यदि स्यात्त्रिलोकसम्भ्रान्तिकरणपटुः ॥१३३॥**

**अन्वयार्थः**—(यदि) जरी (त्रिलोकसंभ्रांतिकरणपटुः) तिन्ही लोकांस हालवून सोडण्यास समर्थ असा (उत्पातः अपि) उत्पात देखील (स्यात्) झाला तरी (च) तसेंच (कल्पशते काले गते अपि) शेंकडो कल्पकाल गेले तरी (शिवानां) मुक्त जीवामध्यें (विक्रिया) विकृति (न लक्ष्या) दिसून येत नाहीं.

**अर्थः**—तिन्ही लोकांत खळबळ उत्पन्न करण्यासारखा उत्पात—उल्कापात—जरी झाला व शेंकडो कल्पकाल जरी लोटले तरी सिद्ध जीवांच्या गुणांत व स्वभावांत कोणताही फरक-परिवर्तन-होत नाहीं. सिद्ध जीव अनंतकालपर्यंत अनंतसुखांत राहतात; ते संसारी जीव म्हणून त्यांना जन्म घ्यावा लागत नाहीं. स्वर्गलोकांतील इंद्र, अहमिंद्रादि देवांनाही संसारी जिव म्हणून फिरून जन्म घ्यावा लागतो. मोक्षांतील जीवांना—सिद्ध जीवांना—ही यातना नसत.

गीतेच्या आठराव्या अध्यायांत त्याग, त्यागी, ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृति व सुख याबद्दल विवेचन करून गुणांत राहून गुणातीत, निर्गुणपद पावण्याचा उपाय सांगितला आहे. निर्गुण अगर गुणातीत म्हणजे सत्व, रज व तम या तीन गुणांच्या पलीकडचे. मी गुणाहून वेगळा आहे, अशी जेव्हां जाणीव होते, तेव्हां तो निर्गुणपदाला पोहोंचतो. गुणातीत अगर निर्गुण पदाची प्राप्ति म्हणजे कर्मांचा क्षय, निर्जरा इत्यादि. सत्व-शुभ कर्म नाहीं, तम म्हणजे अशुभ कर्महि नाहीं, अशी स्थिती प्राप्त होणें म्हणजेच मुक्ति.

श्लोक संख्या १३१।१३२ मध्यें अनुक्रमें मोक्षाचें-मुक्तजीवांचें-वर्णन दिलें असून श्लोकसंख्या १३३ मध्यें मुक्तजीव विकार व गुणरहित असतात असें सांगितलें आहे.

भगवद्गीता अध्याय १४ श्लोक २६ मध्यें 'सगुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते।' म्हणजे गुणांच्या पलिकडे जाऊन ब्रह्मभवाला पावतो, मुक्तावस्थेंत आत्मा निर्गुणी असतो व विकार रहित असतो. इकडची सृष्टी तिकडे झाली व उल्कापात झाला तरी मुक्त जीवाला त्याची बाधा होत नाहीं, कारण तो विकार रहित असतो.

गीता—अध्याय १८ श्लोक संख्या ५४.

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ १८–५४ ॥**

**भावार्थः**—ब्रह्मपदाला पोहोंचलेल्या आत्म्याला सुख, दुःख, इच्छा वासना इत्यादि राहत नाहींत. त्याच्या ठिकाणीं अखिल प्राणिमात्राबद्दल समता व समभाव उत्पन्न झालेला असतो.

बुद्धि शुद्ध झाली, विषयापासून मन परावृत्त झालें, एकांतसेवन, युक्ताहार विहार, वैराग्ययुक्त षड्रिपूंचा त्याग, 'मी-मम'ची बाधा नाहीं व यामुळें शांतीला पावलेल्या जीवाला ब्रह्मभूयाय-ब्रह्मपदांची प्राप्ति होते.

दोन्ही धर्मांचें ध्येय एकच, मार्ग व उपायही सारखेच; परंतु त्या मार्गांच्या व उपायांच्या नांवांत भिन्नता असली तर अर्थानें एकच, अशी परिस्थिती तुलनात्मक दृष्टीनें विचार करितां आढळून येते. दिल्लीला जावयाचें हें प्रवासाचें ध्येय आहे. कोल्हापुराहून दिल्लीला जावयाचें तर रेलमार्गानें, मोटार मार्गानें, पायवाटेनें व निरनिराळ्या ठिकाणीं रस्ता बदलून जातां येतें. निरनिराळ्या वाटेनें व निरनिराळ्या ठिकाणीं मुक्काम करीत जाणाऱ्या प्रवाशांच्या प्रवास वर्णनांत फरक आढळणारच; तसाच प्रकार वर्णनाच्या बाबतींत आहे. फरक काय तो एवढाच, ध्येय एकच, तत्व एकच, तपशीलांत व तोहि थोड्या अंशानें मात्र फरक.

## ब्रह्मविद्या-परमेष्टिपद.

वैदिक ग्रंथांत दुसऱ्या एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं:—

**यस्मिन्सर्वाणि भूतानिआत्मैवाभूद्विजानतः।**
**तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ॥**

**भावार्थः**—जो सर्व प्राणिमात्रांना आपल्या सारखेच जाणतो; त्याला मोह तरी कशाचा व दुःख तरी कशाबद्दल? कारण तो समभावी व समताभावी झाला असतो. आपपर भावना राहिलेली नसते.

हा थोरपणा कशानें मिळतो वा मिळत नाहीं ? चित्ताची शुद्धि, मनाची एकाग्रता, गुणातीत-निर्गुणसमता, आपपर भावाचा अभाव इत्यादिकामुळें परमेष्टीपद-चिरंतन सुखपद-मिळतें. याशिवायही ही चिरशांति मिळविण्याची आणखी कांहीं साधनें आहेत, अशी एक भ्रामक समजूत असते. त्या गैरसमजाचें निराकरण करून तीं साधनें खरीं साधनें नाहींत व त्यायोगें आत्मज्ञान होत नाहीं, असें सांगितलें आहे.

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तत्स्वम् ॥

**भावार्थः**—पुष्कळ श्रवण पठन केलें, होम हवन व यज्ञ केले, पूजा-अर्चा केली, जपजाप्य केलें; ह्मणजे परमेष्टिपद साध्य होतेंच असें नाहीं. आत्मज्ञान होईलच असें नाहीं. आत्मज्ञान होण्याला आत्मानुग्रहच झाला पाहिजे. आत्मज्ञान व आत्मसाक्षात्कार ह्मणजे आत्म्याच्या खऱ्या गुणाचें-स्वरूपाचें-ज्ञान. असें ज्ञान विद्याभ्यासादिकामुळें अगर होम हवन अथवा यज्ञयागादिकामुळें होत नाहीं. वृत्ति निष्काम झाली पाहिजे, चित्त शुद्ध झालें, आपपर भाव नष्ट झाला, रागादिदोषापासून अलग राहिले व जातिकर्म कुलादिकांचा गर्व सोडून दिला, तर समताभाव व समताभावाबरोबरच आत्मज्ञान होईल. आत्मज्ञान ह्मणजेच परमात्मपद प्राप्ति अगर ब्रह्मपदप्राप्ति. आत्मा ही कांहीं चीज आहे कीं नाहीं याबद्दलचें विचार पुढें दिले आहेत. हा वाद जुना असला तरी त्याची थोडीशी तरी कल्पना येणें जरूर आहे.

## आत्मा-परमात्मा-इत्यादि सब झूट आहे ?

आत्मा, परमात्मा इत्यादि कल्पना सबझुट आहेत असें मानणारा पूर्वी एक वर्ग होता व हल्लीच्या शास्त्रीय व वैज्ञानिक जगांतहि त्याच मताचा पुरस्कार वैज्ञानिक दृष्टीनेंहि केला जात आहे. शरीर मेलें व जळालें तरी आत्मा या नांवाची कोणति तरी चीज जिवंत राहते, ही कल्पना प्राचीन आहे. परंतु हल्लींच्या शास्त्रीय युगांत तिला थारा नाहीं. तो न मानल्यानें कांहीं अडत नाहीं.

आत्म्याच्या अस्तित्वाचा कोणताहि पुरावा नाहीं. शरीर जळाल्यानंतर आत्मा जिवंत राहतो, त्याला मन नसतें, दुसऱ्या शरीरांत शिरण्याची त्याला शक्ति असते, इत्यादि कल्पना अत्यंत हास्यास्पद आहेत असें अधुनिक शास्त्रज्ञांचें मत आहे. मेंदूशिवाय कोणतेहि विचार उत्पन्न होणें शक्य नाहीं. असा आधुनिक शोध आहे. यामुळें आत्मा अमर आहे; व त्याला मेंदू आहे; असेंहि मानावें लागेल, अशीहि तक्रार आहे. मृत देहांतील आत्मा जेव्हां दुसऱ्या शरीरांत प्रवेश करितो तेव्हां त्या शरीरांतील आत्म्याचें काय होतें ? इत्यादिक प्रश्न विचाराई आहेत. हे खरें असलें तरी आत्मा ही चीज आहे, असें मानण्यानें तरी काय बिघडतें? समाजस्वास्थ्यासाठीं व धर्मसंरक्षणासाठीं आत्म्याचें अस्तित्व अनेकांनीं मान्य केलें आहे; व तो नाहीं व त्याला परमात्म पदाला—मोक्षाला—ब्रह्मपदाला जावयाचें नाहीं, असें मानल्यास सन्मार्गावरील श्रद्धा उडेल व पापकर्मांचें साम्राज्य माजून राहील. पाप-पुण्याच्या भीतिनें जी सुयंत्र समाजव्यवस्था चालली आहे; ती मोडून पडेल. समाजव्यवस्था सुयंत्र चालविण्यासाठीं कितीही कायदे केले तरी ते धर्माची बरोबरी करूं शकतील असें मानणें अवघड आहे.

आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल प्राचीन काळीं व आजच्या युगांत ज्या शंका घेतल्या जातात याची जाणीव वाचकांना असावी ह्मणून हा अल्पसा प्रयत्न व ओझरता उल्लेख केला आहे.

सद्सद्विवेक बुद्धि—Conscience—Soul—हे शब्दप्रयोग रूढ आहेत. विवेकबुद्धी व Soul यांचें अस्तित्व शरीराच्या कोठल्या भागांत आहे, हें सांगतां येत नाहीं. आत्मा ह्मणजे Conscience अगर Soul असें मानण्यास तरी हरकत काय ?

श्रावकाचाराच्या वरील तीन श्लोकांतहि हीच कल्पना प्रामुख्यानें मांडिली आहे.

हिंदु-संस्कृति या नांवानें ज्या संस्कृतीला आज ओळखलें जातें, ती संस्कृति ह्मणजे वैदिक संस्कृति नव्हे. वैदिक, जैन व बौद्ध संस्कृतीचें तें संमिश्रण आहे.

या पुस्तकांत कांहीं थोडा कां होईना जैन व वैदिक संस्कृतींतील साम्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. परस्परावर परिणाम होत होत गेलेल्या संस्कृतीला आज हिंदु संस्कृति असें नांव मिळालें आहे.

या संस्कृतीला **हिंदसंस्कृति** हें नांव अधिक सार्थ होईल. जैनधर्माच्या अहिंसा तत्वाचा व बौद्धधर्मांतील संन्यासमार्गाचा वैदिक संस्कृतीवर खास परिणाम झाला आहे. समुद्रादिकांना मिळणाऱ्या नद्यांना कोणत्या तरी एका नांवानें ओळखिलें जातें; परंतु समुद्राला भेटीपर्यंत त्या नदीच्या पाण्यांत अनेक नदीनदांच्या पाण्याचा संयोग झालेला असतो, तद्वतच हिंदसंस्कृतीचें झालें आहे. हिंदु संस्कृतीऐवजीं **हिंदसंस्कृति** असें नांव सुचविण्यांत हिंदु या शब्दांकडे पाहण्याचा माझा दृष्टीकोन निराळा आहे, अशी वृथा गैरसमजूत करून घेऊं नये. हिंदुसंस्कृतीवर त्या शब्दप्रयोगामुळें जो गैरसमज होतो, तो दूर करण्याच्या हेतूनें हा प्रयत्न केला आहे. या संस्कृतीला भारतीय संस्कृति हें नांव देणें अधिक इष्ट होईल. पौर्वात्य संस्कृति या शब्दप्रयोगांत अति-व्याप्तीचा दोष येतो. तद्वतच हिंदुसंस्कृति या शब्दांत अव्याप्तीचा दोष राहतो. यासाठीं या संस्कृतीला पौर्वात्य अगर हिंदु संस्कृति या नांवानें न संबोधितां **भारतीय संस्कृति** या नांवानें संबोधिणें सर्वथा इष्ट होईल.

### मुक्त-जीव कसे असतात ? व काय करितात.

**निःश्रेयसमधिपन्नास्त्रैलोक्यशिखामणिश्रियं दधते ।**
**निष्किट्टिकालिकाच्छविचामीकरभासुरात्मानः ॥ १३४ ॥**

**अन्वयार्थः**—(निष्किट्टिकालिकाच्छविचामीकरभासुरात्मानः) ज्यांचा आत्मा किट्टिमा आणि कालिका यांनीं रहित अशा सुवर्णाप्रमाणें प्रकाशमान आहे असे (निःश्रेयसं अधिपन्नाः) मोक्षाला प्राप्त झालेले जीव (त्रैलोक्यशिखामणि-श्रियं) तिन्ही लोकांच्या शिरोमणीभूत शोभेला (दधते) धारण करतात.

**भावार्थः**—सोन्यावरील मळ, घाण व काळेपणा नाहींसा झाला म्हणजे सोनें जसें तेजःपुंज व दैदिप्यमान दिसतें, त्याप्रमाणें कर्मरूपी मळानें रहित

असलेले सिद्ध भगवान-मुक्तजीव-मोक्षांतील जीव-अत्यंत तेजःपुंज व दैदिप्यमान असतात. डोक्यावरील मुकुटांतील दैदिप्यमान मण्याप्रमाणें शोभतात. तीन्ही लोकांना शोभा देतात.

### सल्लेखना व्रतामुळें इंद्रादिक पदाची प्राप्ति.

**पूजार्थाज्ञैश्वर्यैर्बलपरिजनकामभोगभूयिष्ठैः।**
**अतिशयितभुवनमद्भुतमभ्युदयं फलति सद्धर्मः॥१३५॥**

**अन्वयार्थः**—(सद्धर्मः) सल्लेखनेच्या अनुष्ठानानें उपार्जित केलेलें विशेष पुण्य (पूजार्थाज्ञैश्वर्यैः) पूजा, धन, आज्ञा आणि ऐश्वर्य तसेंच (बलपरिजन-कामभोगभूयिष्ठैः) सामर्थ्य, नोकरचाकर, काम, भोग यांच्या विपुलतेनें (अति-शयितभुवनं) त्रैलोक्यामध्यें उत्कृष्ट मानलेल्या (अद्भुतं) आश्चर्यकारक अशा (अभ्युदयं) वैभवाला (फलति) प्राप्त करून देतें.

**अर्थः**—सल्लेखनाव्रत स्वीकारून समाधिमरण साधल्यामुळें जो विशेष पुण्यलाभ होतो, त्या पुण्यलाभाच्या प्रभावामुळें भावी जन्मांत पूज्यता, धन, ऐश्वर्य, नोकरचाकर, काम, भोग, हीं इहलोकीं विपुल प्रमाणांत व स्वर्गलोकीं अनन्य साधारण व आश्चर्यकारक इंद्रपदाची प्राप्ती होते.

श्लोक नंबर १३० मध्यें सल्लेखनाव्रत स्वीकारण्याचें फळ सांगतांना सल्लेखनाव्रतधारी जीवापैकीं कांहींना स्वर्गसुखाची व कांहींना मोक्षसुखाची प्राप्ती होते, असें सांगितलें आहे. श्लो. नं. १३१।१३२।१३३ व १३४ या चार श्लोकांत मोक्षाचें स्वरूप, तेथें मिळणाऱ्या सुखाचें वर्णन इत्यादि माहिती देण्यांत आली. अर्थातच सल्लेखनाव्रत स्विकारल्यामुळें ज्यांना स्वर्गवास मिळतो, त्यांना कोणत्या प्रकारच्या सुखाचा लाभ होतो हें सांगणें जरूर होतें व तें या श्लोकांत सांगितलें आहे.

### सल्लेखना ह्मणजे आत्महत्या नव्हे.

सल्लेखनाव्रताचें खरें स्वरूप समजून न घेतल्यामुळें हें व्रत स्वीकारून देहत्याग करणाऱ्यांची आत्महत्या करणाऱ्यामध्यें गणना कांहीं विधर्मी करितात;

पण त्यांची ही विचारसरणी सर्वस्वी चुकीची, सदोष व निराधार आहे. आत्महत्या व समाधिमरण यांत तात्त्विक व व्यवहारिक दृष्ट्या अत्यंत महत्वाचे व मूलतःच फरक आहेत. वैदिक धर्मानुयायांत जलसमाधि घेणारे कांहीं आहेतच. शिवाय सल्लेखनाव्रतास आत्महत्या ह्मणतां येईल, असें कांहींच नाहीं. अन्न घेण्याचें हळूहळू व क्रमाक्रमानें कमी करीत जावयाचें व त्यानंतर दूध-ताकादि पेय पदार्थांवरच जगावयाचें व त्यानंतर गरम पाण्यावर निर्वाह करावयाचा असा जीवित संरक्षणाचा क्रम ठेविला आहे. त्रासाला कंटाळून लवकर मरण्याची इच्छा न धरण्याचीहि आज्ञा आहे. शिवाय या व्रतस्वीकारानंतर अन्तःकरणशुद्धीचे जे उपाय आहेत ते त्याचा विचार करितां निर्मलत्व व्हावें लागतें. अन्तःकाळाची ही भावना आहे.

आत्महत्येंत केवळ आपलें बलिदान करावयाचा हेतु तीव्र असतो. नको हा संसार व नको ही सांसारिक पीडा! अशी स्वार्थी, दुष्ट व कषाययुक्त भावना असते. जलसमाधींत केवळ शरीरावरील ममत्व सुटलेलें असतें, परंतु पुढील भवांतील सुखाच्या कल्पनेनें त्यास पछाडलेलें असतें. सल्लेखनाव्रतधाऱ्यांनीं भावी सुखाचीहि आशा धरण्याची नसतें.

सर्वांनाच महाव्रती होतां येणार नाहीं. परंतु सल्लेखनाव्रत घेतल्यानें मृत्युपूर्वी कांहीं काल तो महाव्रताचा धारकच होतो; असें समजलें जातें.

व्यवहारिक अगर धार्मिक अशा कोणत्याही दृष्टीनें या व्रताचा विचार केला तरी हें व्रत स्वीकारून देहत्याग करणाऱ्याची आत्महत्या करणाऱ्यामध्यें मुळींच गणना करितां येणार नाहीं. आपलें मरण आपल्या डोळ्यांनीं पहात व मरणाची भीति न बाळगतां धर्मध्यानांत मग्न राहणाऱ्याच्या भावनेचा व हेतूचा विचार करितां मृत्यूमुळें तो मरत नाहीं, उलट मृत्यूलाच तो मारतो. इतरावर जय मिळविणें अनेकांना शक्य असतें. परंतु मृत्यूवर जय मिळविण्याचें महद्भाग्य या व्रतधाऱ्यांनांच मिळतें. यामुळें सल्लेखना ह्मणजे आत्महत्या नव्हे असें दिसून येईल.

जिवंतपणीं जो मरावयास शिकतो, तो चिरंजीव कां होणार नाहीं ? प्रसिद्ध संत तुकाराम यांचे अ-भंग प्रसिद्धच आहेत. त्यांत एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं-आपुलें मरण पाहिलें म्या डोळा । तो सुखसोहळा अनुपम ॥ सल्लेखनाव्रतधारी आपल्या डोळयांनीं आपलें मरण पाहत असतो. दुसऱ्याला मरतांना पाहत असतां दुःख होतें, परंतु सल्लेखना मरण ह्मणजे सुखसोहळा आहे; कारण यामुळें मृत्यूवर विजय मिळवितो. मृत्यूवर विजय ह्मणजेच चिरंजीव होणें. (श्लो. सं. १२२ मधील विवेचन पहावें )

दुसरें असें कीं मृत्यु हा मनुष्याला ठेवलेलाच आहे; हें निश्चित जाणून सुप्रसिद्ध आंग्लकवि शेक्सपीअरनें ज्युलियस सीझरच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत. तो ह्मणतो. " Cowards die many times before their death. The valient taste of death but once. Of all the wonders that I yet have heard, it seems to me most strange that man should fear, seeing that death a necessary end will come when it will come.— भित्रे लोक मृत्युच्या भीतीनें जिवंतपणींच अनेकवार मरतात. निर्भय मात्र एकदांच मरतो. मरण हें ठेवलेलेंच आहे. करितां तें येईल तेव्हां येवो, असें न मानतां मृत्यूची भीति सदैव बाळगणें हे आश्चर्य आहे.

---

# अध्याय सातवा.

## श्रावकांच्या अकरा प्रतिमा.

**श्रावकपदानि देवैरेकादश देशितानि येषु खलु ।**
**स्वगुणाः पूर्वगुणैःसह सन्तिष्ठन्ते क्रमविवृद्धाः ॥ १३६ ॥**

**अन्वयार्थः**—(देवैः) सर्वदर्शी भगवन्तांनीं (श्रावकपदानि) श्रावकाच्या प्रतिमा (एकादश) अकरा (देशितानि) सांगितल्या आहेत. (येषु खलु) ज्यामध्यें

बरोबर (पूर्वगुणैःसह क्रमविवृद्धाः) पूर्वीच्या प्रतिमेमधील गुणांनीं सहित व क्रमाक्रमानें वाढविलेलें असें होऊन (स्वगुणाः) स्वीकारलेल्या प्रतिमेमधील आचारधर्म (संतिष्ठन्ते) राहतात.

**अर्थः**—भगवंतांनीं श्रावकाच्या अकरा प्रतिमा सांगितल्या आहेत. पुढील प्रतिमा पालन करितांना मागील सर्वहि प्रतिमांचें पालन करणें अवश्य आहे. अर्थातच श्रावक कोणास ह्मणावें व प्रतिमा ह्मणजे काय याचा विचार प्रथम कर्तव्य आहे. आचार्य समंतभद्र यांनीं आपल्या या अपूर्व ग्रंथास **श्रावकाचार** असें सार्थ नांव दिलें आहे. अणुव्रतें धारण करणाऱ्यास श्रावक ह्मणावें. जो अणुव्रतें धारण करितो-पालन करितो-तो श्रावक होय. पं. आशाधर यांनीं ' जो गुरुपासून मिळालेला उपदेश श्रवण करितो तो श्रावक होय ' अशी श्रावक या शब्दाची व्याख्या केली आहे. या संबंधीच्या अधिक खुलाशाबद्दल श्लो. सं. १ खालील मजकूर पाहण्यांत यावा. प्रतिमा ह्मणजे अवस्था-पायरी-पर्याय इत्यादि.

या अकरा प्रतिमा अशा सांगितल्या आहेत कीं, पहिल्या प्रतिमेपेक्षां दुसरी प्रतिमा धारण करणाऱ्यांचे कषाय अधिकाधिक मंद होत जातात. त्याच वेळीं आत्म्याचें परिणाम त्यामानानें अधिकाधिक शुद्ध होतात. ह्मणजे कषायांचा क्षय व आत्म परिणाम-शुभ परिणामाची-वृद्धि, असा क्रम सुरू होतो.

**अकरा प्रतिमाः**—(१) दर्शन प्रतिमा (२) व्रत प्रतिमा (३) सामायिक प्रतिमा (४) प्रोषध प्रतिमा (५) सचित्त त्याग प्रतिमा (६) रात्रीभोजन त्याग प्रतिमा (७) ब्रह्मचर्यप्रतिमा (८) आरंभ त्याग प्रतिमा (९) परिग्रह त्याग प्रतिमा (१०) अनुमति त्याग प्रतिमा (११) उद्दिष्ट त्याग प्रतिमा.

श्लोक १३७ ते १४७ अखेर या अकराहि प्रतिमाबद्दल क्रमशः आचार्यांनीं विवेचन केलें आहे.

### (१) दर्शन प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**सम्यग्दर्शनशुद्धः संसारशरीरभोगनिर्विण्णः ।**
**पंचगुरुचरणशरणो दर्शनिकस्तत्त्वपथगृह्यः ॥१३७॥**

**अन्वयार्थः**—(सम्यग्दर्शनशुद्धः) शुद्ध सम्यग्दृष्टी (संसारशरीरभोगनिर्विण्णः) संसार, शरीर व भोग यापासून विरक्त झालेला, (पंचगुरुचरणशरणः) अर्हतादि पंचपरमेष्टींच्या चरणास शरण मानणारा (तत्वपथगृह्यः) तत्वांचा-व्रतांचा जो मार्ग अशा अष्ट मूलगुणांना धारण करणारा- (दर्शनिकः) दर्शन-प्रतिमाधारी श्रावक होय.

**अर्थः**—(१) सम्यग्दर्शनाचे पंचवीस दोष आहेत. ते दोषरहित अथवा निरतिचार सम्यग्दर्शनाचें जो पालन करितो, (२) संसार, शरीर व भोग यांच्यापासून विरक्त म्हणजे संसाराबद्दल, आपल्या शरिरावर व भोगावर ममत्व ठेवित नाहींत, असे जे पंचपरमेष्ठी; ते पंचपरमेष्ठीच आपले तारक आहेत. त्यांनाच शरण गेलें पाहिजे. कारण शरण जाण्यास तेच योग्य व पात्र आहेत असें मानितो. इतरांना शरण गेल्यानें आपणांस सद्गति मिळणार नाहीं अशी त्याची ठाम खात्री असते. (३) अष्टमूलगुणाचें जो पालन करितो, अशा या त्रिगुणांनीं युक्त जो श्रावक तो दर्शन प्रतिमाधारी श्रावक होय. श्रावकाचे आठ मूलगुण कोणते हें श्लोक संख्या ६६ मध्यें वर्णिलें आहे. जो स्याद्वाद **परमागमावर** व्यवहार व निश्चय या दोन्हींनयानें दृढ श्रद्धा ठेवितो, जो जातिकुल इत्यादिकांचा अभिमान मुळींच धरीत नाहीं, इतर गुणीजनांच्या गुणाशीं तुलना करून त्यांच्या मानानें आपल्या अंगांत गुण नाहींत असें समजून आपणांस कमी समजतो, संसार, शरीर व भोग यावरील ममत्व अजिबात न सुटल्यास जो हे सर्व कांहीं मोहामुळें व अज्ञानामुळें मोहत्याग सर्वस्वी करितां आला नाहीं, असें समजतो, व जो पंचपरमेष्ठी हेच आपले तारक आहेत असें मानितो, तो सम्यग्दर्शनी-दर्शनप्रतिमाधारी-प्रथमप्रतिमाधारी-श्रावक होय.

### (२) व्रत प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**निरतिक्रमणमणुव्रतपंचकमपि शीलसप्तकं चापि ।**
**धारयते निःशल्यो योऽसौ व्रतिनां मतो व्रतिकः ॥१३८॥**

**अन्वयार्थः**—(यः) जो (निःशल्यःसन्) माया, मिथ्यात्व व निदान या तीन शल्यांनीं रहित होऊन (निरतिक्रमणं) अतिचारानें रहित (अणुव्रत-

पञ्चकं अपि) पांचहि अणुव्रतांना (च) आणि (शीलसप्तकं अपि) सात शीलांना देखील धारण करतो. (असौ) तो (व्रतिनां) गणधर देवादिकांकडून (व्रतिकः) व्रतप्रतिमाधारी (मतः) मानला गेला आहे.

**अर्थः**—माया, मिथ्यात्व व निदान असे शल्याचे तीन भेद आहेत. शल्यरहित व निरतिचार पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें अशा बाराव्रतांचें जो पालन करितो, तो द्वितीय व्रतप्रतिमाधारी श्रावक होय. तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें अशा या सात व्रतांना शीलव्रत असें म्हणतात. निदान म्हणजे तप, संयमादिकांच्या प्रभावामुळें कोणत्या तरी इष्ट फळांची इच्छा धरणें. पायांत बोचणारा कांटा जसा आपण काढून टाकितो, त्याप्रमाणें व्रतधारकानें मिथ्यात्व, माया व निदान हीं तीन शल्यें मनांतून काढून टाकिलीं पाहिजेत.

### (३) सामायिक प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**चतुरावर्तत्रितयश्चतुः प्रणामःस्थितो यथाजातः ।**
**सामयिको द्विनिषिद्यस्त्रियोगशुद्धस्त्रिसन्ध्यमभिवन्दी ॥१३९॥**

**अन्वयार्थः**—(चतुरावर्तत्रितयः) चार दिशेला तीन आवर्त करून (चतुःप्रणामः) चार नमस्कार करणारा (स्थितः) कायोत्सर्गानें स्थित असणारा (यथाजातः) बाह्याभ्यंतर परिग्रहासंबंधी चिंतेनें रहित असणारा (द्विनिषद्यः) खड्गासन किंवा पद्मासन घालणारा (त्रियोगशुद्धः) मन, वचन, कायेनी शुद्ध असणारा (त्रिसंध्यं) तीन वेळेला-सकाळ, दुपार, व संध्याकाळ (अभिवन्दी) वन्दना करणारा (सामयिकः) सामयिक प्रतिमाधारी होय.

**अर्थः**—सामायिकाला सुरवात करण्यापूर्वी सामायिक करणाऱ्यांनीं खड्गासनानें उभे राहून पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा चारी दिशेपैकीं प्रत्येक दिशेला तीन आवर्त व एक नमस्कार घालावेत. यानंतर खड्गासन अगर पद्मासन घालून सामायिक करावा. सकाळ, दुपार व संध्याकाळ अशा तीन वेळीं सामायिक करावें. सामायिकाचें वेळीं बाह्याभ्यंतर परिग्रहाची चिंता

सोडावी. त्याचा विचार करूं नये. मन, वचन व काया ही शुद्ध ठेवण्यांत यावी, अशा विधीनें जो सामायिक करितो तो सामायिक प्रतिमाधारी श्रावक होय.

### (४) प्रोषध प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**पर्वदिनेषु चतुर्ष्वपि मासे मासे स्वशक्तिमनिगुह्य ।**
**प्रोषधनियमविधायी प्रणिधिपरः प्रोषधानशनः ॥१४०॥**

**अन्वयार्थः**-(मासे मासे) प्रत्येक महिन्यामध्यें (चतुर्षुअपि पर्वदिनेषु) दोन चतुर्दशी व दोन अष्टमी अशा चार पर्वांचे दिवशीं (स्वशक्ति) आपल्या शक्तीला (अनिगुह्य) न लपवितां (प्रणधिपरः) शुभ ध्यानामध्यें लीन होऊन (प्रोषधनियमविधायीं) नियमपूर्वक प्रोषधोपवास करणारा (प्रोषधानशनः) प्रोषधोपवास प्रतिमाधारी समजावा.

**अर्थः**—प्रत्येक महिन्यांतील अष्टमी व चतुर्दशी या पर्वाच्या दिवशीं आपल्या शक्त्यनुसार अन्नत्याग करून धर्मध्यानांत ते दिवस घालविणाऱ्यास प्रोषधोपवासधारी श्रावक असें ह्मणतात. शक्त्यनुसार अन्नत्याग करावा असें ह्मटलें आहे. त्याचें कारण असें कीं, प्रकृतीच्या, वयाच्या व इतर कारणांनीं सर्वांनाच सारखा उपवास शक्य नसतो; ह्मणून उपवास, प्रोषधोपवास, अनुपवास वा रसत्याग इत्यादिकांपैकी जें शक्य असेल तें करावें; मात्र असें करितांना जें करण्याची आपली शक्ति व ताकद आहे ती छपवून ठेवून इष्ट व जरूर त्यापेक्षां कमी प्रतीचें व्रत घेऊं नये. उपवास, प्रोषधोपवास इत्यादिकांबद्दल अधिक खुलासा श्लोक नं. १०६ खालीं करण्यांत आला आहे, तो पहावा.

पर्व दिवशीं एकवेळ जेवण करणारे अनेक आहेत परंतु तो दिवस धर्मध्यानांत घालविणारे फारच थोडे. या व्रताची पूर्तता होण्यास (१) एकाशन व (२) धर्मध्यान या दोहोंची जरूरी आहे. कांहींच्यामतें पर्वाच्या-अष्टमी-चतुर्दशीच्या दिवशीं कोणत्याहि परिस्थितींत-एकासन-एकवेळच जेवण करणें जरूर आहे.

### (५) सचित्तत्याग व्रतधारी श्रावकांचें स्वरूप.

**मूलफलशाकशाखाकरीरकन्दप्रसूनबीजानि ।**
**नामानि योऽत्ति सोऽयं सचित्तविरतो दयामूर्तिः ॥१४१॥**

**अन्वयार्थः**—(यः) जो (दयामूर्तिः) दयाळु (आमानि) कच्चे (मूलफलशाकशाखाकरीरकन्दप्रसूनबीजानि) मुळा, फळें, भाजी, फांद्या, उसाच्या गांठीं, कन्द, फुलें व बीज (न अत्ति) खात नाहीं. (सः अयं) तो हा (सचित्तविरतः) सचित्तविरत प्रतिमाधारी ('भवति') होतो.

**अर्थः**—जो कच्चें न-शिजावेलेलें-फळ, व फूल व बीजादिक न खाण्याचें व्रत घेतो, त्याला सचित्तत्याग प्रतिमाधारी श्रावक असें ह्मणतात. या श्लोकांत जे जे कच्चे पदार्थ वर्ज्य मानिले आहेत, त्यासंबंधीं थोडासा अधिक खुलासा करणें जरूर आहे. या व्रतामध्यें कच्चे; अशुष्क, सचित्त व अंकुरोत्पादक पदार्थ खाणें वर्ज्य मानिलें आहे. असें मानितांना थंड पाण्याचा सचित्त पदार्थांत समावेश केला असल्यानें पर्वदिवशीं थंड पाणी न पितां तें तापवून पिणें जरूर आहे. मूळ ह्मणजे गाजर व मुळा इत्यादि जातीचे पदार्थ, फल ह्मणजे आंबा, लिंबू इत्यादि-शाख ह्मणजे पानभाजी-अंबाडी, शेपू, हरभऱ्याची भाजी इत्यादी, शाखा ह्मणजे फांद्या उदाहरणार्थ अळूसारखे पदार्थ. करीर ह्मणजे नवी, ताजी, कोमल पानें, कंद म्हणजे सूरण, रताळ इत्यादी. प्रसून म्हणजे सर्व प्रकारचीं फुलें, बीज, जोंधळा, गहूं, हरभरा इत्यादिक; कारण यामध्यें अंकुर उत्पन्न करण्याची शक्ति असते. म्हणून अशा पदार्थांना सचित्त पदार्थ म्हणतात. थंड पाणी सचित्त म्हणून वर्ज्य, परंतु पाणी तापविण्यापूर्वी जें वस्त्रगालित असावें, असा निर्बंध या व्रतांत अगर इतर कोणत्याही व्रतांत घातलेला स्पष्टपणें दिसून येत नाहीं. यासंबंधीं यापूर्वी थोडेसें विवेचन केलेंच आहे.

या श्लोकांचा विचार करितां अशी शंका येते कीं, या श्लोकांत सांगितलेले जिन्नस कच्चे न खातां शिजवून अगर भाजून खाल्लें तर चालेल काय? तसें करणें धर्मबाह्य होईल? उदाहरणार्थ रताळा शिजवून अगर भाजून खाल्ला

तरी हें व्रतपालनच होईल ? जो विचारसरणी रताळ्याबद्दल तीच इतर कंदाबद्दल, मूळाबद्दल व इतर पदार्थांबद्दल समजण्यास काय हरकत आहे ?

श्लोकाचा सरळ अर्थ विचारांत घेतां या श्लोकांत नमूद केलेल्या जातीचे पदार्थ शिजवून, वाळवलेले अगर भाजून खाण्यास हरकत येऊं नये असें दिसतें; परंतु या श्लोकांतील सचित्त व अचित्त असे दोन्ही प्रकार त्याज्य करणेंच इष्ट होईल अगोदरची-मागील-प्रतिमा पुढील प्रतिमेस पूरक होते म्हणून पुढील प्रतिमा पालन करतांना मागील प्रतिमा पालन करणें जरूर आहे, असा निर्बंध घातला आहे. उदाहरणार्थ पांचवी-सचित्त-त्यागाची प्रतिमा धारण करणाऱ्याला चवथी प्रोषधोपवासाची प्रतिज्ञा कशी पूरक व पुष्टीदायक होते हें पहावें. चवथ्या प्रतिमेंत प्रोषधोपवासाबद्दल सांगितलें आहे. एकभुक्ति–एकासन–करावयाचें आहे व तसें करितांना कच्चे कंदमूलादि पदार्थ वर्ज्य केले तर 'अधिकस्य अधिक' असें फल त्यास साहजिकच मिळेल. प्रोषधोपवास व्रतधारी श्रावकास मद्य, मांस व मद यांचा त्याग अवश्य आहे; परंतु सचित्त व कंदमूलादि पदार्थ वर्ज्य सांगितलें नाहींत.

### (६) रात्रिभुक्तित्याग प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**अन्नं पानं खाद्यं लेह्यं नाश्नाति यो विभावर्याम् ।**
**स च रात्रिभुक्तिविरतः सत्त्वेष्वनुकम्पमानमनाः ॥१४२॥**

**अन्वयार्थः**—(सत्वेष्वनुकम्पमानमनाः च) प्राणिमात्राच्या ठिकाणीं दयाबुद्धि ठेवणारा असा जो (विभावर्यां) रात्रौ (अन्नं पानं खाद्यं च लेह्यं) अन्न, पेय, खाद्य व लेह्य यांना (न अश्नाति) खात नाहीं (सः) तो (रात्रि-भुक्तिविरतः) रात्रिभुक्ति प्रतिमाधारी ('आसी') होय.

**अर्थः**—अन्न, पान, खाद्य व लेह्य असें चार प्रकारचें पदार्थ रात्रीं न खाणाऱ्या श्रावकाला रात्रिभुक्तित्याग प्रतिमाधारी श्रावक असें म्हणतात. या मतांत रात्रीं औषध घेणें, पानसुपारी आदि खाणें वर्ज्य मानावेत. अहिं-साणुव्रत व दुसरी प्रतिमा-व्रतधारी यांत रात्रिभोजनत्याग प्रतिमेचा समावेश

होतो. तथापि त्यांत कृत, कारित व अनुमोदन इत्यादि सर्व प्रकारच्या त्यागाचा समावेश होत नाहीं; परंतु रात्रिभोजनत्याग या प्रतिमेंत कृत, कारित व अनुमोदितच पापांचाच काय पण मन, वचन व काया यामुळें घडणाऱ्या पापांचाहि त्याग सांगितला आहे. यामुळें अहिंसाणुव्रत व दुसरी प्रतिमा ही या व्रतपालनामुळें अधिक निर्मलपणानें पालन केली जातात. अहिंसाणुव्रत व्रत-प्रतिमा या दोहोंपेक्षां यांत हें वैशिष्ट्य आहे व या महत्वाच्या फरकामुळें सहाव्या प्रतिमेंत याची गणना केली आहे. याच प्रतिमेला ' दिवामैथुनत्याग ' असें दुसरेंहि नांव कांहीं आचार्य देतात. दिवामैथुनत्याग हा ब्रह्मचर्याणुव्रताचा अतिचार आहे, असेंहि कित्येकांचें मत आहे. येथें एका रूढीचा विचार कर्तव्य आहे. जैन रात्रीं जेवत नाहींत, हें इतरांनाहि कळून चुकलें आहे.

रात्रीं जेवण न करणारे आपल्यांत अनेक आहेत. यापूर्वींच्या पांचहि प्रतिमा रात्रींभोजनत्यागी श्रावक पाळतोच असें नाहीं. रात्रीं भोजनत्याग करणारे ओला अगर वाळलेला हरभरा, मूग खातात. जोंधळ्याचा, मक्याचा व गव्हाचा हुरडा खातात; असें जिन्नस खाणारे केवळ दिवसा जेवतात व रात्रीं जेवत नाहींत. अशा परिस्थितींत त्यांना सहावा प्रतिमाधारी श्रावक ह्मणतां येईल ? सारासार विचार न करितां रूढीचें अनुकरण कसें होतें, याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण नव्हे काय ?

आचार्य अमितगति यांच्या श्रावकाचारांतील पांचव्या परिच्छेदांतील पहिल्याच श्लोकांत या व्रतपालनांत पुष्टी व दृढता येण्यासाठीं ' मद्यमांसमधु रात्रिभोजनं क्षीरवृक्षफलवर्जनं त्रिधा ' ह्मणजे मद्य, मांस व मध, रात्रिभोजन-त्याग व ज्या वृक्षांना दूध-चीक-येतें, अशा झाडांचीं फळें-उदुंबर-यांचा त्याग करावा असें ह्मटलें आहे. यावरून रात्रिभोजनत्यागाला श्रावकाच्या अकरा प्रतिमेंत न घालतां श्रावकांच्या आठ मूलगुणांत याचा समावेश केला आहे. हा मतभेद दाखविल्यानंतर रात्रिभोजन-त्यागासंबंधीं अमितगति आचार्यांच्या मताची थोडीशी ओळख करून देणें आवश्यक आहे असें वाटतें. वस्त्रगाळित

पाणी पिणें व सूर्यास्तापूर्वी जेवणें, या दोन बाबी व जैन यांचे समीकरण झालेलें नित्य व्यवहारांत दिसून येतें. एका आचार्यांनीं सूर्यास्तापूर्वीच्या जेवणाचा आठ मूलगुणांत व दुसऱ्या आचार्यांनीं श्रावकांच्या प्रतिमेंत कां घातलें असावें ? याबद्दलच्या वादांच्या खोल पाण्यांत शिरण्याचा आमचा अधिकार नाहीं. अमितगति श्रावकाचाराच्या श्लोक संख्या ४६ मध्यें एकवारच जेवण करण्याची उत्तम पुरुषांत, दिवसा परंतु दोनवेळा जेवण करणाऱ्यांची मध्यम पुरुषांत व दिवसा व रात्रीं जेवण करणाऱ्यांची अधम पुरुषांत गणना केली आहे. श्लोक संख्या ४७ मध्यें दोन घटिका दिवस वर आल्यावर व सूर्यास्तापूर्वी दोन घटिका आधीं जेवण करावें, असें सांगितलें आहे. दिवे लावण्याची वेळ झाली आहे. तळ हातावरील रेषा दिसतात न दिसतात, अशावेळीं जेवण आटोपून रात्रीं जेवण केल्याच्या पापांतून मुक्त होण्याची ज्यांची धांदल झालेली दिसते, त्यांचा गैरसमज दूर करण्यासाठीं हा आधार दिला आहे.

मन, वचन व काया या तीन प्रकारांनीं तसेंच कृत, कारित व अनुमोदित याहि तीन प्रकारांनीं रात्रीभोजनत्याग करावयाचा आहे, असें सांगितलें आहे. सूर्यास्तापूर्वी जेवण झालें नाहीं, याची हळहळही वाटूं देऊं नये. तसेंच इतरांना रात्रीं जेवण घालणें अगर दुसऱ्याकडून जेऊं घालविणें अगर जेऊं घालणाऱ्यास संमति देणेंहि वर्ज्य करणें जरूर आहे. तसें न होईल तर आठ मूलगुणापैकीं या गुणाचें पालन होणार नाहीं. सूर्यास्तापूर्वी दोन घटिका आधीं जेवण केल्यानें एका महिन्यांत दोन उपवास केल्याचें श्रेय मिळतें; असेंहि आचार्य अमितगतिचें मत आहे.

श्लोक संख्या ६५ मध्यें रात्रीं जेवण करणाऱ्या स्त्रिया ह्मणजे डुकरीण, भिल्लीण, वानरीण, परटीण इत्यादिसारखी निंद्य आहे व ती पुत्रहीन, धनहीन व विधवा होईल असें ह्मटलें आहे. या उलट जी स्त्री अगर पुरुष रात्रीं जेवण करीत नाहीं, त्यांना बहिणभाऊ, पुत्रपौत्र, दागदागिने, आरोग्य इत्यादिक ऐहिक सुखाचा लाभ होतो, असें श्लोकसंख्या ६७ मध्यें वर्णिलें आहे.

**टीप:**—श्लोकसंख्या ७३ मध्यें मात्र तीन मकार व पांच उदुंबर अशा आठ प्रकारच्या पदार्थांच्या त्यागालाच मूलगुण असें आचार्य अमितगति म्हणतात. श्लोकसंख्या एक यांत रात्रीभोजन त्यागाचा मूलगुणांत समावेश केला गेला असतां श्लोकसंख्या ७३ मध्यें रात्रींभोजनत्यागाचें नांवही नाहीं. आचार्य अमितगति यांच्या लिखाणांत हा मोठाच गैरमेळ दिसतो. रात्रीं जेवण करणाऱ्यांना कोणकोणत्या दुःख परंपरेची धमकी व न जेवण करणाऱ्यांना कोणकोणत्या लाभाची आशा दाखविली आहे, हें वर स्पष्ट झालें आहे. तथापि त्यांतील हेतूकडेच पाहणें जरूर आहे. रात्रिभक्तव्रत नांवाची सहावी प्रतिमा कांहीं ग्रंथांतून सांगितली आहे. सागारधर्मामृत-अध्याय सातवा-श्लोकसंख्या १२।१३।१४ व १५ मध्यें याबद्दल विवेचन केलें आहे.

रात्रिभक्तव्रतो रात्रौ । स्त्रीसेवावर्तनादिह ॥
निरूच्यतेऽन्यत्र रात्रौ चतुराहारवर्जनात् ॥१५॥

**अर्थ:**—'चारित्रसारादि ग्रंथांत "आम्ही रात्रीच्या वेळींच स्त्री संभोग करूं, दिवसा करणार नाहीं" असें व्रत घेणें ह्यास 'रात्रिभक्तव्रत' असें मानिलें आहे; आणि रत्नकरंडकांत 'रात्रीं चारी प्रकारच्या आहाराचा त्याग करणें असा अर्थ केला आहे.'

आचार्य समंतभद्र-श्रावकाचार व चारित्रसार यांत श्रावकाची सहावी प्रतिमा कोणती याबद्दल मतभेद असल्याचें स्पष्ट दिसतें. आचार्य समंतभद्रांनीं चारहि प्रकारचें अन्न रात्रीं न घेणाऱ्यास सहावें व्रतप्रतिमाधारी श्रावक असें ठरविलें आहे. चारित्रसारांत स्वस्त्रीशीं दिवसा संभोग न करितां, तो रात्रींच करीन असें व्रत घेणाऱ्यास सहावें व्रत प्रतिमाधारी ठरविलें आहे.

यांचे संभाव्य कारण असें दिसतें कीं, श्रावकाच्या प्रतिमेची संख्या तर कायमच ठेवावयाची व दुसरें असें कीं रात्रिभोजनत्यागाला कांहींनीं अष्टमूलगुणांत व कांहींनीं अणुव्रतांत समावेश केला आहे. आचार्य समंतभद्रानीं रात्रिभोजनत्यागाच्या अणुव्रतांत अगर अष्टमूलगुणांत समावेश केला नाहीं. मागील

व पुढील विवेचन विसंगत न व्हावें व तें सुसंगत असावें पण प्रतिमांची संख्या तर वाढूं अगर कमी होऊं नये म्हणून हा प्रयत्न झालेला दिसतो.

### (७) ब्रह्मचर्य प्रतिमाधारी श्रावकांचें स्वरूप.

**मलबीजं मलयोनिं गलन्मलं पूतिगन्धि बीभत्सम् ।**
**पश्यन्नंगमनंगाद्विरमति यो ब्रह्मचारी सः ॥१४३॥**

**अन्वयार्थः**—(मलबीजं) मलाचें बीज (मलयोनि) मलोत्पत्तीचें कारण (गलन्मलं) ज्यापासून मल वाहत आहे असें (पूतिगन्धि) दुर्गंधियुक्त (बीभत्स) किळसवाणें असें (अंग) शरीर (पश्यन्) पाहणारा (यः) जो (अनङ्गात्) कामोपभोगापासून (विरमति) विरक्त होतो. (सः) तो (ब्रह्मचारी) ब्रह्मचारी जाणावा.

**अर्थः**—मातेचें रक्त व पित्याचें वीर्य, यापासून देहाची-शरीराची-निर्मिति झाली आहे. यावरून या शरीराचें बीज, रक्त व वीर्य अशा मळांत आहे. शरीराचें मूळ बीज मळ असतांहि पुनः हें शरीर मलयुक्त-इतरहि मलानें भरलेलें-आहेच. योनी व शरीराचें नऊही भाग मलानें भरलेले आहेत. अशा किळसवाण्या व घाणेरड्या शरीराच्या अवयवाबद्दल विरक्त होणें, त्यांचा भोग वर्ज्य करणें याला ब्रह्मचर्य प्रतिमाधारी असें म्हणतात.

हें व्रत धारण करणाऱ्याला स्वतःची स्त्रीहि वर्ज्य आहे. ब्रह्मचर्य अणुव्रतांत तें व्रत अणुव्रत असल्यानें स्वतःची स्त्री भोगाला त्याज्य मानलेली नाहीं; परंतु ही-सातवी-प्रतिमा-धारण करणाऱ्याला स्वतःची स्त्रीही त्याज्य मानावी लागते.

प्रत्यक्ष स्त्रीसंभोगच वर्ज्य मानलेलें आहे असें नाहीं तर आपल्या विवाहित स्त्रीशेजारीं झोंपणें, पूर्ववयांतील भोगोपभोगाच्या सुखदुःखाचें स्मरण न करणें आणि कामवासनेच्या गोष्टींचें चिंतन न करणें आणि त्याबद्दलचे विचारही मनांत न येऊं देणें, यांचा ब्रह्मचर्य प्रतिमेंत समावेश होतो; त्यामुळें याहि गोष्टी वर्ज्य कराव्यात.

शिवाय कामोद्दीपक अन्न वर्ज्य करावेत, कामोद्दीपक वस्त्र वर्ज्य करावेत, गीत, नृत्यादिक ऐकणें व पाहणेंही वर्ज्य करावीत. अत्तरादि सुगंधित

जिन्नस व फुलें यांचा त्याग करावा. तसेंच शृंगार व हास्यरस असलेली नाटकें, सिनेमा व पुस्तकें हीं पाहूं व वाचूं नयेत. तांबूलादिक जिन्नसहि वर्ज्य समजावेत.

वरीलप्रमाणें ज्याचें आचरण आहे तो-ब्रह्मचर्यव्रत प्रतिमाधारी श्रावक होय.

या प्रतिमेंतील तत्वाचें विशेष विवरण **परमात्मप्रकाश** महाधिकार छाया २७५ पान ४०७।४०८ वर केलें आहे, त्याचा सारांश-स्त्री ही निव्वळ पापाचें निवासस्थान आहे. स्त्री ही यमराजाच्या हातचा बळकट पाश आहे. स्त्रीवांचून असलेल्या घरांत राहणें याला गृहवासच ह्मणतां येणार नाहीं. घरांत असणारी स्त्री ह्मणजे घर व संसार, शुद्ध ज्ञान व दर्शन यांचा प्रतिपक्षी शत्रु-आहे. विषय व इंद्रियें यांच्या योगानें मन व्याकुळ, कलुषित व कषाययुक्त होतें. मन शुद्ध करण्याकरितां स्त्रीचा त्याग करणें जरूर आहे.

ब्रह्मचर्य प्रतिमाधारी श्रावकानें स्त्रीचा त्याग करण्याचा असतो. स्त्रीवरील ममत्व सुटल्यावर इतर परिग्रहावरील ममत्व सोडणें म्हणजे हातचा मळ. स्त्री व परिग्रहावरील ममत्व सुटलें म्हणजे स्वतःच्या शरीरावरील ममत्व सोडण्याचा उपदेश होणार व त्यांत यश न आलेच तर आश्चर्य !!

या छायेंत ग्रंथकारांनीं 'गृहवासम्' असा शब्दप्रयोग उपयोगांत आणिला आहे व संस्कृत वृत्तींत 'न गृहं गृहामित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते' ही उक्ति विचारांत घेऊन 'गृहवासम्' याचा अर्थ 'स्त्री' असा केला आहे. नित्य व्यवहारांतहि 'घरीं कसें आहे' असा वाक्यप्रयोग उपयोगांत आणितो, त्यावेळीं बायको-कुंटुब कसें आहे, हाच अभिप्राय व्यक्त करितों.

छाया २७५ मधील **गृहवासम्** याचा अर्थ निव्वळ स्त्री असाच अकुंचित अर्थ न करितां संसार-स्त्रीसह सर्व परिग्रह-असा केला तरी अर्थांत कांहीं फरक पडतो असें दिसत नाहीं. गृहवासम् हा शब्द व्यापक आहे व त्यामुळें त्यांत 'स्त्री' चा समावेश होतो. स्त्री व परिग्रह हे यमाचे मजबूत पाश आहेत; व त्यांनीं यम मनुष्यमात्रांना संसारांत जखडून टाकतो, कारण संसारी मनुष्य स्त्रीवरील व परिग्रहावरील ममत्वामुळें इंद्रियाधीन राहतो व त्यामुळें त्यांची चित्तशुद्धि होत नाहीं.

संस्कृत वृत्तींतील अर्थ बरोबर नाहीं, असा ह्मणण्याचा इरादा नाहीं परंतु अशा अकुंचित अर्थामुळें स्त्रीसमाजावर मोठाच अन्याय होईल ह्मणून हा खुलासा केला आहे.

## हिंदुधर्मांतील चार आश्रमाबद्दलचा विचार.

वैदिक धर्मांतील चार आश्रम:—

हिंदुधर्मांत मनुष्याच्या विकासासाठीं जीवनाच्या चार पायऱ्या सांगितल्या आहेत व त्यांनांच आश्रम या नांवानें संबोधिलें आहे. (१) ब्रह्मचर्याश्रम (२) गृहस्थाश्रम (३) वानप्रस्थाश्रम व (४) संन्यासाश्रम असें हे अनुक्रमें चार आश्रम होत. संन्यास हें अंतिम ध्येय. हें जैनधर्म व हिंदुधर्म यांनीं मानिलें आहे. हिंदुधर्मांतील वानप्रस्थाश्रम व श्लोक संख्या १४७ मध्यें वर्णिलेला उद्दिष्टविरत प्रतिमाधारी श्रावक यांत बरेंच साम्य आहे. वानप्रस्थ ह्मणजे घर कायमचे सोडून वनास जावयास निघालेला. वानप्रस्थांनीं वनांत रहावयाचें असतें. या दोन्ही धर्मांच्या गृहस्थाश्रमाच्या या लक्षणांत फरक नाहीं.

हिंदुधर्मांतील वानप्रस्थाश्रम व संन्यासाश्रम व जैनधर्मांतील उद्दिष्टविरत प्रतिमाधारी व मुनि यांत कांहीं बाबतींत साम्य दिसत असले तरी अनेक बाबतींत महत्वाचे फरक आहेत. दिगंबरवृत्ति ही हिंदुधर्मांत मुळींच नाहीं.

या सर्वांपेक्षाहि ब्रह्मचर्याश्रम व जैनधर्मांतील ब्रह्मचर्याणुव्रत श्लो. सं. ५९ व ब्रह्मचर्य प्रतिमाधारी (श्लो. सं. १४३) यांत कोणतेच साम्य नाहीं.

हिंदुधर्मांत ब्रह्मचर्याश्रमाला प्रथमस्थान दिलें आहे व उपनयन-मौंजिबंधन-यापासून या आश्रमास सुरवात होते व विवाहानंतर हा आश्रम संपुष्टांत येऊन गृहस्थाश्रमास सुरवात होते. ब्रह्मचर्याश्रम ह्मणजे प्रायः विद्याभ्यासाचा काळ. विद्याभ्यास ह्मणजे पुस्तकी शिक्षण एवढाच अर्थ घेतल्यास व हा विद्याभ्यास ब्राह्मणवर्णानेंच करावयाचा ह्मटल्यास इतर तीन वर्णांतील लोकांना ब्रह्मचर्याश्रम हा नाहींच असें ह्मणावें लागेल. उपनयनाचा अधिकार शूद्रांना नसल्यानें त्यांच्याबाबतींत तर हा पहिला आश्रम शक्यच दिसत नाहीं.

(१) ब्रह्मचर्याश्रमांत मुख्यतः ज्ञानाची उपासना. ऋषिऋण, पितृऋण व देवऋण, अशा प्रकारचीं तीन ऋणें. यांतून प्रत्येकाला मुक्त व्हावयाचें असतें. ब्रह्मचर्याश्रम-विद्यार्थीदशा-यांत आपण अधिकांत अधिक उत्कृष्ट ज्ञान संपादन करून ऋषिऋण फेडावयाचें. ऋषींच्या ज्ञानाची परंपरा चालू ठेवणें, म्हणजेच या ऋणांतून मुक्त होणें. ब्रह्मचर्याश्रमी कसा असावा ? तो सत्प्रवृत्त, दृढ अभ्यासी, आशावान्, दृढ निश्चयी व सामर्थ्यसंपन्न असावा. पृथ्वीवरील लक्ष्मी त्याच्या पायीं लोळण घेत येईल. ऋद्धि व सिद्धि त्याच्या घरीं पाणी भरावयास येतील.

ब्रह्मचर्य म्हणजे एकेंद्रियाचा संयम नसून सर्व जीवनाचा संयम आहे; म्हणूनच उत्कृष्ट ब्रह्मचर्याश्रमांतून उत्कृष्ट गृहस्थाश्रम निर्माण होतो. मानसिक, शारिरिक व बौद्धिक सामर्थ्य ब्रह्मचर्याश्रमांत संपादन करणाऱ्याचा गृहस्थाश्रम सुखाचा व उत्कृष्ट होऊन ' धन्यो गृहस्थाश्रमः ' ही युक्ति सार्थ ठरेल. (२) गृहस्थाश्रम म्हणजे संयमाची शाळा. खरा गृहस्थाश्रम म्हणजे एक प्रकारें तपच आहे. गृहस्थाश्रमांत परोपकार, त्याग व प्रेम इत्यादिकांचे धडे आपण देत व घेत असतो. मर्यादित कुटुंबांत जे सेवेचे, त्यागाचे व परोपकार इत्यादिकांचे धडे घेतो, ते समाजास, राष्ट्रास व जगास द्यावयाचे आहेत.

(३) वान-प्रस्थ-म्हणजे वनास निघालेला. वानप्रस्थावस्थेनंतर (४) संन्यास. सं-न्यास म्हणजे स्वतःला विसरणें एवढेंच नाहीं. माझे कुटुंब, माझा समाज, माझी जात व माझा देश इत्यादिकांचें ममत्व सोडणें. माझा मान, माझा पैसा अर्थात् 'मी' व 'माझें' यांचा विसर पडणें म्हणजे संन्यास. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे संन्यास म्हणजे समदृष्टी. 'मी' व 'माझें' ही सुटल्यामुळें 'तो' सर्वांचा व 'सर्व' त्याचे. संन्यासी वाऱ्याप्रमाणें सर्वांना जीवन व सूर्याप्रमाणें सर्वांना तेज व पावसाप्रमाणें पाणी देतो. संन्याशानें निर्विकार म्हणजे विश्वाकार व्हावयाचें. या चार आश्रमापैकीं आज फक्त मोडकातोडका व रोडका गृहस्थाश्रम शिल्लक राहिला आहे.

ब्रह्मचर्य प्रतिमाधारी श्रावकांची जी लक्षणें जैनधर्मानें दिलीं आहेत, त्य लक्षणासारखी स्वतंत्र संस्था हिंदुधर्मांत असलेली दिसत नाहीं. परस्त्री-त्याग-ब्रह्मचर्याणुव्रत-या बाबतींत दोन्हीं धर्मांत साम्य दिसतें.

### (८) आरंभत्याग प्रतिमाधारी श्रावकाचें स्वरूप.

**सेवाकृषिवाणिज्यप्रमुखादारंभतो व्युपारमति ।**
**प्राणातिपातहेतोर्योऽसावारम्भविनिवृत्तः ॥ १४४ ॥**

**अन्वयार्थः**—(प्राणातिपातहेतोः) प्राणिघात होण्यास कारणीभूत (सेवाकृषिवाणिज्यप्रमुखादारम्भतः) नोकरी, शेतकी, व्यापार इत्यादि आरम्भापासून (यः) जो (व्युपारमति) विरक्त होतो. (असौ) तो हा (आरम्भविनिवृत्तः) ' आरम्भविनिवृत्त ' आरम्भत्याग प्रतिमाधारी ('अस्ति') होय.

**अर्थः**—दुसऱ्याचा नोकर असतां ती नोकरी सोडणें, व्यापार व शेती इत्यादि उपजीविकेची साधनें सोडणें-ह्मणजे शेती अगर व्यापार न करणें, तसेंच आपला लेखन-अगर-शिल्पकला-सुतार गवंडी आदि हीं उपजीविकेचीं साधनें असल्यास तीं सोडून देणें, कारण हीं सर्व हिंसाकृत्याला कारणीभूत आहेत. अशाप्रकारें कोणत्यांहि उपजीविकेच्या साधनाचा आरंभ न करण्याची प्रतिज्ञा करणें, याला आरंभत्याग प्रतिमाधारी श्रावक असें ह्मणतात.

उपजीविकेच्या साधन त्यागाबरोबरच स्त्रीपुत्रादिकांच्या परिग्रहाचाही त्याग केला पाहिजे. थोडेसें व आपल्या स्वतःच्या जरूरीपुरतें द्रव्य जवळ ठेवावें, मात्र आरंभाला कारण होईल, अशा कामीं त्याचा उपयोग करूं नये. उदाहरणार्थ आपल्याजवळ ठेविलेल्या अशा द्रव्यापैकीं कांहीं द्रव्य व्यापार व शेती अगर इतर धनोत्पादक धंद्यासाठीं व्याजी अगर बिनव्याजी देऊं नये. आपल्याकडे ठेवून घेतलेल्या द्रव्याचा सर्वस्वीं आपल्यासाठींच उपयोग न करितां त्यांतूनहि जरूरीपुरतें इतरांना औषधपाण्यासाठीं व इतर अशाच जरूरीचें कामासाठीं दान म्हणून द्यावें. असें केल्यानें जवळ ठेविलेल्या परिग्रहाचेहि प्रमाण कमी होत जाईल. शेवटीं त्यावर कोणी डल्लाच मारला तर आपलें कर्म म्हणून स्वस्थ

बसावें; तें परत मिळविण्याचा प्रयत्न करूं नये. मी रागी होतो, अनुरागी होतो व मोहीहि होतो, आयतेंच कर्मानें तें द्रव्य हिरावून नेलें आहे; व परिग्रह कमी करण्यास मदत झाली आहे, असें समजून कर्मांचें आभार मानावेत. गेल्याचें दुःख करूं नये.

### (९) परिग्रहत्याग प्रतिमाधारी श्रावकाचें लक्षण.

**बाह्येषु दशसु वस्तुषु ममत्वमुत्सृज्य निर्ममत्वरतः ।**
**स्वस्थः सन्तोषपरः परिचित्तपरिग्रहाद्विरतः ॥ १४५ ॥**

**अन्वयार्थः**—(बाह्येषु दशसु वस्तुषु) दहा प्रकारच्या बाह्य परिग्रहावरील (ममत्वं) मोहबुद्धी (उत्सृज्य) सोडून (निर्ममत्वरतः) वैराग्यामध्यें प्रेम ठेवणारा (स्वस्थः) मायादिकांनीं रहित असणारा व (सन्तोषपरः) संतुष्ट असणारा अर्थात परिग्रहाची इच्छा न बाळगणारा (परिचित्तपरिग्रहात्) परिचित्त परिग्रहापासून (विरतः) विरक्त आहे अर्थात परिग्रहत्याग प्रतिमाधारी आहे.

**अर्थः**—दहा प्रकारच्या बाह्य परिग्रहाचा त्याग केलेल्या व्रतधाऱ्यास परिग्रहत्याग प्रतिमाधारी श्रावक म्हणतात. हे बाह्य परिग्रह दहा प्रकारचें असून त्यांचा मोह सोडून व फिरून परिग्रहाचा संग्रह न करण्याची इच्छा धरणें; याला परिग्रहत्याग प्रतिमा म्हणतात. हें व्रत धारण करणाऱ्यांनीं आपल्याजवळ सोनें, चांदी अगर असलेंच इतर द्रव्य ठेवावयाचें नसतें. ऊन, वारा व थंडी यांच्या निवारणासाठीं जरूर तेवढा व हलक्या किंमतीचा कपडा ठेवावयाचा असतो. हलक्या किमतीचा असें म्हणण्याचे कारण कीं, रेशमी अगर भरजरी असा कपडा वापरूं नये. त्याचप्रमाणें पाणी गाळण्यासाठीं व हातपाय पुसण्यासाठीं जरूर तेवढा हलक्या किंमतीचा कपडा जवळ ठेवण्याचा असतो. पाणी पिण्यासाठीं एक भांडें ठेवावें. आपल्या घरीं जाऊन आहारादि घेण्यास त्यास हरकत नाहीं; मात्र हें घर माझें आहे, इत्यादिकांचें ममत्व त्यानीं ठेवूं नये. दहा प्रकारचे बाह्य परिग्रह म्हणजे (१) जमिनी (२) घरें (३) चांदी

(४) सोनें (५) जनावरें (६) धान्य (७) दासी (८) दास नोकर-चाकर (९) कपडालत्ता व (१०) भांडीकुंडी. अंतरग-मनाचें-प्रग्रिह निराळे आहेत.

उपनिषदांतील खालील वचन उपयुक्त आहेः—

मोघमन्नं विंदते अप्रेचताः
सत्यं ब्रवीमि वध इत सतस्य।
न अर्थमणं पुष्यति नो सखाय
केवलाघो भवति केवलादि॥

**भावार्थः**—धान्याच्या मिळालेल्या राशी व्यर्थ कोणास आहेत ? संकुचित दृष्टीच्या कंजुषाला. असा मनुष्य धान्याचा सांठा करीत नसून तो मृत्युचा—मरणाचाच-सांठा करितो. संग्रहापैकीं आप्तस्वकीय व सत्पात्राला जो देत नाहीं तो पातकी आहे. परिग्रह ठेवूं नका, एवढा अर्थ वरील वचनांत स्पष्ट नमूद आहे; परंतु या वचनांत जो त्याग सांगितला आहे, तो व्रतपूर्वक नाहीं. संग्रह किती करावयाचा ? व त्यापेक्षां अधिक करावयाचा नाहीं, अशी मनाची जी प्रतिज्ञा असावी लागते, त्या प्रतिज्ञेचा वरील वचनांत अभाव आहे. जैनधर्मांत हेतु पुरःसर व विचारपूर्वक केलेली असते.

## (१०) अनुमतित्याग प्रतिमाधारी श्रावक.

**अनुमतिरारम्भे वा परिग्रहे वैहिकेषु कर्मसु वा।**
**नास्ति खलु यस्य समधीरनुमतिविरतः स मन्तव्यः॥१४६॥**

**अन्वयार्थः**– (आरम्भ, परिग्रहे, वा ऐहिकेषु कर्मसु) आरंभ, परिग्रह अथवा विवाहादि ऐहिक कार्यासंबंधीं (खलु) निश्चयें करून (यस्य) ज्याची (अनुमतिः नास्ति) अनुमति असत नाहीं. (समधीःस) समदृष्टी असा तो (अनुमतिविरतः) 'अनुमतिविरत' (मन्तव्यः) जाणावा.

**अर्थः**—शेती, व्यापार इत्यादि धनोत्पादक धंद्याच्या आरंभासंबंधीं, धनधान्यादिक परिग्रहासंबंधीं व विवाहादिक बाबींसंबंधीं अनुमति देत नाहीं व अशा कार्यांत ममत्व ठेवीत नाहीं; तो अनुमतित्याग व्रतधारी श्रावक समजावा.

आपल्या व इतरांच्या कुटुंबीय व्यवहाराबद्दल कोणी विचारल्यास तुम्ही चांगलें केलेंत, चांगले केले नाहीं, असें करा किंवा असें करूं नका, अशी कोणतीही सल्ला देत नाहीं. मग ती सल्ला व्यापाराच्या बाबतींत असो वा इतरहि बाबतींत असो. घर असें बांध किंवा असें बांधू नको म्हणूनही सांगणें वर्ज्य करावें लागतें. ताटांत पडेल ते बरें वा वाईट; चांगले वा गोड; तिखट वा खारट याचा विचार न करितां अन्न घ्यावें, स्वादाची इच्छा धरूं नये. याप्रमाणें चांगल्या कार्याबद्दल दुःख वा खेद न मानतां निर्ममत्वानें राहणें, त्यास अनुमतित्याग प्रतिमाधारी श्रावक असें म्हणतात.

### (११) उद्दिष्टत्याग प्रतिमाधारी श्रावकाचें लक्षण.

**गृहतो मुनिवनमित्वा गुरूपकंठे व्रतानि परिगृह्य ।**
**भैक्ष्याशनस्तपस्यन्नुत्कृष्टश्चेलखण्डधरः ॥ १४७ ॥**

**अन्वयार्थः**—(गृहतः मुनिवनं इत्वा) घराचा-संसाराचा त्याग करून मुनींच्या आश्रमामध्यें जाऊन (गुरुपकंठे) गुरुजवळ (व्रतानि परिगृह्य) व्रतें घेऊन (तपस्यन्) तप करणारा (भैक्षाशनः) भिक्षाभोजी (चेलखण्डधरः) कौपीन वस्त्रधारी (उत्कृष्टः) उत्कृष्ट श्रावक अर्थात् ११ व्या प्रतिमेचा धारक होय.

**अर्थः**—या प्रतिमेंतील श्रावक आपल्या घरादाराचा त्याग करून मुनीसमीप जाऊन त्यांच्याकडून व्रत घेतो; भिक्षावृत्तीनें आहार घेतो. तपश्चरणांत मग्न असतो व फक्त अंगावर एक वस्त्र अगर एक लंगोटी ठेवितो; यामुळें त्यास उद्दिष्टत्याग प्रतिमाधारी श्रावक म्हणतात. या प्रतिमाधारी श्रावकानें जें अन्न ग्रहण करावयाचें असतें तें अन्न त्यांच्यासाठीं म्हणून तयार केलेलें नसावें. आहारदान देणारा नित्यव्यवहारांत जें अन्न खातो तेंच अन्न या प्रतिमाधारीनें घ्यावयाचें असतें. मुनिव्रत घेतल्यानंतरहि हा निर्बंध पाळलाच पाहिजे. या प्रतिमेंतील श्रावक व मुनी हा निर्बंध पाळीनासे झाल्यामुळेंच कीं काय ' गोड भक्षणाची आशा म्हणून मुंडि दाढी मिशा ' हा अभंग न पावणारा अभंग अनुभवानें रचिला असावा, असें दिसतें. या प्रतिमाधारी श्रावकानें जें

वस्त्र जवळ ठेवावयाचें असतें तें असें असावें कीं पायापर्यंत घेतलें तर डोकें उघडें रहावें. फक्त ऊन, वारा पाऊस व थंडी यापासून बचाव करण्यापुरतें हें वस्त्र असावें. आपल्यासाठीं जेथें मुद्दाम जेवण तयार केलें असेल, तेथें आहार घेऊं नये. जेवतांना मौन धारण करावें. चांगलें-वाईट, गोड-तिखट व खारट-आंबट यांचा अभिलाष न धरतां अन्नग्रहण करावें. दिवसांतून एकवेळ जेवावें व अंतराय झाल्यास उपवास करावा.

## अकरा प्रतिमा पालनाचें फळ.

या प्रतिमा धारण केल्याचें फळ कोणतें? त्यांचा परिणाम काय होतो? या प्रतिमांचा अनुक्रम कोणत्या हेतूनें घातला आहे, इत्यादिबद्दल विचार केल्यानें त्यांचें महत्व कळणार आहे. उदाहरणार्थ उद्दिष्टत्यागाला अकरावा नंबर कां दिला व त्यापूर्वीच्या प्रतिमेंत याचा समावेश कां केला नाहीं ? पहिल्या दर्शन प्रतिमेंत जो आचार सांगितला आहे. त्यांत त्या नंबरच्या प्रतिमेंत जे निर्बंध घातले आहेत, तितके कडक निर्बंध नाहींत, संसारांतून गृहस्थाश्रमांतून-संन्यासमार्गाकडे नेतांना पूर्वतयारी म्हणून श्रावकांचें हें अकरा प्रकारचें वर्गीकरण आहे. कोणतीही अखेरची परिक्षा देण्यापूर्वी एखाद्याला ॐ नमः सिद्धम् पासूनचा धडा घेत घेत पुढें जावें लागतें, तद्वतच हा अनुक्रम आहे. पांच वर्षाच्या बालकाला जोडाक्षर वाचणें अवघड जाते. जोडाक्षर वाचण्याइतकी त्याच्या आकलन शक्तिची वाढ झालेली नसते; म्हणून जोडाक्षर विरहित धडे शिक्षक प्रथम तयार करवून घेतो व नंतर त्याची आकलनशक्ति वाढल्याचें पाहून जोडाक्षरांचा धडा शिकवितो. बेरीज वजाबाकी, गुणाकार व भागाकार येऊं लागला कीं, त्रैराशिक व नंतर पंचराशिक गणिताचे पाठ देण्यांत येतात. शिक्षणक्रमाप्रमाणें शेती, व्यापार व सैनिकवृत्ति यांत पायरी पायरीनें शिक्षण देण्यांत येते. बारा प्रकारच्या व्रतांच्या पालनामुळें राग-द्वेषादि पापबंधाच्या विकारांना आळा बसत जातो. श्रावकांच्या अकरा प्रतिमांमध्यें बाह्य-त्याग क्रमाक्रमानें सांगितला आहे. या दोहोंच्या पालनामुळें-संगमा-

मुळें-रागद्वेषादि विकार अधिकाधिक कमी होत जातात. बाह्य आचारामध्यें उत्तरोत्तर प्रगति होत जाते. उपवास अगर प्रोषधोपवासाच्या निमित्तानें महिन्यांतून त्यांच कांहीं दिवस तरी जवळ जवळ संन्यस्तवृत्तींत जातात. रागद्वेषादि अशुभ व पापकर्मापासून संपूर्णपणें मुक्त होण्यास मुनीदिक्षेची जरूरी आहे. पूर्णतः त्यागापूर्वी त्याचा अंशतः त्याग करण्याचे बारा अणुव्रतामध्यें व ११ प्रतिमांमध्यें शिक्षण दिलें जातें.

अकरावी प्रतिमाधारी श्रावकानंतरची पुढची पायरी म्हणजे **निर्ग्रंथ-दिगंबर साधू** होणें. मुनिपदांत अहिंसादि व्रतें पूर्णपणें पाळली जातात. श्रावक अणुव्रती-अंशतः व्रती असतो. मुनीपदांत अहिंसादिकांचा तो महाव्रती होतो. याशिवाय पांच समिती पालन कराव्या लागतात.

(१) **ईर्या**:—रस्त्याकडे नजर ठेवून सावधगिरीनें मार्ग आक्रमण करणें.

(२) **भाषा समिती**:—म्हणजे वाणी गोड असणें, कोणालाही टोंचून न बोलणें, कटू न बोलणें इत्यादि.

(३) **रसत्याग समिती**:—शुद्धाहार घेणें, सचित्तत्याग प्रतिमाधारी श्रावकाला कांहीं सचित्त पदार्थ न शिजविलेले वर्ज्य करावें लागतात. त्यांहिपेक्षां आहारांत कडक निर्बंध घालण्याच्या दृष्टीनें रसत्यागसमितीची जरूरी आहे.

(४) **आदान निक्षेपन समिती**:—लक्ष ठेवून उठणें, बसणें व पिंछी, कमंडलु व ग्रंथादि. जिन्नस जपून वापरणें.

(५) **व्युत्सर्ग**:—जीवजंतूंचा घात होणार नाहीं या हेतूनें जागा निरखून पाहून मलमूत्र करणें.

अहिंसादि पांच महाव्रतें, वर सांगितलेल्या पांच समिती व तीन गुप्ति अशा तेरा प्रकारच्या निर्बंधाचें पालन मुनींना करावें लागतें.

यापुढील पायरी म्हणजे आत्मज्ञान-आत्मानुभव, आत्मानंद इत्यादि नावांनीं ओळखली जाते. आत्मज्ञान झाल्याशिवाय वा आत्मानंदाचा लाभ झाल्याशिवाय वा आत्म्याचा अनुभव आल्याशिवाय मोक्षप्राप्ति नाहीं. हा विषय गहन असल्यानें त्याबद्दल अधिक चर्चा प्रस्तुत प्रसंगीं उचित होणार नाहीं.

श्रावकांचेहि उत्तम, मध्यम व जघन्य असे तीन भेद करण्यांत आले आहेत. पहिल्या ते सहाव्या प्रतिमेअखेरचा श्रावक तो जघन्य श्रावक, सातवी ते नवव्या प्रतिमेअखेरचा श्रावक तो मध्यम श्रावक; व दहावी ते अकरावी प्रतिमा धारण करणारा श्रावक उत्तम श्रावक होय; असें श्रावकाचे तीन भेद कल्पिलें आहेत.

या प्रतिमाधाऱ्यांचे (१) क्षुल्लक व (२) ऐल्लक असे दोन भेद मानतात. क्षुल्लक व ऐल्लक यांच्या कपड्यांच्या संख्येंत फरक आहे. क्षुल्लक हे लंगोटीशिवाय तीन हात लांबीचा कपडा अंगावर ठेवितात. ऐल्लक फक्त लंगोटीच तेवढी ठेवितात. दोघेहि पिंची व कमंडलु ठेवतात.

बॅ. चंपतराय यांच्या House holder's Dharma या पुस्तकांत पान ७० वर पुढील माहिती दिली आहे. त्रैवर्णिकापैकीं असलेले क्षुल्लक एका कुटुंबांत भिक्षेस जातात; परंतु शूद्र-क्षुल्लकाला एकाचवेळीं एका मागून एक पाच भिक्षेसाठीं जातां येते. एका घरीं अन्न ग्रहणकेल्यानंतर फिरून त्याच दिवशीं अन्नग्रहणासाठीं दुसऱ्या घरीं जावयाचें नसतें. अन्नग्रहण करिताना ठरल्या ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणीं जाऊं नये. मौनव्रत धारण करून अन्नग्रहण करावें. अन्नग्रहण करिताना खुणेनें खुणवून अगर इतर दृष्टीनें सुचवून आवडलेला पदार्थ मागूं नये. गेलेल्या घरीं आदरानें अतिथिसत्कार न होईल तर तेथें न राहतां दुसऱ्या घरीं भिक्षेसाठीं जावें; व जेथें आदरानें बोलाविलें गेलें नसेल तेथें त्यादिवशीं जाऊं नये.

ऐल्लकांनींही वरील नियम पाळावयाचे असतात. परंतु एका स्वयंपाकघरांत जे मिळेल त्यावरच त्यांनीं संतुष्ट रहावयाचें असतें. क्षुल्लक व ऐल्लक यांनीं सकाळीं १० ते ११ च्या दरम्यान भिक्षेसाठीं जावयाचें असते, इत्यादि.

येथें एक लक्षांत ठेवण्यासारखी बाब ह्मणजे क्षुल्लक व ऐल्लक यांनीं कोणाच्या हातचा आहार घ्यावा व कोणाच्या हातचा घेऊं नये, याबद्दल निर्बंध घातलेला नाहीं. आचार्य समंतभद्रानंतरच्या कांहीं आचार्यांनीं व पंडितांनीं आहारासंबंधीं बरेच निर्बंध घातले आहेत.

**भौरी**-भावरी-भ्रमरी-या शब्दाचा मूळ अर्थ काय आहे, याचाहि खुलासा यापूर्वी केला आहेच.

श्लोक संख्या १४३ खालीं हिंदुधर्मांतील चार आश्रम या संबंधीं त्रोटक माहिती दिली आहे. पांच अणुव्रतें, तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें व अकरा प्रतिमा, यांचें या चार आश्रम संस्थेशीं कांहीं साम्य आहे कीं नाहीं, याचा थोडासा विचार कर्तव्य आहे. जन्मापासून तों मरेपर्यंत जीवनाचे-काळाचे चार भेद हिंदुधर्मांत मानिले आहेत. तसे भेद जैनधर्मानें मानिलें नाहींत. आकरावी प्रतिमाधारी श्रावक व हिंदुधर्मातील वानप्रस्थी हे स्थूल-मानानें समानपातळीवर जातात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सातवी, आठवी, नववी व दहावी अशा प्रतिमाधारी श्रावकांची जैनधर्मानें जें वर्गीकरण केलें आहे, तसें शास्त्रीय वर्गीकरण हिंदुधर्मांत अढळ होत नाहीं. हिंदुधर्मीय ब्रम्हचर्याश्रमासारखा भेद या श्रावकाचारांत जरी मानिलेला नाहीं. श्रावकाचार म्हणजे गृहस्थाचार. यामुळें गृहस्थाश्रमापूर्वीच्या जीवनाचा विचार या ग्रथांत केला नसावा अगर विवाहित व अविवाहित या सर्वांनीं जन्मापासूनच श्रावकाचार पाळावयाचा असल्यानेंहि ब्रम्हचर्यासारखी स्वतंत्र कालसंस्था मानिली नसावी.

दोन्ही धर्मांचें अंतिम ध्येय मुक्ति हेंच आहे. तें ध्येय गांठण्याचें मार्ग व उपाय सुरवातीस भिन्न दिसतात. वानप्रस्थ व संन्यास या आश्रमाच्या अव-स्थेंत स्थूल मतैक्य दिसंत. जैनधर्मांतील विकासाचे मार्ग अधिक शास्त्रीय आहेत, असें सहजच दिसून येईल; तथापि तौलनिकदृष्ट्या झालेला विचार खास बोधप्रद होईल.

## खरा ब्रह्मचारी व अपरिग्रही कोण? याबद्दल भरतेश वैभवांतील मार्मिक विचार.

पांच अणुव्रतें पालक, अकरा प्रतिमादि धारक व महाव्रती यांची व चक्रवर्ति भरत यांची ' भरतेश वैभव ' पुराणांतील संधी ८ पृष्ठ संख्या ९८। ९९ वर केलेली तुलना अत्यंत मार्मिक वाटल्यानें त्यांतील महत्वाचा भाग खालीं दिला आहे.

चक्रवर्ति भरत यांना साम्राज्याचा संसार पहावयाचा होता. त्यांना हजारोंनीं राण्या होत्या. श्रीकृष्णाला सोळा हजार तर चक्रवर्ति भरताला शहाण्णव हजार राण्या होत्या. चक्रवर्ति भरत तक्तनशीन व राज्ञी समूहांत असतांहि ते हजारों वर्षे लोहकाष्ठ भक्षण करून तपश्चर्या करणाऱ्या ऋषीमुनीपेक्षां श्रेष्ठ होते, असें या पुराणांत वर्णिलें आहे. केवळ चरित्रनायकांची बेफाम स्तुति करावी, हाच उद्देश पुराणकर्त्यांचा नसून त्याला धार्मिक आधार आहे, असें त्या वर्णनावरूनच दिसून येईल.

चक्रवर्ति भरत—

**अक्षभोग भोगिति बाहेरून । अतींद्रिय सुखा आंतून ।**
**जितेंद्रियता यांचें अभिधान । निश्चयानें होय जाणा ॥१९६॥**
**इंद्रियभोग भोगतांहि मनें । अतींद्रिय सुखाचा स्वाद होणें ।**
**ही गोष्ट ती साधारण गणणें । योग्य नसे हो सर्वथा ॥१९७॥**
**लोकीं पुष्कळ तपस्वी असती । त्यांत कित्येक स्वशिर मुंडिति ।**
**किती एक शरीर सुकविती । क्लेश सोसती कित्येक ॥१९८॥**
**परंतु हें सकळतें । बहिरंगतप होतें ।**
**यांत कांहीं विशेष तें । कदापि न भासते ॥१९९॥**

यांचें कारण काय ? कवि ह्मणतात कीं,

**मुंडन करण्यापेक्षांहि शिर । मनो-मुंडन श्रेष्ठ हो ॥२००॥**

पुढें कवी ह्मणतात कीं,

**शास्त्राच्या गडबडींत पडोनी । वस्त्रमात्रा परिग्रह जाणोनी ।**
**तयासी त्यजोनी जो होई मुनी । तो नोहेचि मुनी पहा ॥२०२॥**
**स्त्रियांचा त्याग करणें मानसें । हें व्यवहार ब्रह्मचर्य असे ।**
**स्वमन आत्म्यांत लावणें खासे । हें निश्चय ब्रह्मचर्य ॥२१३॥**
**बाह्य सर्व परिग्रह सोडोनी । आंतून्त सर्व परिग्रहांतून ।**
**संभ्रमणारे डंबाचारी मुनी । या लोकी असती बहु ॥२१४॥**

चक्रवर्ति भरत एवढ्या मोठया परिग्रहांत असतांहि ते आचार्यसमान कां भासत होते याचें मार्मिक विवेचन कवींनीं केलें आहे.

**जेवून ते उपवासी असती । भोगून ते ब्रह्मचारी असती ।**
**तत्करी असतां भूमंडल । तो असे अपरिग्रही विमल ।**
**मस्तकांत वाढतांहि कुंतल । मुंडिलेसें त्याचें मन ॥२१७-२१८॥**

( पं. कालचंद्रकृत मराठी भाषांतर. )

संसारांत असतांहि परिग्रहांत आसक्ति नव्हती; म्हणून कवींनीं म्हटलें आहे कीं,

**' जेवून ते उपवासी असती । भोगून ते ब्रह्मचारी असती '॥**

किती हे थोर विचार.

अशाच प्रकारचे विचार प्रदर्शित करणाऱ्यांची आजचे अंधभक्त, मुनीनिंदकांत गणना करूनच थांबतात असें नाहीं; तर आपणच न्यायाधीश! बनून नरकवासाच्या शिक्षेची भीतीहि त्यांना घालतात. भरतेश-वैभव-लिखाणाच्या कालींहि वेषधारी मुनींची अंडी-पिल्ली बाहेर काढणारे टीका लेखकांचें अस्तित्व होतें, हें उघड होत आहे.

**श्रेष्ठ ज्ञात्याचें लक्षण.**

**पापमरातिर्धर्मो बन्धुर्जीवस्य चेति निश्चिन्वन् ॥**
**समयं यदि जानीते श्रेयो ज्ञाता ध्रुवं भवति ॥१४८॥**

**अन्वयार्थः**—(जीवस्य) जीवाचा (पापं अरातिः) पाप हा शत्रू होय. (च) आणि (धर्मःबंधुः) धर्म हा बंधु होय. (इति निश्चिन्वन्) अशाप्रकारचा निश्चय करणारा. (यदि समयं जानीते) जो शास्त्राला जाणतो तो (ध्रुवं) निश्चयानें (श्रेयो ज्ञाता भवति) उत्कृष्ट ज्ञाता होतो.

**अर्थः**—पाप हा जीवाचा खरा वैरी व शत्रू आहे, व धर्म हा खरा बंधु, मित्र व हितकर्ता आहे, असें निश्चयानें समजून शास्त्रावर श्रद्धा ठेवणारे, हे श्रेष्ठ ज्ञाते होत. खरा शत्रू व वैरी कशामुळें होतात? जन्मतःच कोणी कोणाचा वैरी नाहीं; परंतु आपले कषाय दूषित झाले, आपली इतराबद्दलची भावना दुष्ट बनली, अगर इतरांचें कषाय दुष्ट होतील असें वर्तन आपल्याकडून घडलें कीं, पापाचा उदय होतो व पापाच्या पोटीं शत्रू उत्पन्न होतात. खरा वैरी पाप आहे,

केवळ बाह्य निमित्तानें आपण 'अ' अगर 'ब' यास आपला शत्रू समजतो. 'अ'ची मिळकत हिरावून घेतली तर बाह्य निमित्तानें 'अ' हा आपणांस शत्रू समजतो. परंतु त्यांची मिळकत हिरावून घेण्याची जी दुष्ट वासना ती वासनाच आपला खरा शत्रू आहे.

## उपनिषद् काळची शंका.

किमहं साधु नाकरवम् , किमहं पापमकरवमिति ? ह्मणजे माझ्या हातून पुण्यकृत्यें कां घडत नाहींत ? व पापकृत्येंच कां घडतात ? मला धर्म कोणतें ? व अधर्म कोणतें ? हें समजत असतांहि मी सत्प्रवृत्त कां होत नाहीं ? इत्यादि प्रश्न उपनिषद् काळींहि विचारिले जात; व या प्रश्नांचें उत्तर खालील श्लोकांत देण्याचा प्रयत्न झाला आहे.:—

**अथ पुरुषस्य कामक्रोधलोभाख्यं रिपुत्रयं सुघोरं भवति ।**
**तेनायमाक्रान्तोऽतिपातकमहापातकानुपातकोपपातकेषु प्रवर्तते ॥**

**भावार्थः**—काम, क्रोध व लोभ हे मनुष्यप्राण्यांचे तीन शत्रू आहेत. या शत्रूंनां जिंकणें, सहजसाध्य नाहीं. पुण्यकर्मापासून परावृत्त करून पापकृत्याकडे नेणारे हे शत्रूच कारण आहेत. पापकर्मांचीं आद्य कारणें ह्मणजे काम, क्रोध व लोभ हीं होत.

यापूर्वी अनेकवार कामक्रोधादिकांचा उल्लेख करितांना या शत्रूंची संख्या सहा सांगितली आहे. वरील उताऱ्यांत 'रिपुत्रयं' असें ह्मटलें आहे. अर्थात् हे रिपु-शत्रू-विकार तीनच आहेत कीं ते सहा आहेत ? याचा विचार करितां षड्‌रिपू मानणेंच अधिक युक्त आहे. मानवी मनाच्या सर्व कषायांचें आद्यकारण ह्मणजे हे रिपूच होत. जीवांचा खरा वैरी ह्मणजे पाप-पातकेंच जीवाचा घात करणारे आहेत. पुण्य हा खरा मित्र आहे. पुण्यच जीवाला तारक आहे.

## ज्ञान, भक्ति व कर्म यांचा अन्योन्य संबंध.

ज्ञानाविना भक्ति आंधळी आहे. अंधभक्ति व अंधश्रद्धा टाळावी. भक्ति नसेल तर ज्ञानहि व्यर्थ आहे. ज्ञानाला भक्तीचा ओलावा पाहिजे. ज्ञान व भक्ति हीं कृतींत-आचारांत-उतरलीं पाहिजेत. पाप ह्मणजे काय? व पुण्य ह्मणजे काय?

याचें ज्ञान झालें आहे; परंतु पुण्यकर्माबद्दलची भक्ति नसल्यास सदाचरण घडत नाहीं असा नेहमींच अनुभव आहे. समजुन उमजून व श्रद्धा ठेवुन सन्मार्गानें वागणाराच खरा ज्ञानी, खरा भक्त व खरा साधू.

**श्रावकाचाराप्रमाणें आचरण ठेवणाऱ्यास मिळणारें फल.**

**येन स्वयं वीतकलङ्कविद्यादृष्टिक्रियारत्नकरण्डभावम् ।**
**नीतस्तमायाति पतीच्छयेव सर्वार्थसिद्धिस्त्रिषु विष्टपेषु ॥१४९॥**

**अन्वयार्थः**—(येन) ज्यानें (स्वयं) आपणांस (वीतकलङ्कविद्यादृष्टिक्रियारत्नकरण्डभावं नीतः) सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यग्चारित्ररूपी रत्नाचा करण्डा बनविलें आहे. (त) त्याला (त्रिषुविष्टपेषु) या तिन्ही जगतात. (पतिच्छया इव) पतिची इच्छा करणाऱ्या स्त्रीप्रमाणें (सर्वार्थसिद्धिः) धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांची सिद्धि (आयाति) प्राप्त होते.

**अर्थः**—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तीन रत्नत्रयांची ज्याला प्राप्ति होते, जो या रत्नत्रयांचा लाभ करून घेतो म्हणजे त्यांचें पालन करितो त्याला धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार अर्थांची प्राप्ति होते, अथवा हा ग्रंथ जो भक्तिपूर्वक समजून घेतो, या ग्रंथाचें ज्याला ज्ञान होतें, त्यालाच वरील चारही पुरुषार्थांची प्राप्ति होते. याला उदाहरण म्हणून श्रीसमंतभद्राचार्य म्हणतात कीं ज्याच्याकडे पुष्कळ रत्नें-संपत्ती-आहेत त्यास कुमारिका वरते; त्याचप्रमाणें या तीन रत्नत्रयाची प्राप्ति ज्यांनीं करून घेतली आहे, त्यांना धर्म-अर्थादि चार ऋद्धी-पुरुषार्थ-प्राप्त होतात. हे चार पुरुषार्थ कोणते ? याबद्दल यापूर्वी विवेचन केलेंच आहे. आचार्य पद्मनंदी आपल्या श्रावकाचारांत लिहितात कीं,

**रत्नत्रयात्मके मार्गे संचरन्ति न ये जना ।**
**तेषां मोक्षपदं दूरं भवेद्दीर्घतरो भवः ॥ ३ ॥**

**भावार्थः**—रत्नत्रयमार्गानें जे चालत अगर वागत नाहींत त्यांना मोक्षपदप्राप्ति जवळ न येतां ती दूर जाते; म्हणजे मोक्षपद प्राप्त होत नाहीं. व त्याचा संसार दीर्घतर होतो म्हणजे संसारांत दीर्घकाल त्याला जन्म घ्यावा लागतो. **संसार** म्हणजे ज्या कारणामुळें देव, मनुष्य, तिर्यंचादि योनींत फिर-

फिरून जन्म घ्यावा लागतो ती कारणें. देव मनुष्यादि गतीचा फेरा चुकवितां आला नाहीं म्हणजे त्याच्या संसाराची मर्यादा वाढते. संसार भ्रमणाची काल-मर्यादा वाढली कीं मोक्षपदप्राप्तीचा काळ दुरावतो म्हणजे मोक्षपदप्राप्तीची वेळ जवळ येत नाहीं.

श्रावकाचार-श्रावकधर्म-याचा विकास या पूर्वी सांगितला आहे. या आचाराचा परिणाम काय, हे पुढील सुभाषितावरून दिसून येईल. तेः—

**जलबिन्दुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः ।**
**स हेतुः सर्वविद्यानां धर्मस्य च धनस्य च ॥**

**सारांशः**—पाण्याचा एक एक थेंब टाकत गेल्यानें भांडें भरतें. ' थेंबे थेंबे तळें साचे, ' ही म्हण परिचयाची आहे. पैशाला पैसा जोडून श्रीमंत होतां येते. थोडी विद्या मिळवीत गेल्यानें विद्वान होतां येते. तद्वतच एक एक आचार पालन गेल्यानें धार्मिक होता येते.

हें सुभाषित लक्षांत ठेवून व ध्येय प्राप्तीसाठीं एक एक आचार पाळून पुढील आचारावर दृष्टी ठेवीत जावें.

### अंतिम मंगल-आशीर्वाद·

**सुखयतु सुखभूमिः कामिनं कामिनीव ।**
**सुतमिव जननी मां शुद्धशीला भुनक्तु ॥**
**कुलमिव गुणभूषा कन्यका संपुनीतात् ।**
**जिनपतिपदपद्मप्रेक्षिणी दृष्टिलक्ष्मीः ॥१५०॥**

**अन्वयार्थः**—(जिनपतिपदपद्मप्रेक्षिणी) जिनेंद्र भगवंताच्या चरणकमलांस पाहणारी (दृष्टिलक्ष्मीः) सम्यग्दर्शनरूपी लक्ष्मी (सुखभूमिः कामिनी कामिनं इव) सुखाची भूमि अशी स्त्री ज्याप्रमाणें पतीला सुख देते त्याप्रमाणें (मां सुखयतु) मला सुख देवो (शुद्धशीला जननी) शीलवान माता. (सुतमिव) आपल्या मुलाचें जसें रक्षण करिते त्याप्रमाणें (मां भुनक्तु) माझें रक्षण करो. (गुणभूषा) गुण हेंच आहे भूषण जीचें अशी (कन्यका) कन्या (कुलमिव) कुळाला जशी पवित्र करते त्याप्रमाणें (मां) मला (संपुनीयात्) पवित्र करो.

**अर्थः**—ज्याप्रमाणें गुणवान व प्रतिव्रता स्त्री सेवा धर्मानें वागून आपल्या नवऱ्यास सुख देते, त्या प्रमाणें सम्यग्दर्शन मला सुख देवो; ज्याप्रमाणें सदाचरणी माता आपल्या मुलाबाळांचें संरक्षण व कल्याण करिते, त्याप्रमाणें सम्यग्ज्ञान माझें कल्याण व संरक्षण करो व ज्याप्रमाणें गुणवान कन्या दोन्ही कुळांचा-सासर व माहेर-उद्धार करून त्यांना पवित्र व पावन करिते. त्याप्रमाणें सम्यग्चारित्र माझा उद्धार करो.

ही अलंकारिक भाषा क्षणभर बाजूस ठेवून भावार्थ समजून घ्यावयाचा झाल्यास असें म्हणतां येईल कीं, मिथ्यादर्शनामुळें जडणारीं पातकें नष्ट करून सुख देणारें सम्यग्दर्शन आहे व जन्ममरणादि दुःखापासून संरक्षण करण्यास रत्नत्रय हे समर्थ आहेत.

ग्रंथाच्या सुरवातीच्या मंगलचरणांत आचार्यांनीं तीर्थंकर प्रभूंचें नाम-स्मरण केलें आहे. व ग्रंथाच्या समाप्तीनंतर त्यांनीं रत्नत्रयांचें स्मरण करून त्यांनीं आपलें कल्याण करावें, आपला उद्धार करावा व जन्ममरणादिकांच्या फेऱ्यांतून आपली सुटका करावी, अशी अन्तःकरणपूर्वक प्रार्थना केली आहे. असें कां ? ज्या रत्नत्रयांची महति आपण गायिली आहे, त्यांनाच आचार्य अखेर शरण गेले आहेत. अमूर्तिक रत्नत्रयांचें प्रतिक-दृश्यमूर्ति-म्हणजे तीर्थंकर प्रभू, यांचें प्रारंभींच्या मंगलचरणांत व अंतिम मंगलाचरणांत रत्नत्रयांचें नाम-स्मरण आचार्यांनीं केलें आहे. रत्नत्रयाच्या महत्वाची खरीखुरी कल्पना येण्यास अंतिम मंगलाचरणच पुरेसें आहे. आचार्यांचा उद्धार करून जन्मजरामरणा-दिकाच्या फेऱ्यांतून—संसार चक्रांतून मुक्त करण्यास समर्थ असलेलें रत्नत्रय इतर रत्नत्रय धाऱ्यांचाहि उद्धार करो व त्यांना जन्मजरामरणादिकांच्या या चक्रांतून सोडवो, अशी आशा धरितो. भविष्यकालीन तीर्थंकरांत आचा-र्यांच्या नांवाचा समावेश झालेलाच आहे. अर्थात आचार्यांची प्रार्थना वाया गेलेली नाहीं. या अंतिम श्लोकांत भार्या स्त्री, माता व कन्या यांच्याच सदाचरणाचें उदाहरण कां घेतलें असावें ? जन्मास आल्यापासून स्त्रीला तीन अवस्थेंतून जावें लागतें. विवाहापर्यंतची एक अवस्था, विवाहानंतर संततिप्राप्तिपर्यंतची

दुसरी व त्यानंतरची तिसरी अवस्था. या श्लोकांत महिला समाजाचा मोठाच सन्मान केला आहे; यांत संशय नाहीं. रत्नत्रय आपलें उद्धारक होवोत असा आशीर्वाद मागण्यास दुसरीं अनेक उदाहरणें आचार्यांना मिळालीं नसतीं काय ?

ज्या अणुव्रताचा संबंध स्त्रीजातीशीं येतो; त्या अणुव्रताबद्दल, त्याच्या अतिचाराबद्दल व या अणुव्रतांशीं निकट संबंध येणाऱ्या स्त्री-जातीबद्दल परस्पर विरोधीच काय पण उत्तर व दक्षिण ध्रुवाइतका फरक दाखविणारीं वचनें आढळ होतात. त्या वचनांशीं वाचकांनीं परिचय करून घेऊन स्त्रीजातीबद्दल अनुदार उद्गार काढणाऱ्यांच्या वचनाकडे संपूर्णतया दुर्लक्षच करावें; हेंच उचित होईल.

धर्म, संपत्ति, सुख व कीर्ति इत्यादिक संसारसुखाची ध्वजा म्हणजेच पतिव्रता व साध्वी स्त्री आहे, असें सागारधर्मामृतांत म्हटलें आहे:—

धर्मश्रीशर्म-कीर्त्येक केतनंहि प्रतिवृता:

दुसरें प्रसिद्ध वचन म्हणजे—

जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी-

स्वर्गापेक्षांहि आई थोर आहे.

आई व पतिव्रता स्त्री यांच्या थोरवीच्या वरील वर्णनाबरोबरच आचार्य समंतभद्र यांनीं या श्लोकांत बायको, आई व मुलगी यांचें महत्व वर्णिलें आहे. पत्नि, माता व कन्या हीं स्त्री रत्नेंच होत.

या उलट महिला समाजाची निर्भत्सना करणारीं खालील वचनें नमुन्या-दाखल दिलीं आहेत.

(१) ईर्ष्या स्त्री-समुद्भवा-स्त्री ही ईर्ष्येचें उगमस्थान आहे.

(२) मायामयी हि नसिणां मनोवृत्तिर्निसर्गत:

मायावी:—कपटी स्वभाव, हा स्त्रियांचा नैसर्गिक-जन्मत:च गुण आहे. स्त्रिया जन्मत:च मायावी व कपटी असतात.

(३) अंगारसदृशी नारी, नवनीत-समानरा: पुरुष हा लोण्याप्रमाणें आहे. स्त्री ही विस्तवाप्रमाणें आहे. विस्तवाजवळ लोणी ठेविलें कीं ते विर-